






नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)

महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन



अनुक्रमणिका







महाराष्ट्र साहित्य पत्रिका
जानेवारी ते मार्च २०२१
आंतरराष्ट्रीय ख्यातीचे संशोधक आणि साहित्यिक
डॉ. जयंत नारळीकर
यांची नाशिक येथे होणाऱ्या ९४ व्या अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलनाच्या
अध्यक्षपदी निवड झाल्याबद्दल अभिनंदन !

अनुक्रमणिका


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास



**नारळीकरांच्या निवडीने समाजाच्या वैज्ञानिक जाणिवा प्रगल्भ होतील : डॉ. रावसाहेब कसबे**

**महाराष्ट्र साहित्य परिषदेतर्फे सत्कार**

पुणे : 'नाशिक येथे होणाऱ्या अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलनाच्या अध्यक्षपदी डॉ. जयंत नारळीकर यांची झालेली निवड ही मराठी साहित्यविश्वाला अतिशय आनंद देणारी घटना आहे. त्यांच्या निवडीमुळे समाजाच्या वैज्ञानिक जाणिवा प्रगल्भ होतील आणि विज्ञानाच्या अधिष्ठानावर उभी राहिलेली लोकशाही अधिक समृद्ध होईल.' असे मत महाराष्ट्र साहित्य परिषदेचे अध्यक्ष डॉ. रावसाहेब कसबे यांनी व्यक्त केले. आयुका येथे महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या वतीने नियोजित संमेलनाध्यक्ष डॉ. जयंत नारळीकर यांचा प्रथेप्रमाणे पहिला सत्कार डॉ. कसबे यांच्या हस्ते करण्यात आला त्या वेळी ते बोलत होते. यावेळी मंगला नारळीकर, महाराष्ट्र साहित्य परिषदेचे कार्याध्यक्ष प्रा. मिलिंद जोशी, प्रमुख कार्यवाह प्रकाश पायगुडे, कोषाध्यक्ष सुनिताराजे पवार उपस्थित होते.

कसबे म्हणाले, ''महाराष्ट्र साहित्य परिषदेने डॉ. जयंत नारळीकर यांचे नाव अग्रक्रमाने सुचविले आणि महामंडळाने त्यास मान्यता दिली याचा मला मसापचा अध्यक्ष या नात्याने विशेष आनंद आहे.''

नारळीकर म्हणाले, ''संशोधनात रमणारा आणि साहित्यक्षेत्राच्या बाहेरचा असूनही माझी संमेलनाध्यक्षपदी झालेली निवड हाच माझ्यासाठी आश्चर्याचा धक्का होता. युवकांच्या मनात विज्ञानाविषयीची ओढ निर्माण करण्यासाठी मी प्रयत्न करेन.''

प्रा. मिलिंद जोशी म्हणाले, ''डॉ. नारळीकरांनी त्यांच्या लेखनातून जिज्ञासूवृत्ती आणि विज्ञाननिष्ठा मराठी समाजमनात रुजविली. साहित्य संमेलनांनी विज्ञानविषयक लेखन करणाऱ्या लेखकांकडे दुर्लक्ष केले अशी खंत मराठी वाचकांमध्ये होती. डॉ. नारळीकरांच्या निवडीने ती दूर झाली आहे. आकाशातील एका ताऱ्याला कुसुमाग्रजांचे नाव दिले आहे. अशा कुसुमाग्रजांच्या कर्मभूमीत होत असलेल्या संमेलनाचे अध्यक्षपद आकाशाशी नाते जडलेले डॉ. नारळीकर भूषवित आहेत याचा आनंद गगनात न मावणारा आहे.'' प्रकाश पायगुडे यांनी प्रास्ताविक केले. सुनिताराजे पवार यांनी आभार मानले.




महाराष्ट्र साहित्य परिषदेचे त्रैमासिक मुखपत्र

# महाराष्ट्र साहित्य पत्रिका

अंक क्र. ३७३, जानेवारी ते मार्च २०२१

संपादक

**डॉ. पुरुषोत्तम काळे**

संपादन समिती

**डॉ. मनोहर जाधव । डॉ. नीलिमा गुंडी**
**डॉ. भास्कर ढोके । डॉ. रणधीर शिंदे**
**डॉ. वर्षा तोडमल**

प्रकाशक :

**प्रकाश पायगुडे**
प्रमुख कार्यवाह



**महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे**
टिळक रस्ता, पुणे ४११०३०.
दूरभाष । ०२०-२४४७५९६३
संकेतस्थळ । www.masapapune.org
ई-मेल । masaparishad@gmail.com

कार्यालयाची वेळ ।
सकाळी ९.०० दुपारी १२.००
दुपारी ४.३० ते रात्री ८.००

अनुक्रमणिका













▮ मुद्रक-प्रकाशक
प्रकाश पायगुडे
प्रमुख कार्यवाह
महाराष्ट्र साहित्य परिषद,
टिळक रस्ता, पुणे ४११०३०

▮ जाहिरात व्यवस्थापक
वि. दा. पिंगळे
९८८१२३५०३३

▮ संपादकीय संयोजन
संदीप खाडे

▮ अक्षरजुळणी व सजावट
लक कलाकल्प

▮ मुखपृष्ठ
जयदीप कडू

▮ मुद्रितशोधन
आरती देवगांवकर

▮ मुद्रणस्थळ
एस. ए. प्रिंटर्स, एल. एल. पी.
फ्लॅट नं. ५, ३ रा मजला,
सिद्धीविनायक अपा.,
शिवदर्शन, पुणे ४११००९

मूल्य : १५ रुपये

▮ प्रकाशन क्र. ३७३
जानेवारी ते मार्च २०२१



# अंतरंग

## मसाप पत्रिका । जानेवारी ते मार्च २०२१ अंक












संपादकीय

# ९४ व्या अखिल भारतीय साहित्य संमेलनाध्यक्षपदी डॉ. जयंत नारळीकर यांची निवड : विद्वान शास्त्रज्ञ-साहित्यिकाचा सार्थ सन्मान

डॉ. पुरुषोत्तम काळे

नाशिक येथे प्रस्तावित अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलनाच्या अध्यक्षपदी ख्यातकीर्त शास्त्रज्ञ पद्मविभूषण जयंत नारळीकर यांची निवड ही मराठी रसिकांना अतिशय समाधान देणारी घटना आहे. हे संमेलन करोना महासाथीच्या दुसऱ्या लाटेमुळे स्थगित करण्यात आले आहे. ही रसिकांचा हिरमोड करणारी घटना असली तरी सद्यपरिस्थितीत हा निर्णय योग्य आहे. खगोलशास्त्रामध्ये मोलाचे संशोधन करून डॉ. नारळीकरांनी जागतिक विज्ञान क्षेत्रात आपल्या कर्तृत्वाचा ठसा उमटविलेला आहे. मानाचे 'अॅडम्स प्राईझ' सह पद्मभूषण, पद्मविभूषण, महाराष्ट्र भूषण, भटनागर, एम. पी. बिर्ला यांसारखे देश-विदेशातील अनेक सन्मान त्यांना मिळाले आहेत. त्यांनी मराठी साहित्यात विज्ञानकथा लोकप्रिय केल्या. 'यक्षांची देणगी' या त्यांच्या पहिल्याच विज्ञान कथासंग्रहास राज्य शासनाचा पुरस्कार मिळाला. त्यांच्या 'चार नगरांतले माझे विश्व' या आत्मचरित्रास साहित्य अकादमीचा पुरस्कार मिळाला. कराड येथे झालेल्या अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलनाच्या अध्यक्ष दुर्गा भागवत यांनी आणीबाणीवर आणि अभिव्यक्ती स्वातंत्र्याच्या गळचेपीवर प्रखर टीका केली होती. त्याच भाषणात त्यांनी मराठी साहित्य विश्वातील विज्ञानकथा प्रवाह आणि डॉ. जयंत नारळीकरांच्या विज्ञानकथालेखनाचा गौरवाने उल्लेख केला होता. व्युत्पन्नमती आणि विद्वान डॉ. नारळीकरांनी अध्यात्मप्रवण, धार्मिक जनमानसात विज्ञानवादी दृष्टिकोन रुजावा यासाठी विज्ञानकथा- कादंबऱ्यांचे लेखन केले. अंधश्रद्धा आणि छद्मविज्ञानाच्या विरोधी असा वैज्ञानिक दृष्टिकोनाचा प्रसार समाजामध्ये त्यांनी केला. सोप्या मराठी भाषेत विज्ञानाची, खगोलशास्त्राची मूलतत्त्वे नारळीकरांनी आपल्या लेखनातून, व्याकरणातून मांडली. समाजात वैज्ञानिक दृष्टिकोन रुजत नाही, अंधश्रद्धांचे प्राबल्य कमी होत नाही याची खंत नारळीकरांनी आपल्या आत्मचरित्रात व्यक्त केली आहे. आपले गुरू फ्रेड हॉयल यांच्याबरोबर संस्था उभारणीच्या कामाच्या अनुभवाचा त्यांनी योग्य उपयोग केला. पुण्यामध्ये जागतिक दर्जाच्या 'आयुका' या खगोलभौतिकी संस्थेची स्थापना केली. पुणे जिल्ह्यातील गिरवली येथे जागतिक दर्जाच्या दुर्बिणीच्या उभारणीमध्ये त्यांचा मोलाचा सहभाग आहे. ही देशासाठी आणि









अनुक्रमणिका



महाराष्ट्रासाठी अभिमानास्पद बाब आहे. साहित्यसंमेलनाध्यक्षपदी डॉ. जयंत नारळीकर यांची एकमताने निवड झाली याबद्दल अखिल भारतीय साहित्य मंडळाचे अभिनंदन! मा. जयंत नारळीकरांचे नाव सुचविण्यात महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या महामंडळावरील सदस्यांचे महत्त्वपूर्ण योगदान होते ही अभिमानास्पद बाब आहे. मा. नारळीकरांचे अध्यक्षीय भाषण ऐकण्याची उत्सुकता मराठी साहित्य रसिकांना होती; परंतु साहित्य संमेलन स्थगित झाल्याने रसिकांचा हिरमोड झाला आहे. करोना महासाथीची दुसरी लाट आटोक्यात आल्यावर हे संमेलन व्हावे ही अपेक्षा आहे. साहित्यसंमेलनाध्यक्षपदी एकमताने निवड झाल्याबद्दल मा. डॉ. जयंत नारळीकर यांचे मनःपूर्वक अभिनंदन!

साहित्य अकादमीचे साहित्य पुरस्कार नुकतेच जाहीर झाले. मराठीत नंदा खरे यांच्या 'उद्या' या कादंबरीला हा पुरस्कार जाहीर झाला. ही कादंबरी जानेवारी २०१५ मध्ये प्रकाशित झाली. मराठी साहित्यविश्वात या कादंबरीवर फारसे लिहिले गेले नाही. अथवा फारशी चर्चा झाली नाही ही वस्तुस्थिती आहे. असे का व्हावे? याचा गंभीरपणे विचार करायला हवा. नंदा खरे यांचे मनःपूर्वक अभिनंदन! त्यांनी पुरस्कार स्वीकारणार नाही अशी भूमिका घेतली आहे. या भूमिकेचा सर्वांनी आदर करायला हवा. नंदा खरे यांच्या हातून असेच उत्तमोत्तम लेखन व्हावे यासाठी शुभेच्छा!

महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या कार्यकारिणीची पाच वर्षे पूर्ण झाली आहेत. करोनाच्या महासाथीच्या काळात निवडणूक घेणे शक्य होणार नाही म्हणून या कार्यकारिणीला मुदतवाढ मिळावी यासाठी वार्षिक सर्वसाधारण सभेत मुदतवाढीचा प्रस्ताव मांडला. या प्रस्तावावर जोरदार चर्चा झाली. अखेरीस बहुमताने हा प्रस्ताव मंजूर झाला. विरोधकांच्या आरोपांना कार्याध्यक्ष प्रा. मिलिंद जोशी यांनी संयत भाषेत मुद्देसूद आणि प्रभावी युक्तिवाद करीत उत्तर दिले. या कार्यकारिणीने गेल्या पाच वर्षांत एकसंघपणे प्रभावी काम केले आहे. त्याचा सविस्तर आढावा कार्याध्यक्षांनी त्यांच्या 'मुळीचा झरा' या लेखात घेतला आहे. गेली पाच वर्षे महाराष्ट्र साहित्य पत्रिकेच्या संपादकपदी काम करताना पत्रिका अधिकाधिक वाचनीय होईल हे पाहिले. पत्रिकेचे स्वरूप व्यापक केले. अनेक समीक्षक- लेखकांना आवर्जून लिहिते केले. विविध विषयांवरील लेख, ग्रंथसमीक्षा आणि सैद्धांतिक समीक्षेवरील लेख प्रकाशित व्हावेत यासाठी जाणीवपूर्वक प्रयत्न केले. न्या. नरेंद्र चपळगावकरांसारख्या अनेक मान्यवरांनी पत्रिकेविषयीचा अभिप्राय आवर्जून कळविला. साहित्य परिषदेचे मुखपत्र असल्याने संस्थेचा लौकिक जपला जाईल याकडे लक्ष दिले. पत्रिकेला ISSN क्रमांक मिळून यु.जी.सी.च्या यादीत म. सा. पत्रिकेचा समावेश झाला. कोणत्याही विचारधारेला त्याज्य न मानता सर्व विचारप्रवाहांना पत्रिकेत स्थान मिळेल हे पाहिले. हे सर्व कार्याध्यक्ष प्रा. मिलींद जोशी, प्रकाशक, प्रमुख कार्यवाह प्रकाश पायगुडे आणि कोषाध्यक्ष सुनिताराजे पवार, संपादक मंडळातील सर्व सदस्य, संपादकीय सहायक संदीप खाडे, कार्यकारिणीतील माझे सहकारी आणि मुद्रक-आर्ट-ग्राफिक डिझायनर श्री. खेतमर आणि श्री. जयदीप कडू यांच्या सहकार्याने झाले. या सर्वांप्रति मी कृतज्ञता व्यक्त करतो. हे संपादन करताना टीकेचे प्रहारही झाले; परंतु तो अनुभव मोलाचा होता. या कार्यात काही कमतरता राहिली असेल, तर तो दोष



अनुक्रमणिका



माझाच आहे. सर्व चांगल्या कामाचे श्रेय वरील सर्व मान्यवरांचे आहे.

करोनाच्या महासाथीने अनेक मान्यवरांना काळाने आपल्यातून हिरावून नेले. प्राचार्य डॉ. किसन पाटील यांचे निधन हा फार मोठा धक्का होता. प्राचार्य किसन पाटील कार्यकारिणीचे माजी सदस्य आणि म. सा.प. च्या पाचोरा शाखेचे संस्थापक होते. बोलींचे संशोधक आणि समीक्षक म्हणून पाटील सरांची ख्याती होती. त्यांच्या निधनाने जळगाव भागातील आणि उत्तर महाराष्ट्रातील म. सा.प.च्या साहित्यविश्वाची आणि कार्याची न भरून येणारी हानी झाली आहे. म. सा. प. च्या मावळ शाखेचे कार्याध्यक्ष, संतसाहित्याचे अभ्यासक डॉ. दीपक बिचे यांचे निधन अतीव दुःखदायक आहे. अतिशय उत्साही आणि प्रेमळ व्यक्तिमत्त्वाचे डॉ. बिचे मावळ तालुक्यातील साहित्य परिषदेचे खंदे कार्यकर्ते होते. या दोन्ही मान्यवराना म. सा. परिषद आणि पत्रिकेतर्फे भावपूर्ण श्रद्धांजली!

गेल्या वर्षभरात कोविड महासाथीने सर्व जीवनव्यवहार ठप्प झालेले असताना म. सा.प. च्या पिंपरी चिंचवड, नाशिक रोड, सोलापूर, जळगाव, नगर आदी शाखांनी ऑनलाईन व्याख्यानांचे, कार्यक्रमांचे आयोजन केले. याबद्दल संबंधित शाखा-पदाधिकाऱ्यांचे अभिनंदन!

ज्येष्ठ ख्यातकीर्त कादंबरीकार रंगनाथ पठारे यांना कुसुमाग्रज प्रतिष्ठानचा 'जनस्थान' पुरस्कार जाहीर झाला. दलित चळवळ व साहित्याचे समीक्षक डॉ. शरणकुमार लिंबाळे यांच्या 'सनातन' या कादंबरीस 'सरस्वती सन्मान' जाहीर झाला. दोन्ही मान्यवरांचे साहित्य परिषद आणि पत्रिकेतर्फे मनःपूर्वक अभिनंदन.

या अंकामध्ये डॉ. जयंत नारळीकरांच्या वाङ्मयावरील प्रा. चिन्मय घैसास यांचा लेख आहे. मुखपृष्ठासाठी छायाचित्र काढण्यास अनुमती दिल्याबद्दल मा.डॉ. जयंत आणि मंगला नारळीकर यांचे आभार मानतो.

विविध विषयांवरील संशोधन लेख, ग्रंथ-समीक्षा लेख, परीक्षणे-रसिक वाचकांच्या पसंतीस उतरतील ही अपेक्षा आहे. आपल्या अभिप्रायाची आम्हाला नेहमीच प्रतीक्षा असते. आपल्या अभिप्रायांनी काम करण्याची उमेद वाढते.

करोनाच्या महासाथीत गतवर्षात महाराष्ट्रातील सर्व साहित्यसंस्थांच्या अनुदानात सरकारने घट केली आहे. केवळ १०% अनुदान मिळाले आहे. उर्वरित ९०% अनुदान मिळणार नाही असे वृत्तपत्रांतून वाचनात आले. मा. मुख्यमंत्री उद्धवजी ठाकरे आणि मा. उपमुख्यमंत्री अजितदादा पवार यांना साहित्यसंस्थांचे थकित अनुदान त्वरित देऊन या साहित्यसंस्थांना सावरावे हे विनंतीपूर्वक आवाहन करतो.

करोनाच्या दुसऱ्या लाटेमध्ये रुग्णसंख्या दररोज प्रचंड वाढत आहे. सर्वांनी करोना-प्रतिबंधक शासकीय सूचनांचे पालन करावे. आपली व आपल्या कुटुंबाची काळजी घ्यावी. निर्बंधाचे पालन कसोशीने केले, तर सर्व जीवन व्यवहार पूर्ववत होतील ही खात्री आहे.

डॉ. पुरुषोत्तम काळे
चलभाषः ९४०४९३५७१०



अनुक्रमणिका



ख्यातकीर्त खगोलशास्त्रज्ञ आणि विज्ञानकथालेखक जयंत नारळीकर यांची नाशिक येथे होणाऱ्या अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलनाच्या अध्यक्षपदी एकमताने निवड झाली त्यानिमित्ताने नारळीकरांच्या साहित्याचा घेतलेला वेध.

# जयंत नारळीकरः व्यक्ती आणि वाङ्मय

प्रा. चिन्मय मधू घैसास

मानवी जीवनाला चहूबाजूने वेढून घेणारे एक गूढ वलय म्हणजे विज्ञान. मानवाच्या उत्क्रांतीपासून आजवर विज्ञानातील शोधांमुळे आणि संशोधनामुळे मानवाचे जीवन अधिकाधिक सुकर झाले आहे. त्यामुळेच विज्ञानाविषयी एक स्वाभाविक कुतूहल आणि जिज्ञासा मानवाच्या मनात सदोदित राहिली आहे. अलीकडच्या काळात विज्ञान-तंत्रज्ञानाच्या क्षेत्रात झपाट्याने होणाऱ्या बदलांमुळे समाजाचा वैज्ञानिक दृष्टिकोन वाढीस लागण्यास मदत झाली आहे. विज्ञानसाहित्य हा मराठीतील अगदी अलीकडचा साहित्यप्रवाह आहे. प्रचलित विज्ञानाचा, संशोधनांचा आधार घेऊन त्याद्वारे वैज्ञानिक शक्यतांचा आढावा घेणारे, कल्पना करणारे साहित्य आणि कलाकृती अलीकडे अधिकाधिक प्रमाणात निर्माण होऊ लागल्या आहेत. त्यात दिसून येणारे नावीन्य आणि वैविध्य विशेष उल्लेखनीय आहे. गतकाळाच्या तुलनेत आज विज्ञानाचा प्रसार आणि प्रचार अधिक प्रमाणात झाला आहे, त्याचेच हे द्योतक म्हणावे लागेल. या नवनवीन साहित्य आणि कलाकृतींमुळे समाजाचा विज्ञान आणि विज्ञानसाहित्याकडे बघण्याचा दृष्टिकोन निश्चितच बदलतो आहे.

मराठीतील विज्ञान साहित्य १९व्या शतकाच्या शेवटच्या टप्प्यात सुरू झाल्याचे आढळते. विज्ञानाचे सिद्धांत आणि शास्त्रशुद्ध माहिती पोचवण्याचा हेतू त्यामागे होता. अनेक इंग्रजी ग्रंथांचा अनुवाद करून अशी माहिती वाचकांपर्यंत पोहोचवली जात होती. पदार्थविज्ञान, रसायनशास्त्र, वनस्पतिविज्ञान, प्राणिविज्ञान, वैद्यकशास्त्र, कृषिविज्ञान, गणित आणि ज्योतिर्विज्ञान अशा विज्ञानशाखांची शास्त्रीय पद्धतीची माहिती देण्याचा प्रयत्न यातून झालेला दिसतो.

२० व्या शतकाच्या उत्तरार्धात निव्वळ विज्ञानविषयक माहिती नव्हे तर मनोरंजन आणि प्रबोधन हा हेतू डोळ्यांसमोर ठेवून विज्ञानविषयक लेखन सुरू झाले. त्यात प्रामुख्याने डॉ. जयंत नारळीकर यांच्या लेखनाचा विचार करावा लागतो. विज्ञानसाहित्य हा प्रकार मराठीत रुजवण्याचे महत्त्वाचे कार्य नारळीकरांनी केले. नवनवीन शोधांचा जगाला होणारा परिचय आणि त्याबद्दलचे मानवी कुतूहल यांतूनच अशा तऱ्हेच्या लेखनाला प्रेरणा मिळाली. मानवाच्या दैनंदिन अनुभवापलीकडे असणारे कल्पित जग आणि त्याचे असणारे कुतूहल विज्ञानसाहित्यात येणे स्वाभाविक आहे. प्रस्थापित आणि प्रचलित विज्ञान सिद्धांतांच्या आधारे आगामी काळातील मानवी जीवनाची कल्पना करून त्याचे शब्दचित्र रेखाटणे हे विज्ञानसाहित्याचे कर्तव्य आहे. हे करीत असता विज्ञानाची माहिती देण्याबरोबरच लालित्यपूर्ण पद्धतीने कथानक



अनुक्रमणिका



**'अभयारण्य' ही कादंबरी पर्यावरणविषयक जाणिवांकडे लक्ष वेधून घेते. तंत्रज्ञानाच्या अति वापरामुळे होणारे पर्यावरणावरील परिणाम तसेच त्याबाबतची मानवाची बेपर्वाई या कादंबरीत मांडली आहे. परक्या जीवसृष्टीचे प्रतिनिधी पृथ्वीवर सजीवसृष्टीचे बीजारोपण करतात आणि एखाद्या अभयारण्याप्रमाणे त्यात कोणताही हस्तक्षेप न करता त्याच्या विकासाकडे लक्ष ठेवतात, अशी संकल्पना या कादंबरीत मांडली आहे.**

रंगवणे तसेच, जयंत नारळीकरांच्या शब्दांत सांगायचे, तर विज्ञानाची शर्करावगुंठित गोळी रसिकांना देणे हा त्याचा मुख्य हेतू असला पाहिजे. स्वत: आंतरराष्ट्रीय ख्यातीचे वैज्ञानिक असलेल्या नारळीकरांनी केलेल्या लेखनाचा खूप मोठा परिणाम समाजावर झालेला दिसतो. आजही मराठी विज्ञानसाहित्य आणि जयंत नारळीकर हे एक समीकरण आहे. वैज्ञानिक म्हणून कोवळ्या वयापासून नारळीकरांनी जे संशोधन केले आणि त्याचा जो दबदबा निर्माण झाला त्यामुळे त्यांच्या साहित्यलेखनाला वेगळेच महत्त्व आणि वलय प्राप्त झाले आहे. एखाद्या सर्वसामान्य व्यक्तीने विज्ञानविषयक मांडणी करणे आणि एखाद्या वैज्ञानिक, संशोधकाने अशी मांडणी करणे यात खूप मोठा फरक असतो. याच कारणामुळे डॉ. जयंत नारळीकर यांच्या विज्ञानसाहित्याचा विशेष अभ्यास करण्याची गरज आहे.

**नारळीकरांचे विज्ञान-कथासंग्रह :**

डॉ. जयंत नारळीकरांच्या कथासंग्रहांत यक्षांची देणगी, अंतराळातील भस्मासुर, टाईम मशीनची किमया या साहित्यकृतींचा समावेश होतो. सर्जनशील लेखन करणाऱ्या कोणत्याही व्यक्तींच्या लेखनामागे व्यक्तिगत अनुभव, आवडीनिवडी, शिक्षण, विचारधारा या गोष्टी असतात. नारळीकर स्वत: खगोलशास्त्रज्ञ असल्यामुळे त्यांच्या लेखनातील कथाबीज याच खगोलशास्त्राच्या पार्श्वभूमीवर उमललेले दिसून येते. आपले लेखन विज्ञानविषयक प्रबोधनाच्या उद्देशाने आहे अशी भूमिका नारळीकरांनी मांडली आहे. 'यक्षांची देणगी' आणि 'अंतराळातील भस्मासुर' या कथासंग्रहांना खगोलशास्त्राची पार्श्वभूमी लाभलेली आहे. या दोन्ही साहित्यकृती नारळीकरांनी ज्या काळात लिहिल्या त्या काळातील त्यांचे वैज्ञानिक कार्य लक्षात घेता खगोलशास्त्र हाच त्यांच्या या साहित्यकृतींचा केंद्रबिंदू ठरणे स्वाभाविक आहे. विज्ञानसाहित्यात अज्ञाताच्या गूढाला एक विशेष स्थान आहे. अज्ञाताचे कुतूहल, त्याविषयीची जिज्ञासा यांतून स्पेक्युलेटिव्ह फिक्शन म्हणजेच ज्ञात माहितीच्या आधारे भविष्यकाळाची कल्पना करणारे विज्ञानसाहित्य निर्माण झालेले दिसते. नारळीकरांच्या पहिल्या दोन कथासंग्रहांतील बहुतेक कथांतून बाह्य सृष्टीतील या गूढाची चर्चा झालेली दिसते. 'टाईम मशीनची किमया' या कथासंग्रहात भविष्यकाळाचा वेध घेणारी मांडणी नारळीकरांनी केलेली आहे. नारळीकरांच्या आधीच्या कथासंग्रहांच्या लेखनकाळाच्या तुलनेत या कथासंग्रहाच्या लेखनकाळापर्यंत जागतिक स्तरावर बराच वैज्ञानिक विकास झालेला होता, त्यामुळे कालप्रवास ही नावीन्यपूर्ण संकल्पना त्यांनी या कलाकृतीत केंद्रवर्ती ठेवलेली दिसते. मानवाच्या हातून झपाट्याने होणाऱ्या वैज्ञानिक प्रगतीचा भविष्यात होणारा परिणाम त्यांनी कल्पनेने रेखाटलेला आहे. पर्यावरणाचा होणारा ऱ्हास, त्याचा मानवी जीवनावर होणारा परिणाम याचाही विचार या कथांतून केलेला दिसतो. कोणताही माणूस आपल्या गतानुभवांच्या जोरावर भविष्याकडे पाहत असतो. नारळीकरांनीही त्याच पद्धतीने भविष्याचा विचार मांडलेला आहे.

नारळीकरांच्या कथासंग्रहातील भाषा ही कथानकाला साजेशी आहे. कथानक ओघवत्या भाषेत लिहिलेले आहे. त्यांच्या कथांतील पात्रे अनुरूप आहेत. त्या-त्या कथानकाला साजेशी नावे त्या पात्रांना दिलेली दिसून येतात. कथानकाच्या दृष्टीने पात्रांच्या तोंडी काही वैज्ञानिक संदर्भ, संज्ञा येतात. यामुळे वैज्ञानिकतेचा धागा अतूट राहतो. आपण निव्वळ एक काल्पनिक कलाकृती वाचत नाही तर विज्ञान साहित्यकृती वाचतोय याचा प्रत्यय टप्प्याटप्प्यावर वाचकाला येतो, त्यामुळे विज्ञानाची वीण कुठेही क्षीण होत नाही. या कथांतून विज्ञान प्रभावीपणे मांडले गेले आहे. बहुतेक कथांचा केंद्रबिंदू हा खगोलशास्त्र असला तरी खगोलशास्त्रातील विविध संकल्पना वेगवेगळ्या कथांच्या माध्यमातून त्यांनी अधोरेखित



छायाचित्र । जयदीप कडू

करण्याचा प्रयत्न केला आहे, त्यामुळे या वैज्ञानिक घटकांची शास्त्रीय माहिती जाणून घेण्याची उत्सुकता निश्चितच वाचकाच्या मनात निर्माण होते. मनोरंजनातून प्रबोधन हे विज्ञानसाहित्याचे प्रमुख कर्तव्य आहे आणि त्या कामी नारळीकरांच्या कथा ही दोन्ही उद्दिष्टे प्रभावीपणे साध्य करतात.

**नारळीकरांच्या विज्ञान–कादंबऱ्या :**

डॉ. जयंत नारळीकरांच्या विज्ञान कादंबऱ्यांत प्रेषित, वामन परत न आला, व्हायरस, अंतराळातील स्फोट, आणि अभयारण्य या कादंबऱ्यांचा समावेश होतो. 'प्रेषित' कादंबरीत परग्रहवासी आणि पृथ्वीचा संबंध दर्शवताना मानवी अस्तित्व, वसाहतवाद यांचाही उल्लेख येतो. पृथ्वीबाहेर खरोखरीच जीवसृष्टी असलीच, तर त्याचा मानवाच्या जीवनावर काय परिणाम होईल याचा एक काल्पनिक वेध या कादंबरीत घेतलेला आहे. विचारक्षम यंत्रमानव हे 'वामन परत न आला' या कादंबरीचे आशयसूत्र आहे. 'अंतराळातील स्फोट' ही कादंबरी तीन वेगवेगळ्या कालखंडांचा वेध घेत मानवी उत्क्रांती, बाह्य अवकाशातील शक्तींचा पृथ्वीवर होणारा परिणाम या घटकांचा विचार मांडते. सुपरनोव्हा (अवकाशात होणारा महाकाय स्फोट) या खगोलीय घटनेचा प्रत्यय मानवाने घेतल्याचे उल्लेख सापडतात. त्याच सुपरनोव्हा या विषयाकडे वाचकांचे लक्ष वेधून त्याविषयी माहिती देण्याचा आणि जिज्ञासा, कुतूहल निर्माण करण्याचा प्रयत्न यशस्वीपणे या कादंबरीने केलेला आहे. मानवी प्रगतीचा, मानवाच्या यंत्रावलंबी स्वभावाचा उल्लेख 'व्हायरस' कादंबरीत होतो. प्रगत यंत्रणेत बिघाड निर्माण करणारा, परकीय जीवांनी निर्माण करून प्रसारित केलेला व्हायरस या कादंबरीच्या कथानकाचा केंद्रबिंदू आहे. ज्या काळात ही कादंबरी लिहिलेली आहे त्या काळात संगणक आणि तदनुषंगिक तंत्रज्ञान यांचा झालेला विकास यामुळे कथाबीजात एक वेगळेपण जाणवते. खगोलशास्त्रातील घटकांचा आणि कल्पनांचा सद्यकाळातील विज्ञान–तंत्रज्ञानाशी या कादंबरीने प्रभावीपणे संबंध जोडला आहे. परकीय जीवांचे अस्तित्व आणि त्याचा मानवी जीवनावरील प्रभाव यांचा उल्लेख करतानाच, अशी अवस्था भविष्यात खरोखरीच उद्भवली, तर संपूर्ण जगाला कशाप्रकारे एकसंध रहावे लागेल याची सूचनाही ही

कादंबरी करते. मानवाच्या आचार-विचारांत विकृती आणणारे षड्रिपूंसारखे वेगवेगळे विषाणू म्हणजेच व्हायरस आणि त्याचा मानवी जीवनावरील परिणाम याच्याशीही या कथासूत्राची नाळ जोडता येते. 'अभयारण्य' ही कादंबरी पर्यावरणविषयक जाणिवांकडे लक्ष वेधून घेते. तंत्रज्ञानाच्या अति वापरामुळे होणारे पर्यावरणावरील परिणाम तसेच त्याबाबतची मानवाची बेपर्वाई या कादंबरीत मांडली आहे. परक्या जीवसृष्टीचे प्रतिनिधी पृथ्वीवर सजीवसृष्टीचे बीजारोपण करतात आणि एखाद्या अभयारण्याप्रमाणे त्यात कोणताही हस्तक्षेप न करता त्याच्या विकासाकडे लक्ष ठेवतात, अशी संकल्पना या कादंबरीत मांडली आहे. ब्रह्मांडात, पृथ्वीबाहेरील अवकाशात एखाद्या अज्ञात ठिकाणी जीवसृष्टी असण्याची शक्यता अनेक संशोधकांनी व्यक्त केली आहे. त्याबद्दलचे दाखलेही त्यांनी दिलेले आहेत. एरिक वॉन डेनिकनने आपल्या 'चॅरियट्स ऑफ द गॉड्स' या ग्रंथात परग्रहवासींच्या अस्तित्वाचे दाखले सचित्र मांडून दाखवण्याचा प्रयत्न केला आहे. पृथ्वीवरच्या जीवसृष्टीवर या परग्रहवासींचा प्रचंड प्रभाव असण्याबरोबरच पृथ्वीचे नियंत्रणही हे परग्रहवासी करतात असा दावादेखील अनेक संशोधकांनी केला आहे. याच मतांच्या जवळ जाणारी कथानके नारळीकरांच्या साहित्यकृतींत सापडतात. एरिक वॉन डेनिकनची मते आपणास मान्य नाहीत, असे नारळीकरांनी म्हटले आहे तरी त्यांच्या कथानकांतील कथाबीजाचे बहुतांशी साम्य डेनिकनच्या मांडणीला समांतर जाताना दिसते.

नारळीकरांच्या कादंबऱ्यांची भाषाशैली ओघवती आणि कथानकाला पूरक आहे. पात्रांची नावे आणि त्यांचे चित्रण करताना नारळीकरांच्या व्यक्तिगत जीवनातील व्यक्तींच्या गुण-दोषांचे अनुभव पात्रांच्या ठिकाणी आलेले जाणवतात. या कादंबऱ्यातील संवाद, वातावरण वास्तवाशी सुसंगती निर्माण करतात. कादंबरीतील कथानकाच्या माध्यमातून सामाजिक, सांस्कृतिक, भौगोलिक वास्तवाकडेही नारळीकर लक्ष वेधून घेतात. मनोरंजनाबरोबरच प्रबोधन करत असता भविष्याचा वेध घेण्याची वृत्ती वाचकामध्ये ते निर्माण करतात. सद्यकाळाचा विचार करता भविष्यात काय परिस्थिती ओढवू शकते याची कल्पना वाचकाला करवून ते त्याच्या मनात सजगता निर्माण करतात. समाजाला सतर्क करण्याचा, भानावर आणण्याचा त्यांचा हा प्रयत्न उल्लेखनीय आहे.

**नारळीकरांच्या संशोधन कार्याचा साहित्यावरील प्रभाव–** डॉ. जयंत नारळीकर यांच्या संशोधन कार्याचा थेट संबंध त्यांच्या साहित्यावर दिसून येतो. कथाबीज निवडीचा विचार करता खगोलशास्त्र हा बहुतांश साहित्यकृतींच्या केंद्रस्थानी असणारा विषय आहे. खगोलशास्त्रज्ञ म्हणून केलेले काम, आलेले विविध अनुभव, भेटलेली माणसे यांचे प्रतिबिंब त्यांच्या कथानकांत, पात्रांत, संवादांत, वातावरणनिर्मितीत दिसून येते. शास्त्रज्ञ म्हणून कार्य करत असता त्यांचा बहुतेक व्यवहार हा इंग्रजीत झालेला आहे. जगाच्या वेगवेगळ्या प्रदेशांत त्यांचे वास्तव्य आणि कार्य झाले आहे. याचाच प्रत्यय त्यांच्या कलाकृतींतही दिसून येतो. देशविदेशांतील वैविध्यपूर्ण माणसे, त्यांचे स्वभाव, घटनाप्रसंगांची आणि स्थळांची निवड याचे होणारे चित्रण याचेच द्योतक आहे. शास्त्रीय संशोधन आणि मांडणीबरोबरच मराठीतून त्यांनी केलेले विज्ञानविषयक लेखनही त्यांच्या कार्याला पूरक ठरले आहे. विज्ञानाची गरुडझेप, विज्ञान आणि वैज्ञानिक, याला जीवन ऐसे नाव यांसारख्या लेखसंग्रहातून नारळीकरांनी विज्ञानाची शास्त्रीय मांडणीदेखील प्रभावीपणे केली आहे. विज्ञानसाहित्यकृतींतून नारळीकरांनी ज्या विज्ञानविषयक मुद्द्यांची चर्चा केली आहे त्यांच्याविषयीची पूर्णपणे शास्त्रीय माहिती साध्यासोप्या भाषेत त्यांनी या लेखमालेत दिली आहे. वैज्ञानिकांचा दृष्टिकोन, वैज्ञानिक कार्य, त्या क्षेत्रातील विशिष्ट अनुभव यांचाही विचार नारळीकरांनी मांडलेला आहे. आपल्या व्यक्तिगत जीवनातील अनुभवांनादेखील नारळीकरांनी या लेखांत शब्दबद्ध केले आहे. त्यामुळे वैज्ञानिक म्हणून झालेल्या त्यांच्या जडणघडणीमागील पार्श्वभूमीदेखील लक्षात येते. सर्जनशील लेखकासाठी जशी संवेदनशील आणि सजग, सतर्क, चौकस नजर आवश्यक असते तशीच ती वैज्ञानिकालाही असते आणि या पार्श्वभूमीवर आपल्या जीवनानुभवांचे वर्णन नारळीकर करतात. ललित विज्ञानसाहित्य लेखनातून मनोरंजन आणि लेखसंग्रहातून प्रबोधन अशी उल्लेखनीय दुहेरी भूमिका त्यांनी बजावलेली दिसते. मनोरंजन आणि प्रबोधन या



अनुक्रमणिका












आपल्या तत्त्वाला नारळीकरांनी अशा प्रकारे न्याय दिलेला दिसतो.

**निरीक्षणे**

विज्ञानसाहित्य हे उद्बोधक आणि मनोरंजक असावे असे नारळीकरांचे मत आहे. त्यांचे साहित्य या दोन्ही गरजा पूर्ण करते. काही ठिकाणी अति शास्त्रीय स्वरूपाचे वर्णन आले आहे, त्यामुळे काही साहित्यकृतींतील काही भाग शास्त्रीय विवेचनागत वाटतो. आपली भाषा फारशी चांगली नाही, आपल्याकडे सराईत लेखक म्हणून पाहू नये असे नारळीकर म्हणतात. साहित्य या अर्थाने लेखनप्रकारांच्या आकृतिबंधाची जाणीवही आपल्याला फारशी नाही असेही नारळीकर म्हणतात; परंतु त्यांच्या लेखनात असे फारसे जाणवत नाहीत. काही अपवाद सोडल्यास त्यांचे लेखन प्रासादिक, सोपे असल्याचे जाणवते. उलट, 'प्रतिष्ठित लेखकांना विनंती आहे, की त्यांनी या क्षेत्रात शिरावे आणि त्याला प्रतिष्ठा मिळवून द्यावी' असे म्हणताना साहित्यविषयक जाणीव समृद्ध असलेल्यांनी विज्ञानसाहित्याच्या क्षेत्रात प्रवेश करावा, असे नारळीकरांनी केलेले आवाहन नव्या काळातील नवोदित लेखकांसाठी महत्त्वाचे आहे. वैज्ञानिक दृष्टिकोन अधिक व्यापक असलेल्या आजच्या काळातील नवोदित लेखकांनी याचा विचार करून विज्ञानसाहित्यात नवी भर घालण्यासाठी पुढे येण्याची गरज आहे.

विज्ञानसाहित्यातील आशय दुर्बोध किंवा किचकट, क्लिष्ट असल्याचे मत अनेकदा व्यक्त होते. या ठिकाणी लक्षात घेण्याचा मुद्दा म्हणजे विज्ञान आणि त्यातही खगोलशास्त्र हा विषयच फार क्लिष्ट आहे. त्यातून त्याला ललित साहित्यात समाविष्ट करून त्याची कलात्मक मांडणी करणे हे मुळातच जिकिरीचे काम आहे. त्या मानाने नारळीकरांनी आपले विज्ञानानुभव आणि भाषाकौशल्य यांचा योग्य, संतुलित समन्वय साधून उत्तम सांधणी केली आहे. वाचकाला अनेकदा या कलाकृतींतील विज्ञानविषयक घटकांची पुसटशी कल्पनाही नसते त्यामुळे कलाकृती दुर्बोध वाटण्याचा संभव असतो. संशोधक म्हणून नारळीकरांनी केलेल्या कार्याचा प्रभाव त्यांच्या लेखनातील आशय, अभिव्यक्ती आणि भाषाशैलीवर पडणे स्वाभाविक आहे हेही लक्षात घेतले पाहिजे.

परग्रहवासी जीवांचे अस्तित्व आणि मानवापेक्षा त्यांची क्षमता प्रचंड अधिक असल्याचे मानणाऱ्या अनेक शास्त्रज्ञांनी, खगोल अभ्यासकांनी झू (प्राणीसंग्रहालय) सिद्धांताचा तर्क मांडलेला आहे. पृथ्वी म्हणजे एक प्रकारचे प्राणीसंग्रहालय आहे आणि त्यावर अतिप्रगत परग्रहवासी नियंत्रण ठेवून आहेत असा तर्क हा सिद्धांत मांडतो. नारळीकरांच्या अभयारण्य कादंबरीतील कथानक याच तर्काशी समांतर जाते. असे असले तरीदेखील एरिक वॉन डेनिकनसारख्या शास्त्रज्ञ विचारवंतांच्या मताशी नारळीकर



अनुक्रमणिका







सहमत नाहीत हेही इथे लक्षणीय ठरते. खगोलशास्त्राला विशेष केंद्रस्थानी ठेवून नारळीकरांनी विज्ञानसाहित्य लेखन केलेले असले तरी त्यांच्या लेखनातून विज्ञानाच्या सर्वच शाखांचा उल्लेख होतो. मनोरंजन आणि प्रबोधन या दोन्ही उद्दिष्टांची पूर्तता करण्याच्या हेतूने नारळीकरांनी केलेले कार्य विज्ञानसाहित्याच्या पुढील वाटचालीला निश्चितच दिशादर्शक आणि प्रेरणादायी ठरणारे आहे.

**समारोप**

मराठी विज्ञानसाहित्याची वाटचाल आज जवळपास एक शतक पूर्ण करून पल्याड पोचली आहे. गेल्या शतकभराच्या काळात विज्ञानात अनेकविध क्रांतिकारी बदल आणि संशोधने झाली आहेत. त्यांचा उल्लेख आणि विचार विविध विज्ञानसाहित्यकृतींतून झालेला दिसतो. विज्ञानसाहित्य हा प्रकार मराठीत प्रस्थापित करण्याचा मान डॉ. जयंत नारळीकरांना जातो. त्यांच्या कार्यामुळे आणि विज्ञानसाहित्य लेखनामुळे विज्ञानाकडे बघण्याचा दृष्टिकोन मोठ्या प्रमाणात बदलला आहे. आज एकविसाव्या शतकात विज्ञानाने आमूलाग्र बदल अनुभवलेला आहे. विज्ञानाचा प्रसार आणि प्रचार प्रचंड झपाट्याने होत आहे. विज्ञानसाहित्य आज कथा-कादंबऱ्यांच्या चौकटीतून बाहेर पडून विज्ञान-मालिका आणि विज्ञान-चित्रपटांच्या माध्यमातून लोकांच्या समोर येऊ लागले आहे. विज्ञानातील नवनवीन बदलांचा वेध या माध्यमांतून घेण्याचा प्रयत्न केला जात आहे. आशय आणि अभिव्यक्ती या दोन्हींच्या पातळ्यावर विज्ञानसाहित्यकृती काळानुरूप समाजासमोर येत आहेत. नारळीकरांसारख्या विज्ञानलेखकांच्या कार्याचेच हे फलित आहे असे म्हणावे लागेल. विज्ञानसाहित्याने आपले महत्त्व आणि प्रभाव दाखवून दिलेला आहे. त्याला येत्या काळात अधिकाधिक प्रतिष्ठा लाभण्याची गरज आहे. अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलनाच्या अध्यक्षपदी डॉ. जयंत नारळीकरांची झालेली निवड हे या दृष्टीने पडलेले पहिले पाऊल आहे. साहित्यिक आणि सामाजिक स्तरावरून विज्ञानसाहित्याला सकारात्मक आणि पोषक प्रतिसाद मिळाल्यास मराठी साहित्यातील हा विज्ञान-साहित्यप्रवाह अधिकच समृद्ध होईल.

**संदर्भ :**

१) घाटे निरंजन, विज्ञानवाङ्मय (लेख), मराठी वाङ्मयाचा इतिहास : खंड ७ - भाग १, महाराष्ट्र साहित्य परिषद

२) डॉ. व. दि. कुलकर्णी, निरंजन घाटे (संपा.), विज्ञानसाहित्य आणि संकल्पना, नीहारा प्रकाशन, प्रथमावृत्ती-ऑक्टोबर १९९०

३) पगारे म. सु., मराठी विज्ञानसाहित्य, प्रशांत पब्लिकेशन, प्रथमावृत्ती-२००४

४) घाटे निरंजन, मराठीतील निवडक कथा (संपा.प्रस्तावना), स्नेहवर्धन प्रकाशन, पुणे, प्रथमावृत्ती- २००१

५) कदम दीपा, मराठी विज्ञानकादंबरी : एक वाङ्मयीन अभ्यास, (पी.एच.डी. प्रबंध), गोवा विद्यापीठ, २०१३

६) नारळीकर जयंत, विज्ञान आणि वैज्ञानिक, श्रीविद्या प्रकाशन, पुणे, १९९२

७) नारळीकर जयंत, प्रेषित, मौज प्रकाशन, तिसरी आवृत्ती, जून १९९७

८) नारळीकर जयत, वामन परत न आला, मौज प्रकाशन, पाचवी आवृत्ती, ऑगस्ट २००३

९) नारळीकर जयंत, अंतराळातील स्फोट, साहित्य अकादमी, दिल्ली, प्रथमावृत्ती- १९९२

१०) नारळीकर जयंत, व्हायरस, मौज प्रकाशन, चौथी आवृत्ती, जून २००६

११) नारळीकर जयंत, अभयारण्य, मौज प्रकाशन, पहिली आवृत्ती, १५ मे २००२

१२) नारळीकर जयंत, यक्षांची देणगी, मौज प्रकाशन, नववी आवृत्ती, मार्च २०११

१३) नारळीकर जयंत, अंतराळातील भस्मासुर, श्रीविद्या प्रकाशन, पुणे, दहावी आवृत्ती, ऑक्टोबर

१४) नारळीकर जयंत, टाईम मशीनची किमया, श्रीविद्या प्रकाशन, पुणे, चतुर्थावृत्ती, ऑगस्ट २०१५

१५) नारळीकर जयंत, विज्ञानाची गरुडझेप, श्रीविद्या प्रकाशन, पुणे, सहावी आवृत्ती, २०१०

१६) नारळीकर जयंत, विज्ञान आणि वैज्ञानिक, श्रीविद्या प्रकाशन, पुणे, २६ जानेवारी १९९२

१७) नारळीकर जयंत, याला जीवन ऐसे नाव, श्रीविद्या प्रकाशन, पुणे, १९ जुलै १९९८

**प्रा. चिन्मय मधू घैसास**
सहायक प्राध्यापक, मराठी विभाग,
गोवा विद्यापीठ ताळेगाव- गोवा ४०३२०६
चलभाषः ९८२३७२८६४०
chinmay@unigoa.com





# नवोदितांचा मार्गदर्शक हरवला

ख्यातकीर्त समीक्षक,
बोलींचे संशोधक आणि महाराष्ट्र साहित्य
परिषदेचे माजी कार्यकारिणी सदस्य
प्राचार्य डॉ. किसन पाटील
यांचे नुकतेच निधन झाले.
त्यांच्या कर्तृत्वाचा आणि व्यक्तिमत्त्वाचा वेध
घेणारा श्रद्धांजलीपर लेख.

डॉ. अशोक कौतिक कोळी

दि. २ फेब्रुवारी २०२१ ला माझ्या साहित्यावर संशोधन करणारे संशोधक-अभ्यासक श्री. पी. जी. पालंचेवार (रा. धर्माबाद, जि.नांदेड) हे पूर्व नियोजनानुसार माझ्याकडे जामनेरला सपत्नीक आलेले होते. त्यांना माझी मुलाखत घ्यायची होती आणि वाङ्मयीन चर्चा करायची होती. चर्चा झाली, मुलाखत वगैरे आटोपून आम्ही माझ्या गावी सुनसगावला- लेखकाचा गाव, परिसर पाहण्यासाठी म्हणून निघालो होतो. वाटेत नेरीचा बाजार आम्ही पाहिला, जो माझ्या साहित्यातून नेहमीच डोकावून राहिलाय. बाजारातील तावडी बोलीतील व्यवहार व वैशिष्ट्यपूर्ण पेहराव पाहून पालंचेवार सुखावले. आपण वाचत असलेल्या साहित्यातील माणसे, प्रदेश, बोली व्यवहार प्रत्यक्ष पाहून त्यांना अपूर्व आनंद मिळाला.

हा आनंद द्विगुणीत करण्यासाठी आम्ही प्रत्यक्ष लेखकाच्या म्हणजे माझ्या गावाच्या वाटेने निघालो. नेरी सोडून सुनसगावच्या दिशेने चालू लागलो. थोड्याच वेळात आमच्या गावचा फाटा आला. तेथील रम्य परिसर व भवानी मातेचे दर्शन आम्ही आटोपले. तोच आमच्या आनंदावर विरजण पडणारी घटना घडली. घटना मला जबर धक्का देणारी होती. त्या संदर्भातील बातमी माझ्या कर्णपटलावर आदळू लागली. सव्वा पाच वाजण्याच्या सुमारास एकाच वेळी मला किरण डोंगरदिवे, नीळकंठ गायकवाड, एकनाथ आव्हाड, आबा महाजन, डॉ. वासुदेव वले, वीरभद्र मिरेवाड आणि नामदेव कोळी या मित्रांचे फोन आले. या सर्वांचे म्हणणे असे होते, की फेसबुकवर प्राचार्य डॉ. किसनराव पाटील (जळगाव) यांच्या निधनाची पोस्ट फिरत आहे. बातमी खरी आहे का?

मी तर त्यांच्या अशा विचारण्याने अवाक् झालो. हबकून गेलो. असे कसे घडू शकते? अजातशत्रू किसनराव पाटील सरांच्या मृत्यूची बातमी कशी येऊ शकते? कारण नजीकच्या काळात किंवा इतर वेळीही कधीही त्यांनी तब्येतीची तक्रार केलेली नव्हती. निवृत्तीनंतरही सरांची तब्येत अगदी ठणठणीत होती. कसलीही गोळी त्यांना सुरू नव्हती. कसलेही व्यसन नाही, व्यायामाचा नियमित सराव व सकारात्मक ऊर्जेचा स्रोत त्यांच्या ठायी सदैव भरलेला असल्याने त्यांची तब्येत अगदी ठणठणीत होती, त्यामुळे माझा अशा बातमीवर विश्वास बसला नाही. बसणारच नव्हता. मात्र मित्रांकडून वारंवार विचारणा होऊ लागल्याने मी विचलित झालो. बातमीची खातरजमा करू लागलो. खात्री करून घेण्यासाठी प्रत्यक्ष किसन पाटील सरांच्याच मोबाईलवर संपर्क केला.

प्रतिसाद मिळाला नाही. माझा फोन सरांनी उचलला नाही, असे कधी झाले नव्हते, त्यामुळे माझी शंका बळावली व लगोलग प्रकाशक मित्र युवराज माळी यांना फोन केला. युवराज माळी यांनी फोन उचलला. त्या वेळी ते सरांच्या परिवारासोबतच होते. जळगावच्या ओम

क्रिटिकल सेंटरच्या परिसरात. त्यांच्याकडून कळले, की बातमी खरी आहे. सरांना पंचवीस तारखेपासून येथे दाखल केलेले होते. खोकल्याची उबळ वाढलेली होती. न्यूमोनियाची लागण झालेली होती. उपचारा दरम्यान आज आता थोड्या वेळापूर्वी म्हणजे पावणेपाचच्या सुमारास त्यांनी अखेरचा श्वास घेतला. पंधरा मिनिटांपूर्वीच सरांची प्राणज्योत मालवली, असं त्यांनी सांगितलं.

त्यांच्याकडून बातमीस दुजोरा मिळाला आणि मी पुरता हादरलो, हताश झालो. जागेवरच मला दरदरून घाम फुटला. असे कसे होऊ शकते? सर, तुम्ही आम्हाला सोडून असे कसे जाऊ शकता? माझे मन हे कटू सत्य मानायला तयार होत नव्हते; पुरता निराश, हताश झालो होतो. असं कसं घडलं? सर, अचानक हे जग सोडून कसे गेले ? असंख्य प्रश्नांचे मोहळ माझ्या मनात उठले. क्षणात सरांच्या आठवणींनी मन गलबलून गेले. कुठे होतो आपण... हे काय घडून गेले... घटना सत्य होती; पण मन मानायला तयार होत नव्हतं. मानणार तरी कसं होतं माझं मन? माझ्या मनाची जडणघडण सर तुम्ही केलेली होती. माझ्या मनावर सर तुम्ही अधिराज्य गाजवलेलं होतं; नव्हे माझा मनःपिंड, माझी जडणघडण- साहित्य व जीवन प्रवास आपण घडवलेला होता...

मला लख्ख आठवले त्या क्षणी सर्व काही... कुठलाही शैक्षणिक, वाङ्मयीन वारसा नसलेला मी... तोडक्या मोडक्या शब्दांत कथा- कविता करू लागलेलो होतो... माझा पहिलाच कथासंग्रह 'कूड' नुकताच प्रकाशित झालेला होता. त्याच्या प्रती घेऊन मी जळगावी आलेलो होतो. स्व. नारायणदादा शिरसाळे यांना प्रथम मी भेटलो होतो. तेव्हा नारायण शिरसाळे सर महाराष्ट्र साहित्य परिषदेचे जळगाव जिल्हा प्रतिनिधी व जिल्हा शाखेचे अध्यक्ष होते. सरांचा स्वभाव सुसंस्कृत व मनमिळाऊ होता. नवोदिताना योग्य मार्गदर्शन करणे व योग्य दिशादर्शन करणे हे त्यांच्या स्वभावात होते. 'खानदेशात गद्य लेखन करणारे खूप कमी लेखक आहेत. शिवाय तुमच्या लेखनात काहीतरी दम दिसतो आहे. तुमच्या लेखनाची योग्य समीक्षा झाल्यास तुम्हाला नावलौकिक जरूर मिळू शकतो;' असे सूचनावजा भाकीत नारायण शिरसाळे सरांनी त्या वेळी वर्तविले व मला डॉ. किसन पाटील सरांकडे जाण्यास सांगितले.

त्यांच्या सांगण्याचा उद्देश सरळ होता, की तुझ्या



कथासंग्रहाची उचित समीक्षा करणारी व दखल घेणारी ही एकमेव व्यक्ती आपल्या जळगावमध्ये आहे. डॉ.किसन पाटील सर हे, त्या वेळी जळगाव येथील नामांकित मुळजी जेठा महाविद्यालयात मराठीचे प्राध्यापक होते. स्व.राजा महाजन, म.ना.अदवंत, सु.का.जोशी यांचा वारसा पुढे चालवत होते. कठोर शिस्तीचे प्राध्यापक आणि एक स्पष्टवक्ता म्हणून त्यांची ख्याती सर्वदूर पसरलेली होती, त्यामुळे भल्याभल्यांची त्यांच्यासमोर जाण्याची हिंमत होत नव्हती. मीही तसा पोरकटच, लाजराबुजरा, संकोची स्वभावाचा असल्याने सरांसमोर कसे उभे राहावे, हा प्रश्न माझ्याही समोर होता; पण नारायण शिरसाळे सरांनी मला हिंमत दिलेली होती, 'तुम्ही सरांना जाऊन भेटा... माझे नाव सांगा... मी पाठवले म्हणून सांगा', असे बजावलेले होते, त्यामुळे मी सरांसमोर उभा राहू शकलो. सरांच्या घराकडे जाऊ शकलो.

डॉ. किसन पाटील सर जळगावच्या शिवकॉलनी भागात राहत होते. आजही त्यांचे तिथे घर आहे. 'अक्षरवेल', ९/ ५४-२, शिवकॉलनी, जळगाव... नारायण शिरसाळे सरांनी दिलेली पत्त्याची चिठ्ठी घेऊन मोटारसायकलीने मी शिवकॉलनी परिसर गाठला होता. सरांचे घर शोधायला जास्त वेळ लागला नव्हता. त्या

परिसरातील सगळेच त्यांना ओळखत होते. शिवाय घराबाहेर वरील आद्याक्षरांची पाटी होती. सरांच्या घराकडे व घरासमोरील तटबंदी लोखंडी दरवाज्याकडे पाहत उभा राहिलो. जणू ती अभेद्य तटबंदी मला न्याहाळत होती. माझी चौकशी करत होती. एकवेळ असा विचार आला, की परत निघून जावे, नको ती चौकशीची कटकट, भलेबुरे अनोळखी बोलणेही ऐकायलां नको.

पण दुसरे मन बजावत होते. इथवर आलायंस, घरात जाण्याची हिंमत कर. तसंच केलं मग मी, हिंमत एकवटून लोखंडी दरवाजा लोटून आत गेलो. घराच्या दरवाजावरील घंटी वाजवली, छातीत धडधड सुरू, तेवढ्यात दरवाजा खाडकन उघडला. माझी भंबेरी उडालेली, दरवाजात साक्षात डॉ. किसन पाटील सर उभे. त्यांनीच दरवाजा उघडला होता. कोण? कुठून आलात? म्हणून चौकशी केली होती. लागलीच सरांनी मला घरात प्रवेश दिला होता. उत्सुकतेने पुढील चौकशी केली होती. मी माझ्या 'कूड' या कथासंग्रहाची प्रत सरांना दिली होती. मी काहीसा जखडूनच बसलो होतो. तुटक तुटक बोलत होतो. सरांनी मात्र मला प्रेमाने समजून घेतले. माझ्यातील संकोच त्यांनी ओळखला होता. त्यांचा प्रतिसाद मात्र प्रेमळ, अभय देणारा होता. ऐकीव दरारा व प्रत्यक्षातील सरांचा सहवास यातील तफावत मला जाणवली व आतून काहीसा सुखावलो.

ही आपली प्रथम भेट. ह्या पहिल्या भेटीतच तुम्ही मला आपलंसं केलं होतं. ज्या रत्नाच्या शोधात मी होतो ते रत्न मला जणू सापडले होते. अत्यानंदाने मी बहरलो, भारावलो होतो. माझा लेखनप्रवास नुकताच सुरू झालेला होता. जुजबी वाचन झालेले होते; मात्र प्रत्यक्ष कुणी मार्गदर्शक, गुरुतुल्य व्यक्तींचा सहवास मला लाभलेला नव्हता. अशा अधिकारी व्यक्तीच्या शोधात मी होतोच. अशा नेमक्या वळणावर सर तुम्ही मला भेटला होतात. हे मी माझे परम भाग्यच समजतो. तेव्हाच मी मनोमन तुमच्या प्रेमात पडलो होतो. तुम्हाला मी आपला गुरू मानले होते.

त्या भेटीतील जुजबी सहवासानंतर मी घरी निघून आलो होतो. या भेटीतच स्व. प्रभाकर श्रावण चौधरी यांनाही मी 'कूड'ची प्रत दिली होती. त्यांनीही माझी व माझ्या कथासंग्रहाची उचित दखल घेतली होती. आपल्याकडून कसा प्रतिसाद मिळतो, याची मी वाट बघत होतो. आठवडाभरातच मला माझ्या सुनसगावच्या घरी तुमचे पत्र आले होते. 'तुमच्या कूड कथासंग्रहावरील समीक्षा लेख तयार आहे. येऊन घेऊन जाणे...' असा त्या पत्राचा आशय होता. पत्र वाचून मी पुरता उडालो होतो. आकाश ठेंगणे होणे काय असते, त्या वेळी मी अनुभवले होते. लगोलग मी तुम्हाला येऊन भेटलो होतो. त्यावेळची आपली भेट मात्र उपदेशाची, अधिकारवाणीची होती. माझ्या कथेतील उणिवा व बलस्थाने तुम्ही मला ह्या भेटीत सांगितली होती. ही भेट आपल्यातील गुरू-शिष्यत्वाचं नातं अधोरेखित करणारी होती, आणि येथूनच हा प्रवास सुरू झाला होता. वारंवार आपल्या भेटी घडू लागल्या होत्या.

तसं पाहिलं तर नवागतांचं स्वागत करणं, त्यांना उचित मार्गदर्शन करणं हे तुमच्या स्वभावाचं वैशिष्ट्यच होतं. मिळालेल्या, आलेल्या कोणाच्याही पुस्तकावर वाचून अभिप्राय देणं, शक्य असेल तर समीक्षालेख लिहिणं, असं तुम्ही करतच होतात. तुमच्या स्वभावाचा आणखी एक अनोखा पैलू होता तो म्हणजे समोर आलेल्याला टराटरा फाडणं... समोरच्या व्यक्तीला तुम्ही अक्षरशः तासून काढायचात. सोलून त्याच्याच समोर ठेवायचात. हे गमक ज्याला उमगले तो तुमच्याशी कायमचा जुळला जायचा. तुमच्या बोलण्यातून समोरच्याला वाट सापडायची. खऱ्या गुरूचे हेच तर कार्य असते. ते तुम्ही केलं. एक मात्र आवर्जून सांगावसं वाटतं. केलेला तोंडी उपदेश किंवा कानउघाडणी तुम्ही कधीही कागदावर उतरवली नाही किंवा जाहीर वाच्यता केली नाही. हे पथ्य तुम्ही आयुष्यभर सांभाळलं!

माझ्याही बाबतीत तसे झाले. तुम्ही मला कठोर शब्दांत शिकवण दिली व प्रेमळ सहवासाची ऊबही दिली. तुमच्यामुळेच मला एम.जे.कॉलेजच्या परिसरात वावरता आले. अनेक विद्वान महनीय व्यक्तींची ओळख झाली. प्रा. देवेंद्र इंगळे, डॉ.लभाने, सुरेश तायडे सर, राणे सर, इत्यादींचा त्यात सहभाग होता. तो परिसरच भारावलेला होता. येथेच तुम्ही माझ्या अनेक कथांना दुरुस्त केले. कथांचे नवे नवे विषय सुचविले. वर्तमान समाजवास्तवाचे आकलन कसे करावे व घडणाऱ्या घटना घडामोडींचा वेध कसा घ्यावा, घटनांचा अन्वयार्थ कसा लावावा हे तुम्हीच मला शिकविले. मराठी विभागात आपले गप्पांचे फड

लागत. 'अशानं आसं व्हतं' ही माझी लेखनशैलीही येथेच आकाराला आली. तावडी बोलीतील अनेक शब्दांची उत्पत्ती तुम्ही मला सांगितली. म्हणी, वाक्प्रचार, लोकोक्तींचा परिचय करून दिला. आपल्या गप्पा सुरू असताना नामदेव कोळी, गोपी धनगर, मोरेश्वर सोनार, ममता हे आणि इतरही अनेक विद्यार्थी कुतूहलाने आसपास रेंगाळत असत.

रूढार्थाने मी तुमचा विद्यार्थी नव्हतो; पण असा काही मी तुमच्याशी जुळलो होतो, की या हृदयीचा संवाद त्या हृदयी होत होता. याबाबतीत अनेकांकडून भुवयाही उंचावल्या जात असत. तुमचे आणि किसन पाटील यांचे कसे काय जमते हो? अशी विचारणा प्रसंगी मला व्हायची; पण आमच्या ह्या नात्यात कमालीची पारदर्शकता होती. संधीसाधूपणातून किंवा स्वार्थ साधण्याच्या उद्देशातून आम्ही एकत्र आलेलो नव्हतोच मुळी. निखळ ज्ञानप्राप्ती, निखळ आदान प्रदानातून आमचे नाते तयार झालेले होते. त्याला कुठलीही स्वार्थाची झालर नव्हती. तुम्ही द्यायचे... मी घ्यायचे... तुमच्या सहवासातून, तुमच्या उक्तीकृतीतून मी शिकत गेलो.

तुमचा स्वभाव सत्यान्वेषी होता. महात्मा फुल्याच्या सत्यशोधक विचारांचे तुम्ही पाईक होतात. फुल्याचा परखड स्पष्टवक्तेपणा तुम्ही अंगीकारलेला होता. तुमच्या विचारात सुस्पष्टता होती. कुठल्याही गोष्टीच्या मुळाशी जाणे तुम्हाला आवडत असे. जे सत्य असेल तेच माझ्यासमोर टिकेल. टरफलं उडून जातील, असे तुम्ही नेहमी म्हणायचात म्हणूनच काही लोक तुमच्यापासून दचकून दूर असत. मी मात्र अढळ शिष्याप्रमाणे तुमच्या सोबत राहिलो. तुमच्या सहवासातच मला वाङ्मयीन दृष्टी प्राप्त झाली. तुम्ही दिलेली शिकवण अंगीकारण्याचा प्रयत्न मी केला. लुच्चेगिरी, लबाडी तुम्हाला आवडत नसे. कोणत्याही विद्यार्थ्यांचे शोषण तुम्ही केले नाही. आलेल्या विद्यार्थ्याला स्वतःच्या घरी जेवायला घेऊन जायचे. याबाबतीत घरच्यांनीही कधी कंटाळा केला नाही. विशेषतः शोभाकाकूंचा याबाबतीत खास उल्लेख करावा लागेल. घरी आलेल्या प्रत्येकाचे त्यांनी आपुलकीने आदरातिथ्य केले. ह्या बाबतीत तुम्ही कुटुंबियांवर काहीसा अन्यायही केला. तुमचा बराचसा वेळ नियमित कॉलेजातील अध्यापन, त्यानंतर संशोधक विद्यार्थ्यांना

**डॉ.किसन पाटील सर हे, त्या वेळी जळगाव येथील नामांकित मुळजी जेठा महाविद्यालयात मराठीचे प्राध्यापक होते. स्व.राजा महाजन, म.ना.अदवंत, सु.का.जोशी यांचा वारसा पुढे चालवत होते. कठोर शिस्तीचे प्राध्यापक आणि एक स्पष्टवक्ता म्हणून त्यांची ख्याती सर्वदूर पसरलेली होती, त्यामुळे भल्याभल्यांची त्यांच्यासमोर जाण्याची हिंमत होत नव्हती. मीही तसा पोरकटच, लाजराबुजरा, संकोची स्वभावाचा असल्याने सरांसमोर कसे उभे राहावे, हा प्रश्न माझ्याही समोर होता; पण नारायण शिरसाळे सरांनी मला हिंमत दिलेली होती, तुम्ही सरांना जाऊन भेटा... माझे नाव सांगा... मी पाठवले म्हणून सांगा; असे बजावलेले होते, त्यामुळे मी सरांसमोर उभा राहू शकलो. सरांच्या घराकडे जाऊ शकलो.**

मार्गदर्शन, साहित्यिक उपक्रमांची आखणी - अंमलबजावणी, ग्रंथ वाचन परीक्षण, नवोदितांना मार्गदर्शन, प्रस्तावना लेखन - अशा कामात जायचा; पण कुटुंबियांनी याबाबतीत कधीही तक्रार केली नाही.

शेवटपर्यंत तुम्ही अशा कामांत व्यस्त होतात. कालपरवा असेच आपले एका कामाबाबत बोलणे झाले होते. आपला पूर्वाश्रमीचा जळगाव जिल्हा बोली साहित्य संघाचे उपाध्यक्ष स्व. सुधाकर देशमुख (बोदवड) यांचे कवितांचे बाड सापडल्याचे तुम्ही मला सांगितले होते. त्यांच्या त्या कवितासंग्रहाचे काम कसे मार्गी लावता येईल, याविषयी आपली चर्चा झाली होती; पण त्यानंतर अशी काही वार्ता कानावर येईल याबाबतीत मी कल्पनाही केली नव्हती. एका पातळीवर तुमचे शैक्षणिक, संशोधनात्मक कार्य सुरू होते, तर समांतर पातळीवर वाङ्मयीन उपक्रमांनाही बळ देत होतात. जळगाव जिल्हा महाराष्ट्र साहित्य परिषदेची धुरा तुम्ही यशस्वीपणे सांभाळली. त्या माध्यमातून जिल्ह्यात वाङ्मयीन चळवळ जिवंत ठेवली व गतिमान केली. माझ्यासारखे अनेक नवोदित घडले. नवोदितांसाठी तुम्ही चालतेबोलते व्यासपीठ व विद्यापीठ

होतात. याच विद्यापीठाच्या प्रछायेत मी वाढलो. याचा मला अभिमान आहे. मी डॉ.किसन पाटील सरांचा विद्यार्थी आहे, असे सांगताना मला कधीही सकोच वाटला नाही एवढे नितळ तुमचे व्यक्तिमत्त्व होते.

तुमच्या या सहवासामुळेच माझ्या व्यक्तिमत्त्वाला आकार मिळत गेला. गावखेड्यातून आलेलो मी. कुठलीही शैक्षणिक- साहित्यिक परंपरा, वारसा नसताना तुम्ही मला उच्चविद्याविभूषित केलं. तुमच्याच मार्गदर्शनाखाली मी एम.फिल. व पीएच.डी.चे संशोधन पूर्ण केले. मीच नाही तर माझ्यासारखे अनेक विद्यार्थी तुम्ही घडविले. एक आदर्श संशोधक मार्गदर्शक, अभ्यासक म्हणून आपण नावलौकिक प्राप्त केला होता. वाघोड (ता.रावेर) सारख्या ग्रामीण भागातून येऊनही तुम्ही स्वतः उच्च गुणवत्ता प्राप्त केली व संशोधक, विचारवंत म्हणून नावलौकिक मिळविला होता. आपल्या या ज्ञानाचा फायदा जास्तीतजास्त विद्यार्थ्यांना व्हावा यासाठी सतत तुमची धावपळ असायची. तुमची विचारधारा सत्यान्वेषी व परखड होती. कुणाचेही लांगूलचालन करणे तुमच्या स्वभावात बसत नव्हते. खोट्या प्रतिष्ठेचे बुजगावणे मिरवण्यात तुम्ही कधी धन्यता मानली नाही आणि लांगूलचालन करून मिळणारी पदेही पदरात पाडून घेतली नाहीत. अशा खोट्या प्रतिष्ठेची तुम्हाला नेहमीच चीड असायची. तुम्ही जे काही मिळविले ते स्वकर्तृत्वाने, गुणवत्तेच्या बळावर. सचोटी, शील हा तर तुमच्या स्वभावाचा अलंकार होता.

तुम्ही एका प्राथमिक शिक्षकापासून सुरू केलेला प्रवास प्राध्यापक - प्राचार्य-अधिष्ठातापर्यंत पोहोचविला. अनेक विद्यापीठांच्या अभ्यासक्रम समित्यांचे सदस्य, संशोधक-मार्गदर्शक म्हणून तुम्ही कार्यरत राहिलात. बालभारती अभ्यासक्रम समिती सदस्य किंवा शासनाच्या विविध शब्दकोश, दलित-ग्रामीण शब्दकोश समित्यांवरील आपले काम संस्मरणीय राहिले. आपला पिंड अभ्यासकाचा होता. खानदेशी लोककला व लोकसाहित्य हे तुमचे व्यासंगाचे विषय होते. पूज्य साने गुरुजी व कवयित्री बहिणाबाई चौधरी हे तुमचे शिरस्थ आस्थेचे विषय होते. त्यांनी सांगितलेला सत्य - कर्माचा मार्ग तुम्ही स्वीकारला व आम्हा विद्यार्थ्यांमध्ये रुजविला. डॉ. बाबासाहेब आंबेडकर व महात्मा जोतिराव फुले याच्यातील सत्यान्वेषी निखळ मानवतावाद तुम्ही अंगीकारला व सत्यशोधक विचारांचा प्रसार, प्रचार आयुष्यभर केला.

विद्यापीठीय विद्वानांची चाकोरी सोडून तुम्ही समाजाभिमुख जीवन जगलात. आपल्यात जे जे चांगलं आहे ते ते जगाला अर्पण करत राहिलात. तुम्ही लावलेले श्रीकृष्ण - शोभा फाऊंडेशनचे रोपटे, स्व. वानखेडे गुरुजींच्या स्मृतीप्रीत्यर्थ सुरू केलेला पुरस्कार व व्याख्यानमाला; लोककलांचे जतन, संवर्धन व्हावे या हेतूने आयोजित केलेला वही महोत्सव; हे सगळे आपल्या कार्याचे द्योतक आहेत. सोबतच इहवादाचा नवा विचार सिद्धांत तुम्ही दिलात. तावडी बोली भाषेला भाषिक अधिष्ठान प्राप्त करून देण्यात तुमचा सिंहाचा वाटा आहे. तुमच्यातील समीक्षक नेहमीच जागा राहिला. आपल्या समीक्षा विचारांचा तुम्ही कधी बाऊ केला नाही. समीक्षेची छडी कधीही कुणावर उगारली नाही. त्याउलट अनेक नव्या लिहित्या हातांना सतत मार्गदर्शन करत राहिलात. त्यांना बळ देत राहिलात.

माझ्या कूड कथासंग्रहावर तुम्हीच प्रथम समीक्षा लिहिली. माझ्या 'आसूड' कथासंग्रहाला दीर्घ प्रस्तावना लिहिली. माझ्यातील कथाकार घडविण्यामध्ये तुमचा फारच मोठा वाटा आहे. माझ्या पाडा कादंबरीचा प्रकाशन सोहळा तुम्हीच जळगाव येथे थाटात घडवून आणला होता. आज मी लेखक म्हणून जो उभा आहे तो केवळ तुमच्यामुळे. तुमच्या पाठबळामुळेच मी साहित्य प्रातात उंच भरारी घेऊ शकलो व उच्च शिक्षणाचा आलेख उंचावू शकलो. माझ्यासारखे अनेक नवोदित लेखक तुम्ही घडविलेत. अनेकांच्या पुस्तकांना प्रस्तावना लिहून दिल्या, अनेकांचे हस्तलिखित बाड दुरुस्त करून दिले. आपल्या विद्यार्थ्यांना मोठं होताना पाहण्यात तुम्हाला आनंद मिळत असे. आपली सगळी ऊर्जा तुम्ही दुसऱ्यांसाठी खर्ची घातली, त्यामुळेच तुमच्या स्वत.च्या निर्मितीकडे दुर्लक्ष झाले. प्रचंड क्षमता, प्रतिभाशक्ती असूनही तुम्ही स्वतःच्या सर्जनशील निर्मितीकडे दुर्लक्ष केले. वारंवार याबाबतीत सूचित करूनही तुम्ही त्याकडे लक्ष दिले नाही.

दुसऱ्याच्या आनंदात तुम्ही कायमच स्वतःचा आनंद शोधत राहिलात म्हणूनच, नव्या नव्या लोकांना तुम्ही



अनुक्रमणिका

विद्यापीठीय विद्वानांची चाकोरी सोडून तुम्ही समाजाभिमुख जीवन जगलात. आपल्यात जे जे चांगलं आहे ते ते जगाला अर्पण करत राहिलात. तुम्ही लावलेले श्रीकृष्ण – शोभा फाऊंडेशनचे रोपटे, स्व. वानखेडे गुरुजींच्या स्मृतीप्रीत्यर्थ सुरू केलेला पुरस्कार व व्याख्यानमाला; लोककलांचे जतन, संवर्धन व्हावे या हेतूने आयोजित केलेला वही महोत्सव; हे सगळे आपल्या कार्याचे द्योतक आहेत. सोबतच इहवादाचा नवा विचार सिद्धांत तुम्ही दिलात. तावडी बोली भाषेला भाषिक अधिष्ठान प्राप्त करून देण्यात तुमचा सिंहाचा वाटा आहे. तुमच्यातील समीक्षक नेहमीच जागा राहिला. आपल्या समीक्षा विचारांचा तुम्ही कधी वाऊ केला नाही. समीक्षेची छडी कधीही कुणावर उगारली नाही. त्याउलट अनेक नव्या लिहित्या हातांना सतत मार्गदर्शन करत राहिलात. त्यांना बळ देत राहिलात.

सतत उभे करत राहिलात. मार्गदर्शन करत राहिलात. या निमित्ताने खानदेशातील साहित्य चळवळ तुम्ही सतत गतिमान ठेवली. त्यासाठी सभासंमेलनांचे आयोजन केले. महाराष्ट्र साहित्य परिषदेचे जिल्हाध्यक्ष म्हणून दीर्घकाळ काम केले. बोली साहित्य संघाचे केंद्रीय उपाध्यक्ष म्हणून काम केले. महाराष्ट्र साहित्य पत्रिका संपादक मंडळ सदस्य, बालभारती अभ्यासमंडळ सदस्य म्हणूनही तुम्ही कार्य केले. आपल्या या कार्यकाळात पाचोरा येथे विभागीय मराठी साहित्य संमेलन झाले. भुसावळ येथे भव्य राज्यस्तरीय बोली साहित्य संमेलन झाले. जळगाव, जामनेर, एरंडोल, मुक्ताईनगर यांसारख्या तालुका, जिल्हास्तरावर साहित्य संमेलने व विविध परिसंवाद, ग्रंथ प्रकाशनाचे कार्यक्रम घेतले. दोन वर्षांपूर्वी जामनेर येथे संपन्न झालेले पहिले राज्यस्तरीय तावडी बोली साहित्य समेलनही तुमच्याच कल्पनेतून व मार्गदर्शनाखाली पार पडले.

डॉ. किसन पाटील सर, तुम्ही भाषा अभ्यासक होतात. तावडी बोलीच्या जडणघडणीत व सैद्धांतिक मांडणीत तुम्ही मोलाचे मार्गदर्शन केले व पाठराखण केलीत. माझ्या 'तावडी बोली' या ग्रंथास दीर्घ प्रस्तावना लिहून दिली. ही गोष्ट मी विसरू शकत नाही. माझ्या एकूणच लेखकीय कारकिर्दीच्या जडणघडणीत तुमचा महत्त्वाचा वाटा राहिला आहे.

जळगाव जिल्हा बोली साहित्य संघाचेही तुम्ही अध्यक्ष होतात. मुक्ताईनगर अंकुर साहित्य संमेलनाचे अध्यक्ष, पाचोरा येथील बोली साहित्य संमेलनाचे अध्यक्ष, मोझरी जनसाहित्य संमेलनाचे अध्यक्ष- अशी पदं आपण भूषविलीत; पण सर तुमचं माणूस असणं सर्वांना खूप भावलं. कधीही तुम्ही कुणाचा दुस्वास केला नाही, कुणालाही आपला शत्रू मानला नाही. कुठल्याही गटातटात सहभागी न होता आपले कार्य करीत राहिलात. खरं तर तुमच्या अशा वागण्यामुळे प्रसंगी तुमचे नुकसानही झाले. अनेक मानसन्मान, महत्त्वाची पदं तुमच्यापासून दुरावली; पण याची तुम्ही कधी पर्वा केली नाही. अशा गोष्टींचा तुम्हाला ना खेद ना खंत!

कधी तुम्ही स्वतःवरचा गौरवग्रंथ काढण्याचा अट्टहास केला नाही. स्वतःची स्तुती करून घेणे तुम्हाला कधी आवडलेच नाही. ना कुठल्या विद्यार्थ्याकडून कुठली अभिलाषा बाळगली, म्हणूनच सर तुमच्या जाण्याने हळहळ वाटते. तुमच्या जाण्याने मराठी साहित्य व संशोधन क्षेत्राची मोठीच हानी झाली आहे. ही पोकळी भरून न निघणारी आहे. सोबतच माझ्यासारखे असंख्य विद्यार्थी पोरके झाले आहेत. माझा विचार मुका झाला आहे. शब्द निःशब्द झाले आहेत. अजून काय लिहू? माझे तर पालकत्वच पोरके झाले आहे. साहित्य क्षेत्रातील माझा बाप मला सोडून गेला आहे. माझे शब्द पोरके झाले आहेत. लेखणी मुकी झाली आहे...

**डॉ. अशोक कौतिक कोळी**
कूड, गणपतीनगर सेक्टर-३, जळगाव रोड,
जामनेर, जि. जळगाव-४२४ २०६
**चलभाष :** ९४२१५६८४२७
ashokkautikkoli@gmail.com

◈◈



ज्येष्ठ समीक्षक, साहित्यिक डॉ. लीला गोविलकर यांच्या बहुआयामी आणि चतुरस्र व्यक्तिमत्त्वाचा वेध घेणारा लेख.

# अष्टपैलू व्यक्तिमत्त्वाच्या डॉ. लीला गोविलकर

डॉ. स्नेहल तावरे

मराठी प्राध्यापक विश्वात डॉ. लीला गोविलकर यांनी मराठी सारस्वताची सेवा करीत एक उत्तम असा नावलौकिक मिळविला आहे. एखाद्या स्त्रीने सर्व जबाबदाऱ्या स्वीकारून साहित्याच्या विविध क्षेत्रांत आपल्या नावाचा दबदबा निर्माण करणे ही सोपी गोष्ट नाही. अनेक वेळा स्त्रिया कविता, कथा, कादंबरी या क्षेत्रांत आपले स्थान भक्कम करतात; पण समीक्षक, व्याकरणकार, भाषा वैज्ञानिक, संस्कृत आणि पाश्चात्त्य साहित्य विचारतज्ज्ञ आणि संत साहित्याच्या अभ्यासक या साहित्याच्या काहीशा मातब्बर क्षेत्रांत स्त्रिया लीलया जात नाहीत; पण डॉ. लीला गोविलकर यांना मात्र या सर्व क्षेत्रांचा प्रदीर्घ अनुभव असून त्यामध्ये त्यांनी आपली मोहर भक्कमपणे उमटविलेली दिसून येते. चतुरस्र आणि साक्षेपी दृष्टी त्यांना लाभलेली आहे. लीलाताईंच्या अभ्यास क्षेत्रांचा विचार केला, तर थक्क व्हायला होते. सर्वच साहित्य प्रकारांमध्ये त्यांनी विपुलतेने लेखन केलेले आहे. हीच गोष्ट त्यांच्या कार्यकर्तृत्वाची ओळख करून देते.

मॉडर्न महाविद्यालयात विद्यार्थी दशेत असताना म्हणजे १९७० - १९७१ च्या सुमारास त्यांचा आणि माझा परिचय गुरुवर्य डॉ. द. दि. पुंडे सरांनी करून दिला. 'वेगवेगळ्या स्पर्धेत आणि उपक्रमात भाग घेणारी ही एक विद्यार्थिनी' म्हणून सरांनी माझी ओळख करून दिली. आज जवळजवळ पन्नास वर्षांचा त्यांचा आणि माझा परिचय आहे. माझ्या विद्यार्थी दशेत असताना मी त्यांना पाहिले तशाच आजही; त्या वयाच्या ८४ व्या वर्षी; त्याच उत्साही रूपात आहेत. तोच गोरापान वर्ण, सडपातळ बांधा, चेहऱ्यावर हास्य आणि प्रसन्न व्यक्तिमत्त्व. राहणी अतिशय नीटनेटकी, टापटिपीची. बुद्धिमत्तेची चमक त्यांच्या दृष्टीतून पाहताक्षणी जाणवते. बोलण्यात एक आपलेपणा, समंजस वृत्ती, दुसऱ्याला सांभाळून घेण्याची प्रवृत्ती. आपला मुद्दा मांडताना किंवा वादविवाद करताना दुसऱ्याला वाईट वाटणार नाही याची दक्षता त्या नेहमीच घेत असतात. विद्वत्ता आणि नम्रता हे दोन्ही गुण त्यांच्यामध्ये आहेत. या त्यांच्या प्रसन्न व्यक्तिमत्त्वाचा प्रभाव माझ्यावर इतका पडला, की मी त्यांच्या प्रेमातच पडले आणि त्यांना गोविलकर मॅडम ऐवजी 'लीलाताई' असे कधी म्हणायला लागले हे मला कळलेच नाही. गोविलकर मॅडम असे म्हणण्यापेक्षा 'लीलाताई' म्हणण्यात मला जास्त आपलेपणा भावला. आजही आई, सहकारी, मैत्रीण, विद्यार्थिनी, मुलगी अशा विविध रूपांत त्या मला जवळच्या वाटतात. त्यामुळेच अहमदनगरला राहणाऱ्या लीलाताई पुण्याला जेव्हाजेव्हा येतात तेव्हातेव्हा त्यांची आणि माझी भेट होतेच.

वस्तुतः लीलाताई या मुंबईच्या. मुंबईच्या माणसांमधला टापटीपपणा, चटपटीतपणा त्यांच्या

व्यक्तिमत्त्वामध्ये आहे. नोकरीच्या निमित्ताने त्या अहमदनगरला आल्या आणि तिथेच स्थायिक झाल्या; पण मुंबईकर आणि नगरकर यांचा मेळ त्यांनी उत्तम प्रकारे सांभाळला. मुंबईकर असूनही त्यांनी नगरकरांच्या हृदयात एक आपुलकीचे स्थान अल्पावधीत निर्माण केले ते आपल्या बुद्धिमत्तेच्या जोरावर. त्या नगरमध्ये इतक्या एकरूप झाल्या, की त्यांच्या वयाच्या ७५ व्या वर्षी 'अक्षरमोती' नावाची अमृत महोत्सवी गौरविका नगरकरांनी मोठ्या सन्मानाने प्रकाशित केली आणि त्यांचा भव्य सत्कार केला, यातच डॉ. लीला गोविलकर यांच्या कार्याचे फलित आहे असे म्हणावेसे वाटते. केवळ शैक्षणिक क्षेत्रातच नाही तर सामाजिक क्षेत्रातही त्यांनी आपल्या कार्याचा ठसा उमटविलेला आहे. कोणत्याही वेळी, कोणत्याही प्रसंगी लीलाताईंच्या मदतीचा हात सर्वांसाठी सतत पुढे असतो. ज्ञानदानाबरोबरच त्यांनी सामाजिक बांधिलकी मोठ्या प्रमाणात जपलेली आहे. अनेक वर्षांपासून अशा सामाजिक संस्थांमध्ये त्यांनी शंभरच्यावर व्याख्याने दिलेली आहेत. त्यामध्ये ऐतिहासिक वस्तू संग्रहालय, सनातन धर्मसभा, आकाशवाणी, ज्येष्ठ नागरिक मंच, विविध सांस्कृतिक आणि सामाजिक संस्था यांच्या व्यासपीठांवरून त्यांनी अनेकांना मार्गदर्शन केलेले आहे. विविध संस्थांच्या कार्यकारिणीवर त्यांनी काम केलेले आहे. या संस्थांची नावे पाहिली, की त्यामध्ये विविधता आहे हे जाणवते. हे सर्व कार्य अहमदनगर परिसरातील असले तरी उल्लेखनीय आहे. मुलींसाठी कार्य करणाऱ्या बालिकाश्रमाच्या कार्यकारिणीवर त्या सदस्य म्हणून होत्या. नवविद्या प्रसारक मंडळाच्या सल्लागार, सावेडी येथील ज्येष्ठ नागरिक मंचाच्या मा. अध्यक्ष, फेस्कॉम या संघटनेच्या ज्येष्ठ नागरिक मंचाच्या कार्यकारिणीवर तसेच संस्कारभारती, आणि मराठी मंच यांचे उपाध्यक्षपद त्यांनी भूषविलेले आहे. आयुष्यभर वाचन, चिंतन, लेखन करणाऱ्या लीलाताईंना जिल्हा वाचनालयाच्या कार्यकारिणीवर काम करण्याचीही संधी मिळाली.

अहमदनगरला आल्यावर त्यांनी अतिशय सुंदर असा बंगला स्वतःसाठी बांधला. या बंगल्यात अनेक वेळा मी हक्काने जेवले आहे. त्या घरमालक संघाच्या सदस्य होत्या. प्राध्यापक, सामाजिक जाणीव या गोष्टींबरोबरच अर्थव्यवहार या क्षेत्रातही त्यांनी त्यांचा ठसा उमटविलेला आहे. मराठीच्या प्राध्यापकांसाठी ही काहीशी गौरवाची बाब आहे. शहर सहकारी बँकेच्या त्या संचालिका होत्या हे एक अपवादात्मक उदाहरण म्हणता येईल. यावरूनच लीलाताईंचे आवडीचे विषय किती विविधांगी आहेत हे लक्षात येते. त्या जेथे जातात तेथे आपल्या कार्यकर्तृत्वाची मोहर उमटवितात.

डॉ. लीलाताई गोविलकर यांनी आयुष्यात काही महत्त्वपूर्ण उपक्रम आयोजित केले. त्यांनी पर्यावरणविषयक तीन दिवसांचे चर्चासत्र सहकार्याने आयोजित केले होते. तसेच अहमदनगर जिल्ह्यातील मराठी साहित्यिकांना एकत्र आणून जिल्हापातळीवर नगर जिल्हा मराठी संमेलनाचे आयोजन केले आणि या संमेलनाच्या त्या कार्याध्यक्ष होत्या. बालकुमार साहित्य संमेलन त्यांनी १९९९ साली भरवले तसेच बालकुमार साहित्य मेळावा २००० साली आयोजित केला. त्यांच्या नावावर अजून एक उपक्रम नोंदविला गेलेला आहे आणि तो म्हणजे सहकार तत्त्वावर पुस्तक प्रकाशनाचा अनोखा सोहळा. त्या अनेक पुरस्कारांनी सन्मानित झालेल्या आहेत. ज्येष्ठ सेवाभावी महिला म्हणून फेस्कॉमने त्यांना गौरविले आहे. याज्ञवल्क्य संस्था यांनी गार्गी पुरस्कार तसेच पुण्यश्लोक अहिल्यादेवी पुरस्कार हा पारनेरकर महाराज महिला मंच संस्थेतर्फे दिला गेला आणि स्नेहवर्धन रिसर्च इन्स्टिट्यूटतर्फे त्यांना पुरस्कृत करण्यात आले. त्यांचे एक महत्त्वपूर्ण कार्य म्हणजे अनेक वर्षांपासून त्या विद्यार्थिनींसाठी एक वसतिगृह उत्तम प्रकारे चालवीत आहेत. अनेक पालक लीलाताईंच्यावर विश्वास ठेवून आपल्या मुली त्यांच्या वसतिगृहात बिनधास्तपणे ठेवतात. या सर्व मुलींना लीलाताई आईचे प्रेम देत असतात हे मी स्वतः अनुभवलेले आहे. विद्यार्थिनींच्या अडीअडचणींना त्या तत्परतेने धावून जातात. "आज तू का जेवली नाहीस?" असे मायेने विचारणाऱ्या एकमेवाद्वितीय लीलाताईच आहेत.

डॉ. लीला गोविलकर या अष्टपैलू व्यक्तिमत्त्वाच्या आहेत असे मी नेहमीच म्हणते. एकाच वेळी त्या अनेक कामे करीत असतात, जणू काही त्यांना देवी सरस्वतीने अनेक हात दिलेले आहेत. सरस्वतीचा वरदहस्त लाभलेल्या लीलाताईंची ग्रंथसंपदा विपुल आहे.





प्रामुख्याने व्याकरण, साहित्यशास्त्र, भाषाविज्ञान, व्यावहारिक मराठी, निबंध लेखन, कवितालेखन, संतसाहित्य, मराठी वाङ्मयाचा इतिहास, विनोदी साहित्य हे त्यांच्या आवडीचे विषय असल्यामुळे या साहित्य प्रकारात त्यांनी स्वतःचे एक स्थान निर्माण केले आहे. आजही या क्षेत्रात त्यांचा एक मानाचा दरारा सर्वत्र दिसून येतो. व्याकरणासारख्या क्लिष्ट विषयालाही त्यांनी ज्या सहजतेचे कवच दिले ते वाखाणण्याजोगे आहे. 'मराठीचे व्याकरण' हे पुस्तक लिहून त्यांनी व्याकरण सर्वांसाठीच सुलभतेने कसे समजेल इतक्या रोचकपणे लिहिले आहे. मराठीच्या व्याकरणाची गोडी अनेकांना लागली याचे कारण त्यांचे 'मराठीचे व्याकरण' हे पुस्तक होय. मराठी व्याकरणाचा विचार करणारी जी मोजकी मंडळी आहेत त्यांमध्ये लीलाताईंचे स्थान मोठे आहे. व्याकरणाप्रमाणेच साहित्यशास्त्रात त्यांनी मौलिक लेखन केले आहे. मुळात साहित्यशास्त्र हे त्रिधारांकित आहे असे मी मानते. त्यांनी प्रथमतः 'भारतीय साहित्यशास्त्र' हा ग्रंथ लिहिला. भारतीय साहित्यशास्त्राचा हा अभ्यासपूर्ण ग्रंथ दिशादर्शक आहे. संस्कृत भाषेचा मराठीवर झालेला परिणाम पाहता त्यांनी 'मराठीचे साहित्यशास्त्र' हा ग्रंथ लगेचच लिहिला. त्यामुळे भारतीय आणि मराठी यांच्या साहित्यशास्त्राची मूलगामी ओळख अभ्यासकांना झाली; परंतु केवळ भारतीय साहित्यशास्त्राच्या विचार न करता ब्रिटिशामुळे पाश्चात्त्य साहित्यशास्त्राचा मराठीवर मोठा प्रभाव आणि परिणाम झालेला दिसून येतो. म्हणूनच अभ्यासकांच्या सोयीसाठी त्यानी 'पाश्चात्त्य साहित्य शास्त्र' हा ग्रंथ लिहिला. मराठी, भारतीय आणि पाश्चात्त्य अशा त्रिधारेचा विचार करणारा ग्रथ लिहून साहित्य शारदेची त्यांनी अभूतपूर्व सेवा केली आहे. साहित्यशास्त्रावर असे तीन ग्रंथ लिहिणाऱ्या त्या एकमेवाद्वितीयच आहेत. व्यावहारिक मराठी असो वा वर्णनात्मक, सामाजिक भाषाविज्ञान असो लीलाताईंची लेखणी सर्वत्र सहजगत्या संचार करताना दिसून येते. भाषाविषयक त्यानी ६० पेक्षा अधिक लेख लिहिलेले आहेत. संतविषयक लेखांची तर शताब्दी त्यांनी केव्हाच पार केलेली आहे. समीक्षा हासुद्धा त्यांच्या जिव्हाळ्याचा विषय आहे म्हणूनच 'समीक्षा विविधा' हा डॉ. लीला गोविलकर यांचा गौरव ग्रंथ आहे. मराठी सारस्वतात २० वैशिष्ट्यपूर्ण ग्रंथ आणि २५ हून अधिक छोट्या छोट्या पुस्तिका त्यांनी लिहिल्या आहेत. इतकेच काय पण व्याकरण, भाषा विज्ञान यांसारखे इतरांना रुक्ष वाटणारे विषय त्या ज्या सहजतेने हाताळतात त्याच कुशलतेने त्यांचे तीन कवितासंग्रह प्रकाशित झालेले आहेत हे विशेष आहे. याचाच अर्थ असा, की लीलाताई या कवि हृदयाच्या आहेत. 'या हृदयीचे त्या हृदयी' प्रमाणे एका साहित्यप्रकारातून इतर सर्व साहित्य प्रकारांत लेखन करणाऱ्या त्या मराठीतील ख्यातनाम समीक्षक आहेत, कवयित्री आहेत, वैयाकरणी, भाषाशास्त्रज्ञ, संत साहित्याच्या अभ्यासक, साहित्य विचाराच्या प्रणेत्या, मराठी वाङ्मयाच्या पुरस्कर्त्या, ललित- विनोदी लेखिका अशा बिरुदावलींनी त्या अलंकृत आहेत. लीलाताईंवरचे हे संस्कार त्यांनी आई-वडिलांकडून आत्मसात केलेले आहेत आणि याच सर्व गोष्टी डॉ. लीला गोविलकर यांच्या अष्टपैलू व्यक्तिमत्त्वाची साक्ष देणाऱ्या आहेत.

**डॉ. स्नेहल तावरे**

स्नेहवर्धन प्रकाशन ८६३, राजवाडे पथ, सदाशिव पेठ, पुणे- ४११०३०

चलभाष: ९४२३६४३१३१ । snehaltawre@gmail.com

◈◈



अनुक्रमणिका



येणें वाग्यज्ञे तोषावें

महाराष्ट्र
साहित्य
परिषद

# मुळीचा झरा

**महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या कार्यकारिणीच्या गेल्या पाच वर्षांतील कामकाजाचा आढावा घेणारा लेख.**

**प्रा. मिलिंद जोशी**

महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे ही महाराष्ट्रातील आद्य साहित्य संस्था आहे. गेली ११५ वर्षे ही संस्था मराठी भाषा, साहित्य, समीक्षा आणि संस्कृती यांच्या जतन आणि संवर्धनासाठी कार्यरत आहे. हा मुळीचा झरा अनेक सारस्वतांसाठी अक्षय ऊर्जाकेंद्र आहे.

एकोणिसाव्या शतकाच्या उत्तरार्धात न्या. रानडे आणि लोकहितवादी यांनी ग्रंथकार संमेलने सुरू केली. चौथे ग्रंथकार संमेलन १९०६ साली प्रसिद्ध कवी गो. वा. कानिटकर यांच्या अध्यक्षतेखाली पुण्यात मळेकर वाड्यात भरले होते. या संमेलनाच्या समारोपात साहित्य सम्राट न.चि.केळकर यांनी महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या स्थापनेची घोषणा केली. लोकमान्य टिळकांनी त्यांना अनुमोदन दिले. तेव्हापासून महाराष्ट्र साहित्य परिषद मराठी भाषा, साहित्य, समीक्षा आणि संस्कृती यांच्या जतन आणि संवर्धनासाठी कार्यरत आहे. अनेक थोर सारस्वतांनी वाङ्मयसेवकांची भूमिका पार पाडत आपल्या आयुष्यातला बहुमोल वेळ देऊन या संस्थेच्या कार्याचा विस्तार केला. आज पुणे, सांगली, सातारा, कोल्हापूर, सोलापूर, अहमदनगर, नाशिक, जळगाव, धुळे-नंदुरबार, कल्याण, डोंबिवली, ठाणे, रत्नागिरी, सिंधुदुर्ग, रायगड या जिल्ह्यांत परिषदेचे कार्य विस्तारलेले आहे.

'साहित्य संस्थांनी कालानुरूप बदलले पाहिजे' ही भूमिका समोर ठेवून साहित्य परिषदेने आपल्या कार्यशैलीत बदल केला आहे. आज साहित्यनिर्मितीचा केंद्रबिंदू सरकला आहे. ग्रामीण, दुर्गम आणि आदिवासी भागातील लेखक कसदार लेखन करीत आहेत. त्यांचेच साहित्य आज मराठी साहित्यविश्वाची समृद्धी वाढवीत आहे. शहरात आणि महानगरात सांस्कृतिक अजीर्ण व्हावे इतके साहित्यिक आणि सांस्कृतिक कार्यक्रम होत असतात खरी सांस्कृतिक भूक आहे ती ग्रामीण भागात. हे लक्षात घेऊन साहित्य परिषदेने कार्यक्षेत्रातील छोट्या गावातही आपल्या शाखांचा विस्तार केला आहे. तिथल्या प्रतिभेच्या नव्या कवडशांना व्यासपीठ मिळावे यासाठी प्रतिवर्षी ऐंशी टक्के नव्या लेखक, कवींना अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलनात संधी दिली. साहित्य परिषदेतर्फे विभागीय साहित्य संमेलन, युवा साहित्य नाट्य संमेलन, समीक्षा संमेलन आणि शाखा मेळावा हे महत्त्वाचे उपक्रम राबविले जातात. पूर्वी हे उपक्रम पुणे आणि परिसरातच होत असत. ते तिथे न घेता दरवर्षी वेगवेगळ्या जिल्ह्यांत, तालुका पातळीवर आणि छोट्या गावांतही घेतले जात आहेत. त्याला उत्तम प्रतिसाद मिळत आहे. ग्रामीण भागात शाखा चालवताना प्रश्न असतो तो निधीचा. त्यावर मार्ग काढण्यासाठी साहित्य परिषदेने तेथील शाखांना त्याच ठिकाणी असणाऱ्या शैक्षणिक संस्थांबरोबर,



अनुक्रमणिका








महाविद्यालयांतील वाङ्मय मंडळांबरोबर साहित्य सहयोग करार करायला सांगितले. त्या करारानुसार महाविद्यालयांनी समारंभासाठी आवश्यक असणाऱ्या गोष्टींची पूर्तता करायची आणि साहित्य परिषदेच्या शाखांनी साहित्यिक कार्यक्रम ठरवायचे, लेखकांना निमंत्रित करायची जबाबदारी पार पाडायची असे ठरलेले आहे. त्यामुळे शाखांना उपक्रम मिळाले, महाविद्यालयांतील वाङ्मयमंडळे परिषदेशी जोडली गेली, तरुणाई परिषदेच्या संपर्कात आली. शाखांमधले साहित्य रसिक कार्यक्रमाच्या निमित्ताने महाविद्यालयात जाऊ लागले. साहित्यसंस्था साहित्याभिमुख आणि लोकाभिमुख करण्यासाठी हा उपक्रम उपयुक्त ठरला हे या उपक्रमाचे खरे यश.

साहित्य रसिकांना समेलनांपर्यंत जाणे शक्य नसेल, तर संमेलनाने साहित्य रसिकांपर्यंत गेले पाहिजे या भूमिकेतून साहित्य परिषदेने शिवार साहित्य संमेलनं सुरू केली. ग्रामीण भागांतील शिवारात होणाऱ्या या संमेलनाना अभूतपूर्व प्रतिसाद मिळाला. कोणतेही व्यासपीठ नाही, सत्काराचा डामडौल नाही, शिवारातल्या एखाद्या झाडाखाली सतरंजी टाकून बसायचे, त्याच शिवारातल्या फुलांनी आलेल्यांचे स्वागत करायचे. त्या परिसरातल्या लेखक-कवीला अध्यक्ष करायचे, त्यांचे भाषण, कविसंमेलन, कथाकथन असे सुटसुटीत कार्यक्रम ठेवायचे. स्थानिकांनाच सहभागी करून घ्यायचे. शेतात राबणाऱ्या मंडळींना रसिक म्हणून बोलवायचे, प्रत्येकाने आपापल्या घरून जेवणाचा डबा घेऊन यायचा. त्या शिवार मालकाची इच्छा आणि ऐपत असेल, तर त्याने स्वेच्छेने पिठलं-भाकरीचं जेवण द्यायचे अशी या संमेलनाची एकूण रीत आहे. या संमेलनात सहभागी होताना त्या शेतात राबणाऱ्या माउलीला उत्स्फूर्तपणे पन्नास-साठ ओळींचा उखाणा, ओव्या, कविता म्हणण्याची इच्छा होते. ती माउली सर्वांसमोर येऊन त्याचे सादरीकरण करते हा अनुभव या शिवार संमेलनांनी दिला. साहित्याचा पुण्या-मुंबईत अडकलेला प्रवाह आज परिषदेच्या पुढाकाराने ग्रामीण भागातल्या पाटांमधून वाहतो आहे.

काही वर्षांपूर्वी साहित्य परिषदेत सारस्वतांचे स्मृतिदिन, व्याख्याने आणि पारितोषिकांचे वितरण एवढेच कार्यक्रम होत असत. त्यांनाही कर्मकांडाचेच रूप प्राप्त झाले होते. साहित्य परिषदेने या कार्यक्रमाच्या स्वरूपात बदल केला.

समाजाच्या विविध क्षेत्रांतील साहित्यप्रेमी मान्यवरांना निमंत्रित करून त्यांच्याबरोबर संवाद घडविणारा 'मसाप गप्पा' सारखा उपक्रम, कथेमागची कथा उलगडणारा 'कथासुगंध' कार्यक्रम, शालेय विद्यार्थ्यांमध्ये साहित्याची गोडी निर्माण व्हावी यासाठी शाळाशाळांत राबविलेला 'लेखक तुमच्या भेटीला' हा उपक्रम, महानगरांबरोबरच ग्रामीण भागातील कवी आणि कवयित्रींना पुण्यात निमंत्रित करून त्यांच्या कवितेची निर्मितीप्रक्रिया उलगडणारा 'एक कवी एक कवयित्री', सारखा उपक्रम राबवून परिषदेने साहित्यिकांसह साहित्यप्रेमींना परिषदेशी जोडले.

साहित्यक्षेत्रात कार्यरत असणाऱ्या अनेक संस्थांच्या सहयोगाने परिषदेने अनेक कार्यक्रम महाराष्ट्रभर घेतले. नवलेखक-कवींना आणि मराठी विषयाचे अध्यापन करणाऱ्या शिक्षक व प्राध्यापकांना मार्गदर्शक ठरतील अशा अनेक कार्यशाळा राज्यभर घेतल्या. परिषदेच्या माधवराव पटवर्धन सभागृहाचे नूतनीकरण करताना परिषदेचे आद्यप्रेरक असलेल्या न्या. रानडे, लोकमान्य टिळक, न. चिं. केळकर आणि परिषदेचे जन्मस्थळ असलेला मळेकर वाडा यांच्या प्रतिमा सभागृहात लावल्या. टिळक रस्त्यावरील जागा उदारमनाने वास्तू उभारणीसाठी परिषदेला देणारे औंध संस्थानचे अधिपती बाळासाहेब पंतप्रतिनिधी यांचे तैलचित्र परिषदेच्या सभागृहात लावले. डॉ. अरुणा ढेरे यांच्या मार्गदर्शनाखाली महत्त्वपूर्ण संशोधन प्रकल्प हाती घेतले. साहित्यसेवक म. श्री. दीक्षित यांचे नाव परिषदेच्या पायरीला देऊन साहित्यसेवकांचा प्रातिनिधिक सन्मान केला. वैदेही, डॉ. प्रतिभा राय, सितांशु यशश्चंद्र या अन्य भाषांतील थोर सारस्वतांना परिषदेच्या वर्धापनदिन समारंभासाठी प्रमुख अतिथी म्हणून निमंत्रित करून भाषा भगिनींमधील स्नेहभाव दृढ व्हावा यासाठी जाणीवपूर्वक प्रयत्न केले. जागतिक पुस्तक दिनाच्या निमित्ताने रस्त्यावर ग्रंथविक्री करणारे ग्रंथसेवक, मुद्रितशोधक आणि मुखपृष्ठकार यांचा सन्मान करून परिषदेने नवा पायंडा पडला. थोर सारस्वतांच्या जन्मशताब्दी आणि स्मृतिशताब्दीच्या निमित्ताने अभिवादन कार्यक्रमांचे राज्यभर आयोजन केले. डॉ. बाबासाहेब आंबेडकरांच्या १२५ व्या जयंतीवर्षाच्या

निमित्ताने पाटण येथे आयोजित केलेले आणि डॉ. आंबेडकरांच्या विचारांना वाहिलेले विभागीय साहित्य संमेलन वैशिष्ट्यपूर्ण ठरले.

मराठी भाषेला अभिजात भाषेचा दर्जा मिळावा यासाठी परिषदेने लोक चळवळ उभारली, त्यासाठी लेखकांच्या बैठका, पंतप्रधान कार्यालयाला शालेय विद्यार्थ्यांमार्फत एक लाख पत्रं पाठविण्याचा उपक्रम, राजकीय इच्छाशक्तीला आवाहन करण्यासाठी पत्रव्यवहार आणि गाठी-भेटी हे सारे करीत असताना राजधानी दिल्लीत जाऊन धरणे आंदोलनही केले. महाराष्ट्रातील साहित्य संस्थेने भाषिक प्रश्नासाठी थेट राजधानीत जाऊन आंदोलन करण्याची ही घटनाच ऐतिहासिक आणि अभूतपूर्व होती. मराठी भाषा शिक्षणाचा कायदा सक्तीचा करण्यात यावा यासाठी विविध संस्थांनी मुंबईच्या आझाद मैदानावर केलेल्या धरणे आंदोलनात साहित्य परिषदेचा लक्षणीय सहभाग होता. या आंदोलनाला यश आले. या कायद्याचे प्रारूप कसे असावे यासाठीच्या लेखक आणि विधिज्ञांच्या महत्त्वपूर्ण बैठका परिषदेतच झाल्या.

अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलन हा मराठी समाजाचा वाङ्मयीन उत्सव आहे. साहित्य संमेलनाचे अध्यक्ष मराठी समाजाचे वैचारिक नेतृत्व करतात, अशी भावना मराठी जनांमध्ये आहे. साहित्य संमेलनाच्या अध्यक्षपदासाठी निवडणूक प्रक्रिया होती तेव्हा प्रतिभावंत सारस्वतांना मतांसाठी याचना करावी लागत होती. मतदारांची पात्रता ते साहित्यसंस्था प्रमुखांची भूमिका या साऱ्याविषयीच आक्षेप घेतले जात होते. निवडणुकांच्या गदारोळात वातावरण कलुषित व्हायचे. त्यामुळेच अनेक थोर सारस्वत या निवडणुकीपासून आणि संमेलनाध्यक्षपदापासून दूरच राहिले. समाजमनातही त्याविषयी खदखद होतीच. हे जाणून घेतल्यानंतर अखिल भारतीय मराठी साहित्य महामंडळात घटना दुरुस्ती व्हावी यासाठी महाराष्ट्र साहित्य परिषदेने ठाम भूमिका घेऊन निवडणुकीऐवजी सन्मानपूर्वक निवड या पर्यायाचे समर्थन केले. तसा ठराव मसापच्या कार्यकारी मंडळात प्रथम मंजूर केला आणि महामंडळातही तो मंजूर व्हावा यासाठी पुढाकार घेतला. सर्व संस्थांच्या सहमतीने हा पर्याय स्वीकारला गेला आणि डॉ. अरुणा ढेरे, फादर फ्रान्सिस



दिब्रिटो, डॉ. जयंत नारळीकर यांच्या रूपाने वाचकांच्या मनातील संमेलनाध्यक्ष संमेलनांना मिळाले.

तंत्रस्नेही समाजाला साहित्य परिषदेशी जोडण्यासाठी परिषदेने संकेतस्थळ सुरू केले, फेसबुक पेज सुरू केले, व्हॉटस्ॲप ग्रुपच्या साहाय्याने साहित्यरसिकांना जोडले. कार्यकारी मंडळातील सदस्यांनी स्वत: ग्रंथ दत्तक घेऊन आणि ग्रंथप्रेमींना आवाहन करून परिषदेच्या वा. गो. आपटे संदर्भ ग्रंथालयातील दुर्मिळ ग्रंथांचे डिजिटायझेशन केले. मराठी वाङ्मयाचा इतिहास, सात खंडांत प्रकाशित करणारी मसाप ही भारतातील एकमेव साहित्यसंस्था आहे. हा इतिहास ई-बुक रूपात आणला. परिषदेतर्फे घेतल्या जाणाऱ्या परीक्षांची व्याप्ती वाढविताना काळाची गरज ओळखून अभ्यासक्रमांची पुनर्रचना केली. परिषदेचे मुखपत्र असलेल्या 'साहित्य पत्रिके'ला आयएसएसएन नंबर मिळवून तो अंक ई-स्वरूपात उपलब्ध करून दिला. ज्ञानमंडळाच्या माध्यमातून परिषद विश्वकोश निर्मिती मंडळासाठी मोलाचे योगदान देत आहे. महापुरात उद्ध्वस्त झालेल्या सांगलीच्या नगर वाचनालयाला अकरा हजार पुस्तके परिषदेने भेट म्हणून दिली.

परंपरा आणि आधुनिकतेचा मिलाफ घडवित आज साहित्य परिषदेची वाटचाल सुरू आहे. जुन्यातले नवे आणि नव्यातले अगदी नवे स्वीकारत यापुढेही परिषद समाजमनाची स्पंदने ओळखून कार्यरत राहणार आहे.

**प्रा. मिलिंद जोशी**
चलभाष: ९८५०२७०८२३





# जागतिकीकरण संस्कृति संघर्ष-करेलः प्रा. विलास वाघ

प्रा. मिलिंद कसबे

काही दिवसांपूर्वी प्रा. विलास वाघ यांचे निधन झाले. महाराष्ट्र साहित्य परिषद आणि पत्रिकेतर्फे मा. प्रा. विलास वाघ यांना भावपूर्ण श्रद्धांजली. डॉ. बाबासाहेब आंबेडकरांच्या विचारांचे अनुयायी, दलित परिवर्तनवादी चळवळीतील कार्यकर्ते, तत्त्वनिष्ठ प्रकाशक व संपादक आणि ज्येष्ठ समाजवादी विचारवंत म्हणून प्रा. विलास वाघ यांची ओळख आहे. डॉ. बाबासाहेब आंबेडकरांच्या विचारांचे प्रसारक म्हणून सुगावा प्रकाशनाच्या रूपाने प्रा. विलास वाघ व प्रा. उषाताई वाघ यांनी स्वत:ची ओळख निर्माण केली आहे. संदर्भ ग्रंथासाठी घेतलेली ही मुलाखत...

प्रा. वाघ यांनी चर्चेला सुरुवात केली आणि आपल्या बालपणात ते पोहोचले, ''माझं बालपण अत्यंत दारिद्र्यात गेलं. धुळे जिल्ह्यातलं मोराणे हे आमचे गाव. आम्ही चौघे भाऊ. आमचे वडील लहानपणीच वारले. आमचा सर्वात धाकटा भाऊ तेव्हा सहा महिन्यांचा होता. मला तर वडिलांचा चेहरा आठवत नाही एवढा मी लहान होतो. वडिलांच्या निधनानंतर सारी जबाबदारी आईवर आली. प्रचंड दारिद्र्य होतं. आई दिवसभर जंगलात जायची. दिवसातनं दोन वेळा मोळ्या आणायची. त्या विकल्यानंतर घरात पीठ यायचं. असेल त्या पिठाच्या भाकरी करून आई अर्धी, चतकोर आम्हाला द्यायची. पाण्यात मीठ घालायचो आणि त्यात भाकरीचा तुकडा बुडवून आम्ही खायचो. एवढं दारिद्र्य होतं. आता याची आठवण झाली तरी अंगाचा थरकाप होतो. संताप येतो. आपल्या वाट्याला केवढं दारिद्र्य होतं!

**मिलिंद कसबे: तुमचा शिक्षणाचा प्रवास कसा सुरू झाला? एवढं दारिद्र्यअसूनही तुम्ही शिक्षण कसं घेतलं?**

**वाघ सर :** तुला सांगतो, आम्ही शिक्षणासाठी शाळेत गेलोच नाही, तर भाकरीसाठी शाळेत गेलो. आमचं गाव पुढारलेलं होतं. धुळ्यात 'हरिजन सेवक संघा'चे 'राजेंद्र छात्रालय' नावाचं वसतिगृह होतं. या वसतिगृहात केवळ दोन वेळचं जेवण मिळेल म्हणून आईनं संस्थाचालकांना विनवणी करून आम्हाला वसतिगृहात टाकलं. मी पहिलीत गेलो तेव्हा आठ वर्षांचा होतो. उशिरा शाळेत गेलो. शाळेत ज्ञान मिळेल, जीवन सुधारेल असा कोणताच विचार डोक्यात नव्हता. केवळ वसतिगृहात जेवण मिळतं हाच उद्देश जाण्याचा होता.

**तुम्हाला लिहिता- वाचता येऊ लागलं अशा काळात तुमच्या वाचनात काय काय येत होतं?**

मी विशेष काही वाचत नव्हतो. शाळेत मिळतील ती पुस्तके वाचायचो, पेपर वाचायचो. कथा- कादंबऱ्या असं रंजक साहित्य मात्र मी वाचत नव्हतो.

**त्या वयात बाबासाहेब आंबेडकरांबद्दल आपण काही ऐकलं होतं का? बाबासाहेबांचा विचार कोणत्या वयात आपल्याला कळू लागला?**

तुला सांगतो मिलिंद, मी स्वत:ला खूप धन्य समजतो की, बाबासाहेबांच्या विचारांनाच नव्हे तर खुद्द



अनुक्रमणिका

बाबासाहेबांना, त्यांच्या हाताला मला स्पर्श करता आला. १९५६ सालची गोष्ट. सप्टेंबर महिना होता. तेव्हा मी इयत्ता नववीत होतो. आमच्या शाळेची सहल दिल्लीला गेली. मीही सहलीत होतो. दिल्ली पाहून झाली. ज्या हॉस्टेलमध्ये आमचा मुक्काम होता तिथली मुलं सांगू लागली, 'बाबासाहेब आंबेडकर जवळच राहतात.' आम्ही सर्वांनी ठरवलं, की बाबासाहेबांना भेटायला जायचं. आपल्या जातीतला एक मोठा माणूस एवढंच बाबासाहेबांबद्दल माहीत होतं. आम्ही १५/२० मुलं बाबासाहेबांना पाहायला गेलो. बाबासाहेब व्हरांड्यात आरामखुर्चीत पेपर वाचत होते. गोरेपान आणि रुबाबदार होते ते. त्यांनी आम्हा पोरांना जवळ बसवलं, प्रत्येकाची नावं विचारली. आपुलकीनं चौकशी केली.

धुळ्यातले कार्यकर्ते, हरिजन सेवक संघाचे काकासाहेब बर्वे यांचे नाव त्यांनी घेतले. आम्ही त्यांच्याच वसतिगृहात शिकतो असं आम्ही त्यांना सांगितले. बाबासाहेबांच्या खूप जवळ उभे होतो. महामानवाला आम्ही स्पर्शही केला. मी त्यांच्या हाताला स्पर्श केला. किती मोठ्या माणसाला आपण स्पर्श करत आहोत हे आम्हाला तेव्हा कळलं नाही. ही सप्टेंबरची गोष्ट. पुढे ऑक्टोबरमध्ये धर्मांतर झालं आणि डिसेंबरमध्ये बाबासाहेबांचे महानिर्वाण झालं. बाबासाहेबांची भेट हा प्रसंग आमच्या आयुष्यातला खूप मौल्यवान प्रसंग होता. बाबासाहेबांना पाहाणंसुद्धा माझ्यासाठी जीवन सार्थक करणारं आहे.

**उच्च शिक्षण घेताना तुमच्या वाचनाचा परीघ कसा कसा विकसित होत गेला?**

मला कळायला लागल्यापासून बाबासाहेबांचे विचार तर माझ्या मनात आलेच; पण थोडाफार मार्क्स माझ्या वाचनात आला. समाजवादी विचार वाचनात आले. हायस्कूलपर्यंत माझं वाचन नव्हतं. ते वय काही कळण्याचं नव्हतंच. जिथं भाकरीचीच चिंता होती तिथं वाचन कसं होईल? कॉलेजला गेल्यानंतर मात्र कळू लागले. त्या काळात माझ्या वाचनात बाबासाहेब तर आलेच; पण थोडाफार मार्क्स आला, समाजवादी विचार वाचू लागलो. काही प्रमाणात कम्युनिस्ट चळवळीचे लेखन वाचलं. विशेष म्हणजे बुद्धांचे तत्त्वज्ञान, महात्मा फुले आणि शाहू महाराजांचे जीवनकार्य मी वाचत गेलो. याच काळात

**बाबासाहेब आंबेडकरांचे विचार समाजापर्यंत खऱ्या अर्थाने पोहोचवायचे असतील, तर वाचन संस्कृती विकसित केली पाहिजे. लेखक आणि वाचक तयार झाले, तर दलित कार्यकर्त्यांना बळ मिळणार आहे असा विचार आमच्या मनात आला. यातूनच सुगावा प्रकाशनाचा जन्म झाला. सुगावा प्रकाशनाचा व्यवसाय उभा केला. सदाशिव पेठेत आंबेडकरी विचारांचे प्रकाशन उभं करणं ही गोष्ट सोपी नव्हती. खूप त्रासातून जावं लागलं. डॉ. रावसाहेब कसबे यांनी 'आंबेडकर आणि मार्क्स' हे पुस्तक आम्हाला दिलं. आम्ही ते छापलं. पुढं अनेक पुरोगामी लेखकांनी आम्हाला साथ दिली. सुगावाच्या रूपानं आम्ही एक सामाजिक परिवर्तनाचा विचार घेऊन उभे होतो. आज बघता-बघता 'सुगावा' एक चळवळ बनली आहे.**

अण्णा भाऊ साठेंचे लेखनही मी वाचले; पण तुला सांगतो, गांधी मात्र माझ्या वाचण्यात फारसे आले नाहीत. मी गांधींचे तत्त्वज्ञान किंवा ज्याला आपण गांधीवाद म्हणतो तो मुद्दामच वाचला नाही असे नाही. गांधींची ग्रामस्वराज्याची कल्पना, सत्याचे प्रयोग हे मला काही अपील झाले नाहीत. गांधी माझ्या वाचनात जे काही आले ते बाबासाहेब समजून घेण्याच्या निमित्तानं. महादेवभाई देसाईंची डायरी, 'हरिजन'चे काही अंक मी मुद्दाम वाचले कारण यात बाबासाहेबांच्याबद्दल लिहिले गेले होते.

**तुमचा व्यक्तिगत जीवनप्रवास कसा झाला? तुम्ही कोणकोणत्या नोकऱ्या केल्या?**

मी. बी. एस्सी झालो. तेव्हा विज्ञानाची पदवी म्हणजे मोठं शिक्षण होतं. मी पहिल्यांदा शिक्षक झालो. कोकणात नरडावणे म्हणून गाव होतं. तिथे एक वर्ष शिक्षकाची नोकरी केली, पहिली ते दहावीपर्यंतच्या मुलांना सर्वच विषय शिकवायचो. त्यानंतर पुण्यात अशोक विद्यालयात सात वर्षे शिक्षक म्हणून नोकरी केली.

१९८१ पर्यंत अशोक विद्यालयात काम केलं.

त्यानंतर मात्र माझ्या नोकरीचा ट्रॅक बदलला. पुण्याच्या इंडियन इन्स्टिट्यूट ऑफ एज्युकेशनमध्ये मी अॅडल्ट एज्युकेशन विभागात एक वर्ष काम केलं. प्रौढ शिक्षणाचे कोर्स घेणे, शिक्षकांना प्रशिक्षण देणं असं ते काम होतं. या कामात खूप शिकायला मिळालं आणि सामाजिक भानही आलं. त्यानंतर मी पुणे विद्यापीठात नोकरीला लागलो. पुणे विद्यापीठात प्रौढ शिक्षण विभागात मी काम करावे ही डॉ. भालचंद्र फडकेंची इच्छा होती. त्यांनीच तसे प्रयत्न केले. मी चार वर्षे विद्यापीठात प्रौढ शिक्षण विभागात प्राध्यापक म्हणून काम केले. दरम्यान अनेक सामाजिक आंदोलनांत मी सहभागी होत होतो. उषाताईशी विवाह झालेला होता. एक दिवस आम्ही दोघांनीही ठरवलं, की विद्यापीठातली नोकरी सोडायची. उषाताईही विद्यापीठात प्राध्यापक होत्या. त्या त्या काळच्या एम.एस्सी (मॅथ) फर्स्ट क्लास होत्या. आम्ही दोघांनीही अत्यंत विचारपूर्वक निर्णय घेऊन सामाजिक कार्यासाठी एकाच दिवशी नोकऱ्या सोडल्या. पुणे विद्यापीठ सोडताना एक महिना अगोदर विद्यापीठाची खोली सोडली आणि नंतर राजीनामा मंजूर झाला. सामाजिक कार्यासाठी पुणे विद्यापीठातली मोठ्या पगाराची प्राध्यापकाची नोकरी सोडणारे कदाचित आम्ही एकमेव पती-पत्नी असू.

विद्यापीठ सोडल्यावर आम्ही फर्ग्युसन कॉलेजसमोर झोपडपट्टीमध्ये राहायला आलो. आम्ही झोपडपट्टीतल्या मुलांसाठी काम सुरू केले. त्यांच्या शिक्षणासाठी प्रयत्न केले. पुण्यात झोपडपट्टीतल्या वडार समाजातील मुलांसाठी बालवाडी चालवली. वेश्यांच्या मुलांसाठी वसतिगृह चालवले. १९७८ पासून आम्ही हे करत होतोच. नोकरी सोडल्यावर हे काम अधिक लक्ष घालून करू लागलो. उषाताईंनी या सर्व कामांत साथ दिली. आम्ही एकमेकांचे केवळ नवरा-बायको अशा नात्याने राहिलो नाही तर समविचारी व्यक्ती म्हणून वावरलो.

बाबासाहेब आंबेडकरांचे विचार समाजापर्यंत खऱ्या अर्थाने पोहोचवायचे असतील, तर वाचन संस्कृती विकसित केली पाहिजे. लेखक आणि वाचक तयार झाले, तर दलित कार्यकर्त्यांना बळ मिळणार आहे असा विचार आमच्या मनात आला. यातूनच सुगावा प्रकाशनाचा जन्म झाला. सुगावा प्रकाशनाचा व्यवसाय उभा केला. सदाशिव पेठेत आंबेडकरी विचारांचे प्रकाशन उभं करणं ही गोष्ट सोपी नव्हती. खूप त्रासातून जावं लागलं. डॉ. रावसाहेब कसबे यांनी 'आंबेडकर आणि मार्क्स' हे पुस्तक आम्हाला दिलं. आम्ही ते छापलं. पुढं अनेक पुरोगामी लेखकांनी आम्हाला साथ दिली. सुगावाच्या रूपानं आम्ही एक सामाजिक परिवर्तनाचा विचार घेऊन उभे होतो. आज बघता-बघता 'सुगावा' एक चळवळ बनली आहे.

शिक्षणावर विशेषतः मागास जातींतील मुलांच्या शिक्षणावर काम करणं यावर आमचा सुरुवातीपासून भर होता. आज 'तळेगाव ढमढेरे' येथे आमची आश्रमशाळा आणि तीन वसतिगृहे आहेत. धुळ्याला एम.एस.डब्ल्यू (समाजसेवा) अभ्यासक्रमाचं डॉ. बाबासाहेब आंबेडकर समाजकार्य महाविद्यालय आहे आणि हे सारे भ्रष्टाचारमुक्त उत्तमपणे चाललं आहे.

**सुगावा प्रकाशनाचे नाव राष्ट्रीय स्तरावर गेलं आहे. सुगावाचे प्रकाशक म्हणून याविषयी आपण काय सांगाल?**

मला वाटतं सुगावा केवळ प्रकाशन नाही तर एक चळवळ आहे. सुगावाचे पहिले पुस्तक अण्णा भाऊ साठेंवरील 'माझा भाऊ अण्णा भाऊ' हे आहे. त्यानंतर रावसाहेब कसबे यांचे 'आंबेडकर आणि मार्क्स' हे पुस्तक आम्ही प्रकाशित केलं. रावसाहेबांचा स्वतःचा एक वाचकवर्ग होता. कॉ. शरद पाटील हेही आमचे जुने लेखक आहेत. त्यानंतर लक्ष्मण माने, रामनाथ चव्हाण, नरेंद्र जाधव, सुखदेव थोरात, यशवंत मनोहर, वामन निंबाळकर, डॉ. रूपा कुलकर्णी, ज्योती लांजेवार, डॉ. जनार्दन वाघमारे अशा कितीतरी मोठ्या लेखकांची पुस्तके आम्ही प्रकाशित केली. अर्थात या साऱ्यामागं परिवर्तनाचा विचार समाजात रुजवायचा हाच हेतू होता. आज महाराष्ट्रातला कोणताही पुरोगामी माणूस पुण्यात आला, की 'सुगावा'त आल्याशिवाय राहात नाही. बुद्धाचे विचार, महात्मा फुले, कबीर, मार्क्स, शाहू महाराज, अण्णा भाऊ साठे आणि विशेष करून बाबासाहेब आंबेडकरी विचारांना केंद्र मानून आम्ही लेखन प्रकाशित केलं. आम्ही कथा, कादंबऱ्या अशा रंजक लेखनात अडकलो नाही कारण सुगावा एक विशिष्ट भूमिका घेऊन काम करणारी प्रकाशन संस्था आहे. खरं म्हणजे ही प्रकाशन संस्था नाहीच, ती विचारसंस्था आहे. विशेष म्हणजे आता महाराष्ट्रातले अनेक तरुण लेखक, प्राध्यापक सुगावाकडे येतात. विचार

व लेखनाच्या प्रक्रियेत सहभागी होतात आम्हाला याचा मनापासून आनंद होतो आहे.

**गांधी आणि आंबेडकर यांच्याकडं तुम्ही कसं पाहता?**

बाबासाहेब आंबेडकरांचा अनुयायी म्हणून मी गांधीच्या विचारांचा द्वेष करावा असे मला वाटत नाही. या दोन्ही महापुरुषांमधले वैचारिक मतभेद आपण नीट समजून घेतले पाहिजेत. ज्या काळात बाबासाहेबांचा उदय झाला तो काळ गांधीच्या विचारांचा होता. आपण पुणे कराराच्या पार्श्वभूमीवर जरी या दोन नेत्यांची मतमतांतरे तपासली तरी आपल्या हे लक्षात येईल की, तो काळ गांधींच्या प्रभावाचा होता. संपूर्ण देशात त्यांचं नाव झालेले होतं. गांधींना महात्मा म्हणून मान्यता मिळालेली होती. हरिजनांचे पुढारी म्हणूनही गांधींचीच ओळख होती. गांधीजींच्या विरुद्ध बोलणे म्हणजे महापाप असं वातावरण होतं. अशा काळात बाबासाहेब आंबेडकर म्हणाले, की या माणसाला महात्मा का म्हणायचं? बाबासाहेबांनी गांधीचा उल्लेख सतत मिस्टर गांधी असाच केला. गांधींचा वैचारिक गोंधळ, त्यांच्या वागण्यातील त्रुटी, उपरोध बाबासाहेबांना कळत होता; पण गांधीजींचं महत्त्वही बाबासाहेबांना माहिती होतं. गांधी हे या देशातलं जनाधार लाभलेले नेते आहेत. ते लोकप्रियही आहेत हे आंबेडकरांना निश्चितच माहिती होतं; पण गांधींना मात्र बाबासाहेबांचं मोठेपण मान्य होत नव्हतं आणि कसं होईल? एकतर बाबासाहेब अत्यंत तरुण होते. इथल्या सामाजिक आणि राजकीय चळवळीत बाबासाहेबांचं नेतृत्व नव्यानं उभं राहत होतं. बाबासाहेबांना त्या काळात अफाट लोकप्रियताही नव्हती. म्हणून तर गांधी हरिजनमधून 'हे कोण आंबेडकर! अशी विधाने करत. एकतर गांधी लोकप्रियतेच्या शिखरावर उभे होते आणि बाबासाहेब मात्र नुकतेच सामाजिक, राजकीय कार्याच्या पायऱ्या चढू लागले होते. अशा काळात गांधीजींना बाबासाहेबांचे महत्त्व कसे पटेल?

**पण पुढे मात्र गांधींना बाबासाहेबांचे महत्त्व पटलं, ते कसं?**

एकतर गांधीजी स्वतःला हरिजनांचे नेते मानत होते. या देशातल्या दलितांचा नेता म्हणून गांधींना ओळखलं जात होतं. मी दलिताचा राष्ट्रीय नेता असताना दुसरा नेता कसा उभा राहू शकतो? हा गांधींचा अहंकार होता.



बाबासाहेब आंबेडकरांना या देशातल्या दलितांचा नेता म्हणून ओळख मिळावी असं गांधींना वाटत नव्हते.

**मग बाबासाहेबांना यासाठी काय भूमिका घ्यावी लागली?**

तुम्हाला सांगतो, बाबासाहेबांना शेड्युल्ड कास्ट आणि 'रिपब्लिकन पक्ष फेडरेशनची स्थापना का करावी लागली? तर यासाठीच. गांधीजींकडे राष्ट्रीय नेतृत्व होतेच; पण दलितांचा नेता म्हणूनही त्यांना राहायचं होतं. तेव्हा जातीनिहाय नेतृत्व होतं. ब्राह्मणांचा नेता अमुक, पारश्यांचा नेता अमुक आणि दलितांचा नेता अमुक अमुक अशीच रचना होती. अशा काळात गांधीजींना दलितांचाही नेता म्हणून काम करायचं होतं. इंग्रजांशी बोलणी करायची होती. दलितांचा नेता म्हणून गांधीजींच्या नजरेत बाबासाहेबांना मान्यता नव्हती. गांधी स्वतःला दलितांचे नेता समजत. बाबासाहेबांना म्हणून स्वतंत्र राजकीय पक्ष काढावा लागला. दलितांचा नेता म्हणून बाबासाहेबांना मान्यता मिळवावी लागली. या काळात जातीचे संघटन केले म्हणून बाबासाहेबांवर आरोपही झाले. राजकीय पक्षाच्या स्थापनेतून आपल्या मागे जनता आहे हे बाबासाहेबांनी सिद्ध केलं.

**पुणे करारात गांधी हटवादी वागत होते असे वाटत नाही का?**

होय निश्चितच! गांधीजी केवळ पुणे करारातच नाही

तर एकूणच जीवनात हटवादी होते. पुणे कराराच्या बाबतीत नेतृत्वाचंच भांडण होतं असं म्हणावं लागेल. एकीकडे बाबासाहेब सतत स्वतःला सिद्ध करत होते. असं म्हणावं लागेल आणि दुसरीकडे गांधीजींची पकड कमी कमी होत होती.

**डॉ. बाबासाहेब आंबेडकरांना दलितांचे कैवारी म्हणताना त्यांच्या इतर कामांकडे दुर्लक्ष झालं असं वाटत नाही का?**

निश्चितच! बाबासाहेब हे केवळ दलितांचे नेते होते असे नाही. विशेषतः ते महाराष्ट्रातील महारांचे पुढारी होते असे म्हणणे म्हणजे मोठी चूक आहे. बाबासाहेब आंबेडकरांनी राष्ट्रीय स्तरावर जे काम केलं त्याची पुन्हा पुन्हा दाखल घेतली पाहिजे असं मला वाटतं. महाडचा सत्याग्रह, काळाराम मंदिर प्रवेश हे एवढंच बाबासाहेबांचे कार्य नव्हतं, तर राष्ट्राच्या नियोजन आणि विकासात बाबासाहेबांनी खूप मोठं योगदान दिलं आहे हे आपण समजून घेतलं पाहिजे.

डॉ. आंबेडकर हे दलितांचे नेते होते हे खरे आहे; पण ते भारताची 'अर्थनीती' निश्चित करणारे जागतिक दर्जाचे श्रेष्ठ अर्थतज्ज्ञ होते. भारताच्या औद्योगिक आणि कृषी विकासात बाबासाहेबांची भूमिका अत्यंत महत्त्वाची होती. भारताच्या ऊर्जाविकासात त्यांचं योगदान दुर्लक्षित करून निश्चितच चालणार नाही. यासाठी डॉ. सुखदेव थोरात यांनी केलेलं संशोधन जरूर वाचायला हवं. युद्धोत्तर काळातील आर्थिक नियोजनाचा एक भाग म्हणून मध्यवर्ती सरकारनं पाणी आणि ऊर्जाधोरणाची सुरुवात १९४२-४६ या कालावधीमध्ये पहिल्यांदा केली. याच कालावधीमध्ये डॉ.आंबेडकरांकडे मध्यवर्ती सरकारचे श्रम, जलसिंचन आणि ऊर्जाखाते होते. या काळात बाबासाहेबांनी 'मध्यवर्ती जलआयोग' आणि 'मध्यवर्ती विद्युत प्राधिकरण' स्थापन करून भारताच्या नियोजन, जल व विद्युत विकासात अत्यंत मोलाचं योगदान दिलं आहे. याशिवाय बाबासाहेबांनी दामोदर आदि नद्यावर धरणे बांधण्याची प्रक्रिया सुरू केली. स्वातंत्र्याच्या उंबरठ्यावर असतानाच बाबासाहेबांनी राष्ट्रीय इलेक्ट्रिसिटी बोर्ड निर्माण केले. आपल्याला 'प्रकाशात' आणलं; पण बाबासाहेबांचे हे कार्य मात्र प्रकाशात येऊ शकले नाही. पॉवर आणि वॉटर मॅनेजमेंट यात बाबासाहेब निष्णात होते. ज्याच्या हातात विजेची पॉवर तो सत्ताधारी, ज्याच्या हातात विजेचा कंट्रोल तो सत्ताधारी असं बाबासाहेब म्हणत. इतकी दूरदृष्टी त्यांच्याकडे होती. या देशातल्या शेतीच्या प्रश्नाकडेही बाबासाहेबाचं लक्ष होतं. कामगारांसाठी कायदे करण्यातही ते पुढे होते. या देशातल्या श्रमिकांचे प्रश्न, स्त्रियांचे प्रश्न, दलितांचे प्रश्न या सगळ्यांचे समग्र आकलन करून त्यांच्या सामाजिक न्यायासाठी बाबासाहेब सतत कार्यरत राहिले. या देशातले कामगारांचे कायदे, त्यांच्या कामाच्या वेळा, कामगार महिलांना सवलती यासाठी त्यानी स्वतंत्र कायदे केले. 'एम्प्लॉयमेंट एक्स्चेंज' ही गोष्टसुद्धा त्यांनीच सुरू केली. इतकं व्यापक आणि अफाट कार्य त्यांचं होतं, त्यामुळे त्यांना केवळ दलितांचे नेते असं म्हणून आपण त्यांच्या कार्याची उंची कमी करू नये, असं मला वाटतं. उलट आज जागतिकीकरणाच्या वास्तवात त्यांच्या विचारांचे ॲप्लिकेशन जेथे जेथे करता येईल तेथे तेथे ते करावं असं मला वाटतं.

**तुम्ही जातिनिर्मूलनासाठी आयुष्यभर प्रयत्नशील राहिलात. या कामात उषाताईंच्या साथीनं जातिनिर्मूलनासाठी सतत कृती कार्यक्रम राबविले; पण आज जागतिकीकरणाच्या वास्तवात जाती नष्ट होतील का? आपल्याला काय वाटतं?**

आपल्या देशात अनेक गोष्टी हरल्या; पण जात मात्र हरली नाही. जातीला भगदाडसुद्धा पडलं नाही. तर जात नष्ट होण्याचं सोडाच. आज आपल्या समाजव्यवस्थेतली सर्वांत खालची समजल्या जाणाऱ्या तथाकथित जातीतील लोकही आपली जात सोडायला तयार नाहीत.

**जातिनिर्मूलनासाठी आंतरजातीय विवाह हा प्रभावी उपाय आहे का?**

जाती नष्ट करण्यासाठी आंतरजातीय विवाह हा एकमेव उपाय होऊ शकत नाही. तो प्रभावी उपाय होऊ शकतो. डॉ. बाबासाहेबांनी 'जातिप्रथेचे विध्वंसन' (ॲनहिलेशन ऑफ कास्ट) या निबंधात अत्यंत प्रभावी उपाय सुचविले आहेत. एक म्हणजे धर्मचिकित्सा करणं, दुसरा धर्मांतर करणं आणि तिसरा उपाय म्हणजे आंतरजातीय विवाह करणं. आपल्या देशात बाबासाहेब सोडले, तर कुणी खऱ्या अर्थाने धर्मचिकित्सा केली नाही. रिडल्स ऑफ हिंदूइझम, यावर हजारो पानं लिहून

बाबासाहेबांनी धर्मग्रंथांची चिकित्सा केली. धर्मचिकित्सा तर अग्रभागाची आहे असं 'मार्क्स' म्हणत होता; पण भारतातल्या कम्युनिस्टांनी ती केली नाही. जे काम भारतातल्या कम्युनिस्टांनी, समाजवाद्यांनी करायला पाहिजे होतं ते काम बाबासाहेबांनी केलं. बाबासाहेब सांगत होते, की 'आंतरजातीय विवाह करा.' सामाजिक समतेसाठी हा उपाय महत्त्वाचाही आहे; पण इथल्या समाजवादी आणि कम्युनिस्ट चळवळीनं हे काम हाती घेतलं नाही. समाजवादी आणि कम्युनिस्ट या दोन्ही चळवळींत टॉपचे लीडर ब्राह्मण होते हेही लक्षात घेतलं पाहिजे. आपल्या देशात आंतरजातीय विवाहाची चळवळ जेवढी गतिमान व्हायला पाहिजे होती तेवढी ती झाली नाही. काही प्रमाणात प्रयत्न निश्चित झाले; पण ते अपुरे पडले असंच म्हणावं लागेल.

**तुम्ही आंतरजातीय विवाहाचे पुरस्कर्ते आहात. यासाठी तुम्ही जातिनिर्मूलनाच्या चळवळीत सहभागी झालात. उपाताई आणि तुम्ही आंतरजातीय विवाह केला. आजपर्यंत अनेक आंतरजातीय विवाह तुम्ही घडवून आणले. तुम्ही ठरवून आंतरजातीय विवाह केला की तो प्रेमविवाह होता?**

उषाताई आणि मी ठरवून आंतरजातीय विवाह केला. आमचा प्रेमविवाह नाही. आम्ही दुसऱ्यांना बाबासाहेबांचा जातिनिर्मूलनाचे विचार सांगायचो, मग आम्ही नको का ते कृतीत आणायला? त्यामुळे आम्ही आंतरजातीय विवाह करून, ठरवून बाबासाहेबांचे विचार कृतीत आणले; पण ही काही अचानक घडलेली गोष्ट नाही. विद्यार्थीदशेपासून मी जातिनिर्मूलनाच्या चळवळीत काम करीत होतो. 'एक गाव एक पाणवठा' या चळवळीत आम्ही सक्रिय होतो. बाबा आढाव आमचे नेतृत्व करीत होते. यात आंतरजातीय विवाहाची चळवळ उभी राहावी यासाठी आम्ही काही मित्र विशेष प्रयत्न करीत होतो. आमचा सात-आठ जणांचा ग्रुप होता. प्रा. तेज निवळीकर, पंडित विद्यासागर, नाटककार संजय पवार, प्रा. प्रदीप गोखले असा आमचा ग्रुप होता. १९८५ सालची गोष्ट. आंतरजातीय विवाहाचा प्रसार व्हावा म्हणून आम्ही पुण्यात बालगंधर्वमध्ये एक प्रदर्शन आयोजित केलं. या प्रदर्शनाला विविध जाती-धर्मांच्या लोकांकडून खूप चांगला प्रतिसाद मिळाला. पुढं महाराष्ट्रात वेगवेगळ्या जिल्ह्यांत आम्ही मेळाव्यांचे आयोजन केले. परिसंवाद, चर्चा घडवून आणल्या. आंतरजातीय विवाहासंबंधी समाजात जागृती व्हावी म्हणून आम्ही झपाटल्यासारखे काम करत होतो. अनेक महाविद्यालयांत जाऊन तरुण पिढीशी संवाद साधत होतो. त्यांचे समुपदेशन करत होतो. बाबासाहेबांचे विचार तर सांगत होतोच; पण महात्मा फुले, मार्क्स, कबीर आणि बुद्धांचे व्यापक तत्त्वज्ञानही लोकांसमोर नेत होतो. जातिनिर्मूलनाचं एक समग्र प्रबोधन आम्ही करत होतो. आंतरजातीय विवाह हा त्या प्रोग्रॅमचा एक भाग होता. आंतरजातीय विवाह म्हणजे केवळ ब्राह्मण आणि बौद्ध यांच्यातला विवाह नव्हे तर आपली जात सोडून दुसऱ्या जातीत विवाह करणे असं मला वाटतं. (या प्रश्नावरील उत्तरात उषाताईंनी सहभाग घेतला, याविषयी त्यांनीही आपले मत नोंदविले.

**उषाताई:** आंतरजातीय विवाह म्हणजे ब्राह्मण मुलीशी लग्न असा समज पूर्वाश्रमीच्या महार आणि आजच्या बौद्धांमध्ये आजही आहे. हा समज सुशिक्षित, उच्चवर्गीय बौद्धांनी अधिक पसरवला आहे. आंतरजातीय विवाहाचा खरा प्रसार व्हायचा असेल, तर भिन्न जातींत लग्ने व्हायला हवीत; पण समाजातल्या मागासवर्गीय जातींमध्येही लग्नं झाली पाहिजेत.

**उषाताईंचे निरीक्षण बरोबर आहे; पण तुम्हीही बौद्ध-ब्राह्मण असाच विवाह केला ना?**

**प्रा.वाघ :** अरे बाबा तुला पुन्हा एकदा सांगतो, मी काही ठरवून ब्राह्मण मुलीशी लग्न केलं नाही. मी मातंग समाजातील मुलगीही पाहिली होती; पण ते जमलं नाही. सामाजिक समतेच्या लढ्यात काम करताना उषाताईंचे व माझे विचार पटले, जातिनिर्मूलनाच्या कार्यात आमचं एकमत झालं आणि आम्ही विवाह केला. अर्थात जातिनिर्मूलनाच्या चळवळीत आम्ही जे सात-आठ मित्र सक्रिय होतो त्या सर्वांनी ठरवून आंतरजातीय विवाह केलेत हे विशेष. तेज निवळीकर, संजय पवार, प्रा. गोखले, प्रा. विद्यासागर आम्ही सर्वांनीच आंतरजातीय विवाह केले. तेही भिन्न भिन्न जातीत. अर्थात त्यामुळे आम्हा साऱ्यांचीच लग्नं उशिरा झाली हेही सत्य आहे.

**उषाताईंशी म्हणजे ब्राह्मण मुलीशी लग्न केल्यामुळे तुम्हाला कोणकोणते त्रास झाले?**

त्रास होण्याचा प्रश्नच नाही. आम्ही त्रास दूर करण्याचेच काम करत होतो. अर्थात ते एक बंडच होतं.



अनुक्रमणिका

**जाती नष्ट करण्यासाठी आंतरजातीय विवाह हा एकमेव उपाय होऊ शकत नाही. तो प्रभावी उपाय होऊ शकतो. डॉ.बाबासाहेबांनी 'जातिप्रथेचे विध्वंसन' (ॲनहिलेशन ऑफ कास्ट) या निबंधात अत्यंत प्रभावी उपाय सुचविले आहेत. एक म्हणजे धर्मचिकित्सा करणं, दुसरा धर्मांतर करणं आणि तिसरा उपाय म्हणजे आंतरजातीय विवाह करणं. आपल्या देशात बाबासाहेब सोडले, तर कुणी खऱ्या अर्थाने धर्मचिकित्सा केली नाही. रिडल्स ऑफ हिंदूइझम, यावर हजारो पानं लिहून बाबासाहेबांनी धर्मग्रंथांची चिकित्सा केली. धर्मचिकित्सा तर अग्रभागाची आहे असं 'मार्क्स' म्हणत होता; पण भारतातल्या कम्युनिस्टांनी ती केली नाही. जे काम भारतातल्या कम्युनिस्टांनी, समाजवाद्यांनी करायला पाहिजे होतं ते काम बाबासाहेबांनी केलं. बाबासाहेब सांगत होते, की 'आंतरजातीय विवाह करा.' सामाजिक समतेसाठी हा उपाय महत्त्वाचाही आहे;**

अशा वेळी सामाजिक त्रास होणार हे गृहीत धरायला हवं. ते आम्ही स्वीकारलं होतं.

**पुढं तुम्ही उभयतांनी अनेकांचे आंतरजातीय विवाह लावले.**

होय, उषाताईंच्या साथीनं मला अधिक सामाजिक बळ मिळालं. उषाताई खूप तत्त्वनिष्ठ आहेत. माणसाच्या जीवन विकासाकडं त्या अगदी नैसर्गिकपणे पाहत. समतेच्या लढाया, श्रमिकांच्या प्रश्नांवर आणि स्त्रियांच्या हक्कांसाठी कार्य करताना त्यांचे विचार आणि त्यांच्या भूमिका स्पष्ट आहेत. जातिनिर्मूलनाच्या कामात आम्ही दोघंही इतके गुंतलो, की तो आमचा जीवनव्यवहारच आहे असं आम्हाला वाटतं. महाराष्ट्राच्या कानाकोपऱ्यांतून आमच्याकडं मुलं-मुली यायचे, आंतरजातीय विवाहाला मदत करा म्हणायचे. आम्ही त्यांना विचारानं सक्षम करायचो, रजिस्टर लग्न लावून द्यायचो, संसाराला आर्थिक मदत करायचो. वेळप्रसंगी पोलीस स्टेशन आणि न्यायालयातही त्यांच्या मागं उभं राहायचो. आम्ही कित्येकांचे पालक झालो, तर अनेकांचे मित्रही झालो.

आता हेच पाहा ना! हे समोर बसलेले प्रा. अहिवळे यांचा आंतरजातीय विवाह आम्हीच लावला. आंतरजातीय विवाह, प्रेमातून अगर ठरवून होवोत; पण ते झाले पाहिजेत, तरच सामाजिक समता येईल हे मात्र खरे.

आम्ही वेश्यांच्या मुलांसाठी काम केलं. काही वेश्यांच्या मुलींची लग्न लावून दिली. त्यांच्या मुलांच्या शिक्षणासाठी वसतिगृह सुरू केलं. शाळा सुरू केली. आदिवासींमध्ये जाऊन शैक्षणिक जागृती केली. कॉलेज सुरू केलं धुळ्याला. ते उत्तम चाललं आहे. काय करायला पाहिजे यापेक्षा वेगळं?

**सुगावा प्रकाशनाच्या कामातून तुम्ही प्रकाशक म्हणून माहीत झालात. आंबेडकरवादी म्हणून तुमची खास ओळख निर्माण झाली आणि समाजवादी चळवळीतील अग्रणी कार्यकर्ते म्हणूनही तुम्ही कार्य करत राहिलात. यात तुमची नेमकी आयडियालॉजी कोणती?**

माझं गाव पूर्ण समाजवादी होतं. धुळे जिल्ह्यातलं मोराणे हे ते गाव. लहानपणापासूनच माझ्यावर समाजवादी विचारांचे संस्कार झाले. आमच्या गावात तमाशा होत नसे. कुणी भिकारी जरी गावात आला, तर त्याला भीक मागण्यापासून प्रवृत्त केले जाई. आमच्या गावात राष्ट्र सेवा दलाची शाखा होती. तू आयडियालॉजी म्हणतोस; पण मी कोणती एक विचारसरणी घेऊन वावरलो नाही. माणूस हीच माझी आयडियॉलॉजी होती. माणसाला दुःखमुक्त करणारा विचार मी सतत स्वीकारत गेलो. तुम्हाला गंमत वाटेल; पण माझा प्रवास फार मजेशीर आहे. मी सुरुवातीला समाजवादी होतो. त्यानंतर मी गांधीवादी झालो. आंबेडकरी चळवळीत मी फार उशिरा आलो.

मी गांधीवाद्यांच्या सहवासात होतो. माझ्यावर गांधीवाद्यांचे बऱ्यापैकी संस्कार झाले. तुला आश्चर्य वाटेल; पण मी शाळेत असताना सूत कातायचो, स्वतःचा शर्ट होईल एवढं सूत कातायचो. सूत कातण्यात माझा पहिला नंबर होता. धुळ्यात हरिजन सेवक संघाच्या वसतिगृहात असताना हे सगळं मी करायचो, त्यामुळे माझ्यावर ते संस्कार झाले. रोज गीतेतला अठरावा अध्याय म्हणायचा, रोज सूत कातायचं, स्वच्छता, ग्रामसफाई

आणि स्वावलंबन असे सारे संस्कार माझ्यावर झाले; पण असे असूनही मी मात्र गांधीवादी झालो नाही, होय! गांधीवाद्यांच्या सहवासात निश्चित वाढलो आणि राहिलोही. माझ्यावर समाजवाद्यांचेही संस्कार झाले हे खरंच आहे. समाजवादी विचारसरणीतला जो विचार मला पटायचा तो मी स्वीकारायचो. त्या दृष्टीनं कृतीही करायचो म्हणून लोक मला समाजवादी म्हणू लागले. माझे सर्व मित्र समाजवादी चळवळीतले आहेत. ती चळवळ मला जवळची वाटते एवढाच समाजवादाशी माझा संबंध आहे. मला एक गोष्ट आवर्जून सांगायला पाहिजे आणि ती म्हणजे मी सेवादलात वाढलो, समाजवाद्यांत वावरलो, मी गांधीवाद्यांमध्येही राहिलो हे सारं खरं आहे; पण मी मूलतः आंबेडकरवादी आहे.

**आंबेडकरवादाशी किंवा आंबेडकरी चळवळीशी तुमचा संबंध कसा आला? या काळात तुम्ही कुणाच्या सहवासात आलात?**

मी कुणाच्या प्रभावानं आंबेडकरी चळवळीत आलो असं नाही. मी कुणाला गुरू मानलं नाही किंवा कुणाच्या प्रभावातही राहिलो नाही. मी सतत स्वतंत्रपणे विचार करत गेलो. बुद्ध, फुले आणि बाबासाहेब वाचत गेलो. यातूनच माझं स्वतःचं मत तयार झालं. तेच मी प्रमाण मानलं. मी आंबेडकरवादी असलो तरी आंबेडकरी राजकारणात मात्र गेलो नाही. समाजवाद्यांच्या आणि दलितांच्या दोघांच्याही राजकारणापासून मी दूर राहिलो. सामाजिक चळवळ हेच मी केंद्र मानले. मी पुण्यात आलो, अनेक दलित कार्यकर्ते माझे मित्र होते. माझ्याकडे दररोज अनेक कार्यकर्ते यायचे. आमचा पंधरा-वीस कार्यकर्त्यांचा ग्रुप होता. दर मंगळवारी आम्ही एकत्र यायचो. सामाजिक आणि राजकीय प्रश्नांवर चर्चा करायचो. नामदेव ढसाळ, रामदास आठवले, लक्ष्मण माने, अर्जुन डांगळेस, दया पवार, नारायण सुर्वे अशा कितीतरी लेखक/ कार्यकर्त्यांशी माझा संबध होता; पण मी दलित पँथरमध्येही गेलो नाही आणि आरपीआयमध्येही गेलो नाही. सामाजिक प्रश्नांसाठी आम्ही एकत्र आहोत एवढेच.

पुण्यात टेक्सास गायकवाड, मुरलीधर जाधव इत्यादी मंडळी नेहमी बरोबर असायची. एकदा भाई वैद्य यांना ही गोष्ट कळाली. त्यांनी आमची स्वतंत्र बैठक घेतली आणि जनता पक्षात येण्याचं आवाहन केलं. तेव्हा त्यांच्याबरोबर जनसंघ होता. अनेक पक्ष एकत्र झाले होते. भाईंना आम्ही स्पष्टपणे सांगितलं, की तुमच्याबरोबर जनसंघ आहे म्हणजेच आरएसएस आहे, त्यामुळे आम्ही वैचारिकदृष्ट्या तुमच्याबरोबर येऊ शकत नाही. भाईंनाही ते पटलं; पण भाईंना तेव्हा वाटायचं की जनसंघ बदलतो आहे. पुढे असे कितीतरी प्रसंग आले; पण राजकीय चळवळीत जाण्याचं धाडस मात्र झालं नाही.

**तुम्ही कम्युनिस्ट चळवळीलाही जवळचे आहात ते कसे?**

मी कम्युनिस्ट पार्टीचा सदस्य नाही; पण मला तो विचार आवडतो. माझे अनेक मित्र कम्युनिस्ट आहेत. गोविंद पानसरे, भास्करराव जाधव, शरद पाटील, भीमराव बनसोड या सर्वांशी माझा स्नेह आहे. त्यांनाही वाटत असावं मी कम्युनिस्ट असावं, समाजवाद्यांनाही वाटतं मी समाजवादी असावं आणि आंबेडकरवाद्यांनाही वाटतं मी दलितांच्या राजकारणात यावं; पण माझे विचार आणि भूमिका मात्र पक्की होती. मी सर्व प्रवाहांत थोडा थोडा राहिलो; पण स्वतःच्या भल्यासाठी कोणत्याही पक्षाचा कधीच फायदा घेतला नाही. उपेक्षित माणसाचं हित हाच माझा पक्ष राहिला.

मला कम्युनिस्ट विचार पटत असला तरी माझी स्वतःची एक भूमिका मी सतत मांडत गेलो; पण कार्ल मार्क्सनं जो पिळवणुकीचा सिद्धांत मांडला तो मला पटतो म्हणून मी कम्युनिस्ट विचारांचा समर्थक आहे. मी अनेकांकडे गेलो; पण कम्युनिस्टांकडे गेल्यावर त्यांच्यासारखे आणि समाजवाद्यांकडे गेल्यावर त्यांच्यासारख बोलायचं असं मात्र केलं नाही. बाबासाहेबांचा जातिनिर्मूलनाचा विचार कम्युनिस्टांनी आणि समाजवाद्यांनीही राबविला नाही. या दोघांनीही आपापल्या जाती सोडल्या नाहीत असं मला वाटतं.

**तुम्ही विविध विचारप्रवाहांत वावरलात; पण कुठं अडकला नाहीत मग तुमच्या जीवनकार्यांचा सारांश काय आहे असं तुम्हाला वाटतं?**

'सामान्य माणसाचे प्रबोधन' हाच माझ्या कामाचा सारांश आहे असं मला वाटतं. मला महाराष्ट्र फाऊंडेशनचा जो पहिला पुरस्कार मिळाला तो याच कामासाठी. त्या पुरस्काराचे मिळालेले पन्नास हजार रुपये मी संस्थेला दिले. सामान्य माणसाचं हित हेच आपले हित आहे असं मानलं.

की दुःख हलकं होतं.

**आपल्या सांस्कृतिक चळवळीकडे तुम्ही कसं पाहता? जागतिकीकरणातले सांस्कृतिक संघर्ष अधिक जटिल होतील असं तुम्हाला वाटतं का?**

जागतिकीकरणात जात नष्ट होईल, धर्म नष्ट होतील. ही गोष्ट भ्रामक आहे, असं मला वाटतं. आजही जात आणि धर्म संपलेत का? उलटं भारतात धर्म आणि जाती अधिकाधिक प्रबळ होताना दिसतात. जागतिकीकरणाचे समर्थक कितीही म्हणोत; पण भारतातली जातीव्यवस्था नष्ट होणार नाही; पण ती नष्ट व्हायलाच पाहिजे. हो, ती वेगवेगळी रूपं निश्चित बदलेल; पण ती संपणार नाही. मला वाटतं आज जागतिकीकरणात सर्वांत मोठा संस्कृति-संघर्ष म्हणजे जातीजातींमधील भांडणं आहेत. हिंदू धर्मातील जातींचे सोडाच; पण बौद्ध धर्मात येऊनही आपण जात सोडली नाही याचे वाईट वाटते.

**म्हणजे नेमकं काय?**

खरं म्हणजे ज्याला स्वतःच्या जातीचा अभिमान आहे तो बौद्ध असूच शकत नाही ना! बुद्धमय होणं म्हणजे जात टाकणे होय. मग आज बाबासाहेबांच्या सर्वच अनुयायांनी तरी जात टाकली का? तर नाही. जो जातीत लग्न करतो किंवा ज्याला स्वतःच्या जातीचा अभिमान आहे तो बौद्ध असूच शकत नाही.

तुला एक उदाहरण सांगतो. एकदा एका सभेत भाषणाच्या सुरुवातीला मी अशी घोषणा केली होती की, 'लोकहो, मला जात नाही, मी कोणत्याही जातीचा नाही' भाषण संपल्यावर एक कार्यकर्त्यानं मला सुनावलं, तो म्हणाला 'वो साहेब अहो, तुम्हांला जात नसंल; पण तुमच्या आई-बापाला तरी जात असंल ना?' याचा अर्थ असा, की मला जात नाही हे समोरच्याला सहन होत नाही. अशी अवस्था आहे. मला वाटतं आंबेडकरांचे नाव घेणाऱ्यांनी तरी जाती मोडायला पाहिजेत. काल मला एका बौद्ध माणसाच्या मुलाची लग्नपत्रिका आली त्यावर लग्नाची वेळ १०.३५ होती. कुठून काढली ही वेळ? शेवटी पंचांग पाहिलंच ना! मला वाटतं तू ज्याला संस्कृतिसंघर्ष म्हणतोस ना? तो आपल्याच घरात आहे.

**लक्ष्मण माने यांनी आपल्या समाजातील अनुयायांसह बौद्ध धर्मात प्रवेश केला. तुम्ही याकडे कसं पाहता?**

खरं म्हणजे लक्ष्मण माने यांचे धर्मांतर ही बाब निश्चितच स्वागतार्ह आणि खूपच आनंदाची आहे असं मला वाटतं. लक्ष्मण मानेंनी धर्मांतर केलं; पण पुढं काय? जाती अंताच्या लढ्यासाठी कोणता कृती-कार्यक्रम त्यांनी आखलेला दिसत नाही. त्यांच्या धाडसाचं आपण निश्चितच स्वागत आणि कौतुकही करायला पाहिजे; पण त्यांनी या चळवळीला पुढे काही कृती-कार्यक्रम दिला नाही तर हे धर्मांतर राजकीय स्टंटबाजी ठरण्याची शक्यता अधिक आहे.

जाती अंताच्या कार्यक्रमात पहिल्यांदा बौद्धांनी व्यापक व्हायला पाहिजे, असे मला मनापासून वाटतं. समाजात बुद्ध, फुले आणि बाबासाहेब अधिकाधिक रुजवायला हवेत. वेगवेगळ्या जाती धर्मांतर करताहेत, बौद्ध धम्म स्वीकारताहेत ही गोष्ट स्वागतार्ह आहे; पण पुढे ओबीसी बौद्ध झाले, भटके-विमुक्त बौद्ध झाले. चर्मकार बौद्ध झाले तर चांगलंच होईल; पण प्रश्न आहे, तो म्हणजे ते आपल्या जाती टाकतील का?

**आरक्षण जातीवर उभं नाही का? मग जाती अंताचं काय?**

रिझर्वेशनकडं आपण फार ढोबळमानानं बघू नये असं मला वाटतं. मुळात जाती टिकवणं हा रिझर्वेशनचा हेतू नाही. उलट जाती मोडणं हाच मूळ हेतू आहे हे आपण लक्षात घेतलं पाहिजे; पण एवढा उदार विचार आज कोण करतो? सवलतीचा फायदा घेऊन शिकलेल्यांनीही जाती तोडल्याच नाहीत. उलट मध्यमवर्गाने जाती अधिक घट्ट केल्या, असं माझं मत आहे.

रिझर्वेशनचा फायदा घेऊन नोकरी मिळवायची, जातीत लग्न करायचं मग माझं घर, माझी बायको, गाडी, हॉटेलिंग, मुलांना कॉन्व्हेंटमध्ये घालायचं अशी मध्यमवर्गीय जाणीव आपण अधिक पक्की केली. मला वाटतं मध्यमवर्गीय जाणीव ही भित्र्या लोकांची जाणीव आहे. हे ॲलिनिटेड बनणे म्हणजे पांढरपेशा बनणे आहे. आंबेडकरी चळवळीत असा पांढरपेशा वर्ग मोठ्या प्रमाणात आहे. हा वर्ग इतका स्वकेंद्रित झाला आहे की, तो नातेसंबंध विसरला. तेवढंच नाही तर कुटुंबातील रक्ताच्या नात्यांनाही विसरला आहे. पुण्यातच असे कितीतरी दलित आहेत, की गावाकडं मजुरी करणाऱ्या भावाकडं, त्यांच्या मुलांच्या शिक्षणाकडं त्यांचं लक्ष नाही. जाती अंताच्या



अनुक्रमणिका

लढ्यात हा अॅलिनिटेड वर्ग अत्यंत घातक आहे, असं मला वाटतं.

शिक्षण आणि आरक्षणाच्या प्रक्रियेत बाबासाहेब आंबेडकरांना हे अपेक्षित नव्हतंच. बाबासाहेबांनी काही मुलं इंग्लंडला शिकायला पाठवली. त्यांनी केवळ महार तरुणांनाच पाठविले नाही. सोळंकी मेहतर होते. पी. बाळू चांभार होते. टी. बी. आवळे मातंग होते. ही व्यापक दृष्टी बाबासाहेबांच्या नंतर आज नेत्यांत नाही.

**आजचे ग्लोबल वास्तव लक्षात घेता. जागतिकीकरणात जातिव्यवस्थेकडं तुम्ही कसे पाहता ?**

जोपर्यंत आपल्या देशात जातिव्यवस्था अस्तित्वात आहे तोपर्यंत आपल्या देशाचा विकासाचा वेग इतर देशांच्या तुलनेत कमीच राहणार आहे. मी सुरुवातीलाच म्हटलं की, आपल्या देशात जातीनं सर्व गोष्टींवर मात केली. जात धर्मावर मात करते, जात राजकारणावर मात करते आणि जात अर्थकारणावरही मात करते.

**जातीने अर्थकारणावर कशी काय मात केली ?**

जपानसारखा छोटा देश आपल्या आगेमागे स्वतंत्र झाला. आधुनिक तंत्रज्ञानात तो कितीतरी पुढं गेला. थायलंड, तैवान, चीन या देशांचेही तसेच आहे. तेव्हा आपल्या देशाचा विकास इतर देशांच्या तुलनेत मागे राहिला याचं कारण आपल्या देशातली जातीव्यवस्था आहे असं मला वाटतं. जात आर्थिक लढ्यावर निश्चितच मात करते कारण आपल्या देशात जात सुप्रीम आहे. कामगारांच्या लढ्यात आर्थिक हक्कांसाठी एकजुटीच्या घोषणा देणारे कामगार गावात, घरात आले, की जात पाळतात. कम्युनिस्टांचे लढे केवळ आर्थिक मागण्यांपुरतेच उभे राहिले. आपल्या देशात दलित, शेतमजूर, मराठा शेतमजूर याचे आर्थिक लढे का उभे राहू शकले नाहीत ? तर याला जात हेच कारण आहे.

**सर्व रोगाचे मूळ भांडवलशाहीत आहे असे मार्क्सनं म्हटले, मग ते कसे?**

हे खरं आहे, की सर्व रोगाचे मूळ भांडवलशाहीत आहे असे मार्क्सने म्हटले होते; पण मार्क्सचा हा सिद्धांत भारताला जसाच्या तसा लागू होत नाही कारण भारतात सर्व रोगाचे मूळ जात आहे. जात भांडवलशाहीवरसुद्धा मात करते हे आपण लक्षात घेतलं पाहिजे. भांडवलशाही सुप्रीम असते असं जे मार्क्सला वाटते तसं आपल्या देशात नाही. आपल्या देशात आजही जातच सुप्रीम आहे. अन्यथा भारतात कम्युनिस्टांचे लढे यशस्वी झाले असते. भारतातले कम्युनिस्ट मार्क्सच्या विचारांनी भारावून गेलेले आहेत. त्यांना अजूनही असं वाटतं, की आपल्या देशातला इतिहास, त्यातील लढे याला कारण भांडवलशाही आहे; पण ते तसं नाही. आपल्या देशात जाती-जातीत, धर्मा-धर्मात लढाया झाल्या, श्रद्धास्थानांवरून लढाया झाल्या. स्त्रियांवरून लढाया झाल्या याला केवळ आर्थिक कारणं आहेत का? तुला सांगतो मिलिंद, तू तमाशाचा अभ्यासक आहे ना! मग कोल्हाटी बाई नाचते, मातंग वाजवतो, महार गातो हे काय आहे ? तर आपल्या देशातल्या लोककला, कला, साहित्य, संगीत या सर्व गोष्टींना जात लागली गेली. तेव्हा जातिव्यवस्थेचं आकलन झाल्याशिवाय आपल्याला आपले सांस्कृतिक संघर्ष कसे समजतील?

**शेवटचा प्रश्न विचारतो, जागतिकीकरणाबद्दल तुमचं नेमके मत काय आहे?**

जागतिकीकरण ही एक आर्थिक प्रक्रिया आहे. तिचा भांडवलाशी संबंध आहे, जातीशी नाही. सामाजिक सुधारणा व्हावी. समता यावी, सामाजिक न्यायाचे प्रश्न सुटावेत यांपैकी कोणतीच गोष्ट जागतिकीकरण करत नाही. त्यामुळे जागतिकीकरणात आपले सामाजिक लढे अधिक विकलांग होतील. सांस्कृतिक साम्राज्यवाद वाढेल आणि आपले संस्कृतिसंघर्ष अधिक प्रखर होतील असं मला वाटतं.

**शेवटी सारांश म्हणून तुम्ही काय म्हणाल ?**

आपण खूप चर्चा केली. शेवटी मी सगळ्याच गोष्टी विरोधात मांडतो असं नाही. मी आशावादी आहे. सगळेच आंबेडकरवादी वाट चुकतात असं नाही. मला हे आवर्जून सांगितलं पाहिजे की, जातिनिर्मूलनाच्या कार्यक्रमात आंबेडकरवादी पुढे आहेत. आंतरजातीय विवाहातही तेच पुढे आहेत. मला असं वाटते, की, जागतिकीकरणाच्या भांडवली विळख्यातून आपली सुटका करणाऱ्यांतही तेच पुढे राहणार आहेत. शेवटी बाबासाहेब आंबेडकर हेच त्यांचे प्रेरणास्थान आहे.

**प्रा. मिलिंद कसबे**
चलभाष : ९३६६९८४६७०

◈◈



सिन्नरमधील विडी- उद्योगाचा इतिहास मांडणाऱ्या आणि विडी-कामगारांच्या व्यथा - वेदनांचे चित्रण करणाऱ्या शंकर बोऱ्हाडे यांच्या विडीची गोष्ट या ग्रंथाचा परिचय करून देणारा लेख.

# उत्तर महाराष्ट्रातील उद्योग जगताचा इतिहासः विडीची गोष्ट

प्रा. डॉ. प्रकाश शेवाळे



पुस्तकाचे नाव : विडीची गोष्ट
लेखक : शंकर बोऱ्हाडे
प्रकाशक : लोकवाङ्मय गृह, मुंबई
प्रथम आवृत्ती : डिसेंबर २०२०
पृष्ठसंख्या: २४० मूल्य : २५०/-

डॉ. शंकर बोऱ्हाडे यांचा 'विडीची गोष्ट' हा विडी उद्योगावरील ग्रंथ लोकवाङ्मय गृहाने नुकताच प्रकाशित केला आहे. एकूण १३ प्रकरणांमध्ये विभागलेला हा ग्रंथ सिन्नर शहराची माहिती देतानाच उद्यमशील विडी कारखानदारांबरोबर विडी उद्योगाचे रंजक चित्रण, विडी कामगारांच्या व्यथा व वेदनांची क्षणचित्रे डोळ्यासमोर उभी करतो. मुळातच विडी कामगाराच्या घरात जन्मलेले या ग्रंथाचे लेखक डॉ. शंकर बोऱ्हाडे यांनी विडी उद्योगाची वाटचाल उघड्या डोळ्यांनी पाहिली आहे. या विडी कामगारांपुढे त्या काळात फार मोठी स्वप्नं अजिबात नव्हती; पण तरी हे लोक अल्पसंतुष्ट नव्हते. भविष्याच्या दृष्टिकोनातून महत्त्वाचे म्हणजे आपल्या पाल्याचे शिक्षण होय याची जाणीव या प्रत्येक विडी कामगाराला होती. विडी उद्योगामुळे आपल्या पाल्याच्या शिक्षणाची चांगली सोय झाली व या विडी कामगारांची पुढची पिढी शिकून चांगल्या आर्थिक स्तरापर्यंत पोहोचली. ग्रंथ लेखकही या गोष्टीला अपवाद नाहीत.

सिन्नर या गावाचे दुष्काळाशी कायमचं नातं जोडलेलं होते. हे दुष्काळाचं नातं परंपरागत टिकवत हे गाव परिस्थितीवर मात करीत होते. इथली माणसं दुष्काळात जगण्यासाठी शर्थीने प्रयत्न करत होती. शेती नापिकीमुळे दयनीय अवस्था झाली होती. शेती जिरायती असल्याने फक्त पावसावर अवलंबून राहावे लागत होते. अशा








राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



काळात घरात बसून सावलीत करावयाचा उद्योग म्हणजे विडी वळणे हा एकमेव उद्योग होय. साधारणपणे सव्वाशे वर्ष सिन्नर तालुक्यामध्ये चालत आलेल्या या उद्योगाची पाळेमुळे शोधताना हा उद्योग मुळात सुरू कुठून झाला याचा शोध संशोधन वृत्तीचे लेखक डॉ. बोऱ्हाडे यांनी घेतला आहे. या विडी उद्योगाने सिन्नरचा नावलौकिक सर्व दूर नेला. विसाव्या शतकाच्या उत्तरार्धामध्ये विडी उद्योग का घसरणीला लागला याची कारणमीमांसा करताना डॉ. बोऱ्हाडे यांनी वास्तवाची माहिती दिली आहे. सिन्नरला सुरू झालेली नवीन औद्योगिक वसाहत, इथल्या कामगाराला मिळालेला रोजगार, तंबाखूवर शासन स्तरावरून वेगवेगळे निर्बंध वाढत गेले, चंगळवाद वाढला १९९० नंतर आलेले जागतिकीकरण, उदारीकरण व मुक्त आर्थिक धोरण व त्याचा परिणाम विडी उद्योगाला पण भोगावा लागला. चंगळवादामुळे जनसमूहाच्या ओठातली विडी जाऊन तिची जागा अन्य पर्यायांनी घेतली. त्यामुळे विडी व्यवसाय हळूहळू कमी होत गेला.

सिन्नरचे नाव या विडीने सर्वदूर नेले. सिन्नरची विडी ही अतिशय प्रसिद्ध होती. सिन्नरमध्ये अतिशय महत्त्वाचे उद्योजक होते की, ज्यांनी हाताच्या बोटावर मोजता येतील एवढ्या कामगारांवर हा उद्योग सुरू केला आणि कालांतराने आपला उद्योग भारतात नव्हे तर जगात नेऊन पोहोचवला. विडीच्या माध्यमातून असंख्य विडी कामगारांना रोजगार पुरवला. या सर्व उद्योजकांची उद्योग वाढीची भरारी, त्यांचे आपल्या व्यवसायाप्रति असणारी निष्ठा, शहराच्या विकासात लागणारा हातभार या सर्व बाबींची संशोधनात्मक माहिती डॉ. शंकर बोऱ्हाडे यांनी आपल्या या 'विडीची गोष्ट' या ग्रंथातून दिली आहे.

या ग्रंथातील उद्यमशील विडी कारखानदार या मथळ्याखालील एका प्रकरणात बाळाजी गणपत वाजे यांची शिवाजी शिलेदार विडी, भिकुसा यमासा क्षत्रिय यांची भिकुसा विडी, बस्तीराम सारडा यांची उंट विडी, मिस्टर विडी, शंकर चोथवे याची गायछाप विडी, रामनाथ शेठ चांडक यांची कोंबडा विडी, चंपालाल चोरडिया यांची संभाजी विडी अशा या सर्व महत्त्वाच्या विडी उद्योगांनी व या उद्योजकांनी कशा पद्धतीने आपला विडीचा उद्योग व व्यवसाय वाढवला याची परिपूर्ण माहिती या ग्रंथात दिली आहे. काळाची पावले ओळखत दुष्काळी भागात लोकांना चागला उद्योग उपलब्ध करून देत उद्योग व्यवसाय तर या उद्योजकांनी वाढवलाच; पण त्याबरोबर ज्या लोकांच्या हातांना काम नव्हते त्यांना जागेवर व सावलीतले काम उपलब्ध करून दिले. कारखानदारी वाढली आणि ग्रामीण भागातील लोकांना मोठ्या प्रमाणामध्ये रोजगार मिळाला.

सिन्नर शहर पूर्वी नाशिक शहरापेक्षा मोठे होते. नाशिक शहराच्या आधी सिन्नरला नगरपालिका झाली होती. या सिन्नर शहराची रचना ही कौटिल्याच्या अर्थशास्त्रातील रचनेप्रमाणे होती. या साऱ्या सिन्नरचे वर्णन करताना सिन्नर शहराचे वैभव असणाऱ्या गोष्टींचे संशोधनात्मक वर्णन लेखकाने या ग्रंथात केले आहे. शहरातील गल्ल्या, गाव, बुरुज, प्राचीन मंदिरांचे वैभव, सिन्नर शहरांमध्ये असणाऱ्या परंपरा, यात्रा, नाटक मंडळी व इतर कार्यक्रमांचं वर्णन यांचा आढावा अतिशय संतुलितपणे घेतला गेलेला आहे. तसेच या शहरात सण व उत्सव कशा पद्धतीने साजरे होत असत याचे उदाहरणादाखल नमुने लेखकांनी दिले आहेत. सिन्नर शहराला असणारा आजचा ऐतिहासिक, सांस्कृतिक, धार्मिक व राजकीय वारसा तसेच त्याची चालत आलेली परंपरा या ग्रंथामुळे आपणास समजते.

पंधराशे वर्षापूर्वीचे सिन्नर व आजच्या एकविसाव्या शतकातील सिन्नर तसेच या शहरात झालेला बदल कसा होत गेला असेल या सर्व गोष्टीचा सरकमंच वाचकाच्या डोळ्यासमोरून तरळून जातो. डॉ. बोऱ्हाडे यांनी हा ग्रंथ लिहिताना अनेक संदर्भ ग्रंथांची यादी या ग्रंथातील लेखांमध्ये दिली आहे. सिन्नर शहराची वास्तव ओळख करून देत असतानाच शहराची सांस्कृतिक परंपरासुद्धा वर्णिलेली आहे. सिन्नर तालुक्यात व शहरात असणारी शाहिरी परंपरा, लोकसंस्कृतीचे उपासक व इतर गोष्टींचा आढावा सिन्नर शहरांमध्ये आजपर्यंत जे राजकारणी होऊन गेले या सर्व राजकीय व्यक्ती व सिन्नरची विडी यांचा काय संबंध आहे, येथील बदलती राजकीय परिस्थिती, राजकारण व उद्योग व्यवसाय, सिन्नरच्या विकासात या सर्व गोष्टींचे योगदान काय याचाही विचार या ग्रंथात येतो.

सिन्नर परिसरातील शेतकरी व कष्टकरी वर्ग दुष्काळामुळे जेरीस आला होता. बारा बलुतेदार, आलुतेदार, आदिवासी, कामगार हे सर्व कमी कौशल्याची व श्रमाचे काम शोधत होते, त्यामुळे बरेच जण या व्यवसायामध्ये आले. त्यात स्त्रियांचे प्रमाण अधिक होते.

**सिन्नरचे नाव या विडीने सर्वदूर नेले. सिन्नरची विडी ही अतिशय प्रसिद्ध होती. सिन्नरमध्ये अतिशय महत्त्वाचे उद्योजक होते की, ज्यांनी हाताच्या बोटावर मोजता येतील एवढ्या कामगारांवर हा उद्योग सुरू केला आणि कालांतराने आपला उद्योग भारतात नव्हे तर जगात नेऊन पोहोचवला. विडीच्या माध्यमातून असंख्य विडी कामगारांना रोजगार पुरवला. या सर्व उद्योजकांची उद्योगवाढीची भरारी, त्यांचे आपल्या व्यवसायाप्रति असणारी निष्ठा, शहराच्या विकासात लागणारा हातभार या सर्व बाबींची संशोधनात्मक माहिती डॉ. शंकर बोऱ्हाडे यांनी आपल्या या 'विडीची गोष्ट' या ग्रंथातून दिली आहे.**

महात्मा गांधीजी यांच्या स्वदेशीच्या धोरणामुळे भारतीय विडी उद्योगाला फायदा झाला, असा निष्कर्ष लेखक बोऱ्हाडे यांनी महात्मा गांधी व विडीउद्योग या प्रकरणात काढला आहे. व्यसनांच्या विरोधात असणारे महात्मा गांधी यांनी केवळ स्वदेशीच्या मुद्द्यावर इतर तंबाखू उत्पादनापेक्षा विडीला आश्रय मिळाला व विडी उद्योगाला फायदा झाला; परंतु विडीचे उत्पादन वाढल्यामुळे विडी उद्योगातून रोजगार निर्माण झाला. कारखाने निघाले व विडी उद्योगाचा विस्तार होत गेला. हैदराबादचा वजीर सुलतान यांनी या संधीचा फायदा घेऊन १९१६ साली तंबाखू उद्योग सुरू केला. त्याचा मुलगा मोहम्मद सुलतान यांनी चारमिनार विडी सुरू केली. त्याचबरोबर टॉटल, चार्म व एडिशन असे ब्रँड सुरू झालेले आपल्याला दिसतात. एकूणच जगातला सर्वात श्रीमंत समजला जाणारा हैदराबादचा निजामसुद्धा विडी ओढत होता. त्याचे प्रोत्साहन मिळाल्यानेच तेलंगण, मराठवाड्यात चारमिनार विडी प्रसिद्ध झाली. पुढे उंट व कोंबडा या छापाच्या विड्या मराठवाड्यात पोहोचल्या. जालना येथे विडी कारखाने सुरू झाले. एकूणच विडी सिन्नरमधून मराठवाड्यापर्यंतच नव्हे तर पूर्ण भारतात आणि जगामध्ये कशी पोहोचली याचा इतिहास या ग्रंथांमध्ये आपल्याला वाचायला मिळतो महात्मा गांधीजींनी आश्रमात मजुरांना किमान वेतन काय असावे याचा त्या ठिकाणी विचार केलेला आपल्याला दिसतो. विडीपासून मिळणाऱ्या विरंगुळ्याचे महत्त्व महात्मा गांधीजींना पटले होते याची एक आठवण एकदा देवकिसन सारडा यांनी सांगितल्याचे नमूद केले आहे.

या ग्रंथात उद्यमशील विडी कारखानदारांबद्दल लिहिताना लेखक बोऱ्हाडे यांनी विडी कारखानदारांचा एक मोठा पट मांडला आहे. सिन्नरचे पहिले विडी कारखानदार बाळाजी गणपत वाजे यांची माहिती दिली आहे. सिन्नरमध्ये विडी उद्योग कसा आला याचा शोध घेत लेखक सिन्नरच्या विडी उद्योगाच्या पायाभरणीचे काम करणारे संस्थापक उद्योजक बाळाजी गणपत वाजे यांच्यापर्यंत येऊन पोहचले. वाजे हे कृषी संस्कृतीचे प्रतिनिधी होते. शेतीवाडी असली तरी दुष्काळ पाचवीला पुजलेला होता. पावसाळ्यात पीक घेतले, तर पुढच्या हंगामात उत्पन्न मिळेल याची शाश्वती नाही. शेतकऱ्यांना पशुधन सांभाळण्यासाठी जनावरे घेऊन कोकणात जावे लागत असे. सिन्नरला पाऊस होत नसला तरी जवळच्या घोटी, इगतपुरीच्या पुढे चिक्कार पाऊस होता. साहजिकच ही सगळी मंडळी जनावरे घेऊन कोकणात म्हणजे पडघा, भिवंडीपर्यंत जात असत. तिकडे काही काळ जनावरे सांभाळून मृगाची चाहूल लागण्यापूर्वी शेतीची मशागत करण्यासाठी हे सर्व परतत होते. बाळाजी गणपत वाजे यांना भिवंडी परिसरात जनावरे चारत असताना विडीचा शोध लागला. अतिशय कमी कौशल्यात आणि श्रमात तयार होणाऱ्या विडीचे काम ते एका गृहिणीकडून शिकले. सिन्नरला त्या गृहिणीला आणून त्यांनी अन्य स्त्रियांना प्रशिक्षण दिले. कौशल्य विकासाचे बाळाजी गणपत वाजे हे प्रथम प्रणेते ठरले. डॉ. बोऱ्हाडे यांनी या ग्रंथामध्ये अतिशय सविस्तरपणे विडी उद्योगाची मुहूर्तमेढ रोवणाऱ्या बाळाजी गणपत वाजे यांची माहिती दिली आहे. या ग्रंथामुळे सिन्नरच्या विडी उद्योगाचे प्रणेते वाचकांपर्यंत पोहचतात.

कालांतराने सिन्नरला सुरू झालेला हा विडी उद्योग पाहून अनेक जण या उद्योगाकडे वळले. छोटे कारखानदार वाजे यांच्याकडे तयार झाले. हळूहळू या उद्योगांमध्ये स्पर्धा सुरू झाली. प्रत्येक व्यवसायात जशी नक्कल होते तशी नक्कल विडी उद्योगात आली त्याची अनेक उदाहरणे या ग्रंथात आढळतात. या उद्योगात पैसा येऊ लागला तसा हा

उद्योग वाढत गेला. नावलौकिक वाढला. सिन्नरला स्वातंत्र्यपूर्व काळात भिकुसा यमासा क्षत्रिय यांच्या निमंत्रणावरून डॉ. राजेंद्र प्रसाद येऊन गेले होते. त्यांनी पाठविलेले आभार पत्र फ्रेम करून त्यांच्या ऑफिसमध्ये लावलेले होते. एकूणच उद्योग व्यवसायामुळे राजकीय क्षेत्रातही कसा वावर वाढत जातो याची माहितीही लेखक बोऱ्हाडे यांनी या ग्रंथात दिली आहे.

त्या काळातसुद्धा विडीची जाहिरात केली जात होती. याचे कारण म्हणजे या उद्योगात वाढलेली स्पर्धा होय; पण आजच्यासारखी सामाजमाध्यमे त्या काळात नव्हती. या उद्योगाची जाहिरात आठवडी बाजार, यात्रा व सणासुदीचे दिवस कशा प्रकारे केली जात होती याची माहिती या ग्रंथामध्ये आपणास मिळते. या काळात विडीचे नमुने ग्राहकांना दिले जात असत. अगदी जत्रेत विड्या उधळल्या जात असत. भिकुसा विडीचा व्यवसाय बेळगावपर्यंत विस्तारला होता. भिकुसा विडीची जाहिरात करणाऱ्या गाड्या गावोगाव फिरत असत. या गाड्यांवर स्वरबद्ध केलेली गाणी वाजवली जात असत. ही रेकॉर्ड कोलंबिया कंपनीने काढलेली होती. सदर ग्रंथात लेखकांनी काव्यात्मक जाहिरातीचे नमुनेसुद्धा वानगीदाखल दिले आहेत. उदा. कारखाना विडीचा शानदार/ पोट भरती कित्येक कामगार/ आहे मालक मोठा दिलदार/ त्याची ख्याती हिंदुस्थानपार नंबर चोवीस पिवळ्या दोऱ्याची/विडी ओढा तुम्ही सिन्नरची/ अशी स्वरबद्ध जाहिरात केली जात असे. या सर्व कारखानदारांपैकी काही कारखानदारांना मोठ्या मोठ्या ठिकाणी सन्मानही मिळत असे. संत गाडगेबाबांच्या गो. नी. दांडेकर यांनी लिहिलेल्या चरित्रात नाशिकच्या धर्म शाळेसाठी भिकुसा यमासा क्षत्रिय यांना विश्वस्त नेमल्याचे वर्णन केलेले आहे. गाडगेबाबा धर्मशाळेबाहेर बाबांच्यासोबत क्षत्रिय बंधूंचा फोटोसुद्धा लेखकांनी उपलब्ध करून दिला आहे. एकूणच विडी कारखानदारांचा राबता समाजसुधारकांपासून तर राजकीय, धार्मिक व शैक्षणिक अशा सर्व व्यक्तींबरोबर होता हे सिद्ध होते. नाशिक शहरात गोखले एज्युकेशन सोसायटीचे शाळा व महाविद्यालय सुरू झाले. या महाविद्यालयाला मोठी देणगी विडी कारखानदार जगन्नाथ भिकुसा क्षत्रिय यांनी दिली. येथील शाळा व महाविद्यालयांची इंग्रजी आद्याक्षरे या विडी उद्योजक यांनी दिलेल्या देणगींमुळेच आहेत.

उद्यमशील विडी कारखानदार या प्रकरणात विडी कारखानदारांची ओळख करून देण्याचे काम लेखकाने केले आहे. बाळाजी गणपत वाजे, भिकुसा यमासा क्षत्रिय, रामभाऊ माधवराव निंबाळकर, बस्तीराम नारायणदास सारडा, शंकर भिकाजी चोथवे, रामनाथशेठ चांडक, जगुभाऊ चांडक, लालाशेठ चांडक व चंपालाल चोरडिया अशा अतिशय महत्त्वाच्या सिन्नरमधील उद्योजकांच्या उद्योगवाढीच्या यशस्वी गोष्टी वाचकांपर्यंत पोहोचवल्या आहेत. उद्योगासाठी नुसता पैसा महत्त्वाचा नाही तर प्रचंड इच्छाशक्ती, कामगारांशी असलेले सौहार्दपूर्ण संबंध अशा एक न अनेक गोष्टी मांडताना लेखकांनी कारखानदारीत यशस्वी होण्याची गुरुकिल्ली येथे दिली आहे. बस्तीराम नारायणदास सारडा यांनी तीन कामगारांना बरोबर घेऊन विडी व्यवसायाला सुरुवात केली. अवघे २९ रुपये भांडवल असताना ही सुरुवात झाली. सारडा यांच्या उंट विडीचे नंतरच्या काळात महाराष्ट्रामध्ये नाव झाले. अवघ्या ३ कामगारांवर सुरू झालेला उद्योग- व्यवसाय १९६३ साली जेव्हा बस्तीराम सारडा यांचे निधन झाले तेव्हा १५००० कामगारांपर्यंत पोहोचला होता. अतिशय प्रतिकूल परिस्थितीमध्ये या उद्योजकांनी त्या काळामध्ये अतिशय मोठं काम उभे केले होते. महाराष्ट्रामध्ये सिन्नरचे नाव पोहोचवण्याचं सामर्थ्य या सर्व उद्योजकांचे आहे याची जाणीव या ग्रंथातून आपणास होते.

विडी उद्योगाचा आढावा घेतानाच डॉ. बोऱ्हाडे यांनी या उद्योगांमधील अतिशय महत्त्वाचा घटक कामगार यावर अतिशय विस्तृतपणे माहिती दिली आहे. विडी कारखाने सुरु झाल्यावर हळूहळू असंघटित कामगार संघटित होत गेला. या संघटीकरणासाठी तत्कालीन कामगार नेत्यांनी कसे प्रयत्न केले हे उदाहरणादाखल स्पष्ट केले आहे. सुरुवातीला विडी कामगार नेत्यांमध्ये शंकर सिताराम देशमुख यांचे नाव अग्रभागी होते. देशमुख यांनी कामगारांच्या विविध प्रश्नांसाठी आंदोलने केली व पुढाकार घेतला. देशमुख हे मूळचे सिन्नरचे असल्याने सर्वांशी त्यांचा चांगला संवाद आणि दोस्ताना होता. त्याचा उपयोग प्रेमाने कामगारांचे प्रश्न सोडविण्यासाठी त्यांनी करून घेतला. देव किसन सारडा यांचे घनिष्ठ मित्र असलेले देशमुख काँग्रेस विचारधारेचे कामगार पुढारी होते. काँग्रेसच्या नेत्यांमध्ये त्यांची चांगली उठबस होती. महाराष्ट्राचे शिल्पकार यशवंतराव चव्हाण हे सिन्नर येथे

आले, तर आठवणीने देशमुख यांच्याकडे जात असत. सिन्नर तालुका विडी कामगार संघाचे अध्यक्ष दुर्वेदादा हे होते. त्या काळातील सर्व कामगार नेत्यांनी कामगारांना न्याय मिळवून देण्याचं काम केले आहे. या ग्रंथातून त्या काळात कामगार नेते कसे कामगारांचे भले चिंतीत असत याची यथायोग्य माहिती मिळते.

१९७०च्या दशकात कामगारांचा मोर्चा तहसील कचेरीवर व पोलीस स्टेशनला नेणे, पोलिसांचा लाठीहल्ला होत असे त्यात अनेक कामगार जखमी होत असत. अशा या काळामध्ये कामगारांना न्याय मिळावा यासाठी हे सर्व कामगार नेते प्रयत्न करत होते. कामगार नेत्यांमध्ये कॉम्रेड राजाभाऊ नागरे, कॉम्रेड गोपीनाथ म्हसाळ, काशिनाथ गोळेसर, निवृत्ती आंबेकर, इंदुबाई जाधव, पांडुरंग तिकोणे, नारायण अडणे, दुर्वेदादा, नाना दुर्वे, साथी येनगन्दुल, कॉ. राजू देसले या कामगार नेत्यानी काय योगदान दिले, त्याची माहिती या ग्रंथामध्ये बघायला मिळते. सिन्नर शहरातील उद्योगामध्ये कामगार चळवळीचे स्थान काय राहिलेले आहे, विडी कामगारांना संघटनेची गरज का वाटत गेली आणि तालुकास्तरापासून ते जिल्हास्तरापर्यंत व तेथून राज्यस्तरापर्यंत कामगार चळवळ व कामगार नेते यांची बांधणी कशी झाली, याचा परिचय लेखकाने करून दिलेला आहे. दत्ता देशमुख यांच्या नेतृत्वाची जडण-घडण झाल्यानंतर त्यांनी कामगारांचा लढा मोठ्या प्रमाणामध्ये पुढे नेला. सक्तीच्या लेव्हीविषयी म्हणजेच लेव्हीविरोधी आंदोलन चालू केले या आंदोलनात विडी कामगारांना सहभागी करून घेण्यात आले. पोलिसांनी केलेले अत्याचार व गोळीबार मोर्चातील नेत्यांवर भरलेले खटले तसेच येरवडा तुरुंगात नेत्यांना स्थानबद्ध कसे केले अशा अनेक गोष्टींची माहिती या ग्रंथातून मिळत जाते. एकूणच वृत्तपत्र, मुलाखती व इतर ग्रंथ यांचा आधार घेत ग्रंथ लेखकांनी ही माहिती उपलब्ध करून देण्याचा प्रयत्न केला आहे. गुलाबराव देशमुख यांनी कामगारांची चळवळ कशी चालवली, कामगार चळवळीला कसे नवे वळण लागले? कॉ. राजू देसले रस्त्यावरच्या लढाईतला माणूस या लेखात कामगारांच्या जीवनामध्ये नवीन सूर्य उगवावा याच्यासाठी कॉ. राजू देसले यांनी केलेल्या कामाची माहिती दिली आहे.

विडी कामगारांनी पेन्शन योजनेसाठी दिलेला लढा कामगारांना मिळालेली पेन्शन, २०१२ साली कामगार संघटनेने काढलेला मोर्चा, त्या मोर्चात स्त्रियांचे प्रमाण या सगळ्या गोष्टींची उदाहरणे देत पेन्शन योजनेतील दाहक वास्तव लेखकाने स्पष्ट केले आहे. अगदी ५०० ते १००० रुपयेपर्यंत पेन्शन यावेळी उत्पादक कामगारांना, विडी कामगारांना मिळायला लागली. त्याचा तक्ता लेखकांनी पेन्शन योजनेतील दाहक वास्तव या प्रकरणात दिला आहे. महागाईने कळस गाठला असताना पाचशे, तर एक हजार रुपयापर्यंत निवृत्तीवेतन शासन देते. त्याच्यात काही भागत नाही आणि महागाई असल्यामुळे नऊ हजारापर्यंत पेन्शन मिळावे ही कामगारांची मागणी योग्य असल्याचे तेथे लेखकाने म्हटले आहे.

एकूणच विडी उद्योगाची सुरुवात विसाव्या शतकाच्या सूर्योदयाबरोबर झाली. दुष्काळामुळे सिन्नर शहरांमध्ये विडी उद्योग सुरू झाला, तो बहरला, मोठ्या प्रमाणात वाढला. सुरुवातीला गुजरातमधून मुंबईत आला मुंबईतून भिवंडीमार्गे सिन्नरला आला. विडीसाठी लागणारी पाने विदर्भात पिकत होती. तंबाखूची शेती निपाणी या कर्नाटक प्रांतात होती. त्यामुळे आंध्रप्रदेश, तेलंगणा, मध्यप्रात व विदर्भात विडी व्यवसाय असावा; पण तो सिन्नरला कसा फोफावत गेला याचे प्रचंड कुतूहल लेखक विडी कामगाराच्या घरात जन्मल्यामुळे होते. त्यामुळे या अतिशय वास्तवाचा शोध या ग्रंथामध्ये दिसतो. विडी सिन्नरवरून २२ किलोमीटर असणाऱ्या नाशिकरोड रेल्वे स्टेशनवर पोहोचवली जात होती. त्यातून खानदेशात वेगवेगळ्या ठिकाणी एजंट नेमून माल दुकानदारांना या पानाच्या ठेल्यावर पोहचवला जात होता. स्वातंत्र्यपूर्व काळामध्ये विडीला मागणी असल्यामुळे धुळे, जळगाव व इतर जिल्ह्यातील व्यापारी सिन्नरला येऊनही बिडीची मागणी करत होते आणि त्याच्यामुळेच विडी उत्पादन वाढत गेले. मागणी तसा पुरवठा होत गेला. जशी मागणी वाढत गेली तशी स्पर्धा वाढत गेली आणि कारखानदार वाढत गेले. या सगळ्या गोष्टींचा अतिशय योग्य पद्धतीने आढावा या ग्रंथामध्ये लेखकाने घेतलेला आपल्याला दिसतो.

जागतिकीकरणाच्या काळामध्ये व्यापार वृद्धीसाठी नवनवीन क्लृप्त्या वापरल्या गेल्या. काही कारखानदारांनी कच्चा माल देऊन पक्का माल तयार करण्याचे तंत्र वापरले; पण तरीही नंतरच्या काळात विडी उद्योगाचा उतरणीचा



अनुक्रमणिका

**१९७०च्या दशकात कामगारांचा मोर्चा तहसील कचेरीवर व पोलीस स्टेशनला नेणे, पोलिसांचा लाठीहल्ला होत असे त्यात अनेक कामगार जखमी होत असत. अशा या काळामध्ये कामगारांना न्याय मिळावा यासाठी हे सर्व कामगार नेते प्रयत्न करत होते. कामगार नेत्यांमध्ये कॉम्रेड राजाभाऊ नागरे, कॉम्रेड गोपीनाथ म्हसाळ, काशिनाथ गोळेसर, निवृत्ती आंबेकर, इंदुबाई जाधव, पांडुरंग तिकोणे, नारायण अडणे, दुर्वेदादा, नाना दुर्वे, साथी येनगन्दुल, कॉ. राजू देसले या कामगार नेत्यांनी काय योगदान दिले, त्याची माहिती या ग्रंथामध्ये बघायला मिळते.**

काळ सुरू झाला याची कारणमीमांसासुद्धा या ग्रंथात येते. शासनाचे धोरण बदलले व अनेक बंधने आली, त्यामुळे अनेक कारखानदार या उद्योगातून बाहेर पडले. विडी हे धूम्रपानाचे व गरिबाला परवडणारे साधन आहे. मात्र तंबाखूसेवन कर्करोगाला पोषक असल्याच्या मोठमोठ्या जाहिराती लागल्या. विडी बंडलवरही चेतावणीचा मजकूर छापावा लागत होता त्याच्यामुळे विडीचा ग्राहक कमी कमी होत गेला. विडीला या काळात अनेक पर्याय आले आणि या सर्व पर्यायांबरोबर विडीला स्पर्धा करावी लागली. जागतिकीकरणामुळे लोकांच्या खिशात पैसा आल्याने महाग असूनही सिगारेट, गुटखा वा तत्सम पर्यायाकडे लोक आकर्षित झालेले दिसतात. त्याच्यामुळेच विडी उद्योगाला ओहोटी लागलेली आपल्याला दिसते. बदल हा मानवी जीवनाचा स्थायिभाव आहे. समाजात मोठ्या प्रमाणात बदल होताना दिसतो. शिक्षण हे समाज परिवर्तनाचे साधन आहे. शिक्षण प्रसार झाल्याने विडीची जागा नवनवीन उद्योगांनी घेतली. औद्योगिक वसाहतीमध्ये नवीन उद्योग आले. लोकांना रोजगार मिळाले. धरण आणि पाटाच्या पाण्यामुळे या भागातील शेतीही व्यवस्थित पिकू लागली. शेतकरी कुटुंबातील कामगार पुन्हा शेतीकडे वळले. एकूणच या उद्योगाला उतरणीचा काळ आला याची योग्य अशी कारणमीमांसा डॉ. बोऱ्हाडे यांनी केली आहे.

सिन्नर गावाभोवती फिरणारा हा विडी उद्योग पूर्ण जगात आपल्या विडीची ओळख करून देतो. येथील कामगार, कामगार नेते, कारखानदार, सिन्नर शहराची परिपूर्ण ओळख येथील विडी उद्योगाने केली. येथील विडी उद्योग अनेक लोकांचे जीवन फुलवून गेला व सिन्नर गावाला एक महत्त्वाचं स्थान देऊन गेला. विडी उद्योगाने सिन्नरचे रूप पालटले. सांस्कृतिक, सामाजिक, राजकीय आणि शैक्षणिक क्षेत्रामध्ये हा विडी उद्योग सिन्नर शहरामध्ये अतिशय महत्त्वाचा भाग म्हणून मानला जातो हे लक्षात घेणे गरजेचे आहे, हे या डॉ. बोऱ्हाडे यांच्या ग्रंथावरून सिद्ध होते. आठवणी, जुने ग्रंथ, मुलाखती, वृत्तपत्र, नियतकालिके अशा बहुविध साधनांचा वापर करून लेखक बोऱ्हाडे यांनी हा ग्रंथ सिद्ध केला आहे. मुळात हा ग्रंथ म्हणजे दोन शतकांचा एक संदर्भग्रंथ आहे; पण एक महत्त्वाचा उद्योग कसा बहरला, त्या उद्योगाला बहरण्यासाठी कच्चा माल, कामगार, राजाश्रय, बाजारपेठ व जाहिरात अशा विविध गोष्टींतील वास्तवाची जाणीव येथे महत्त्वाची आहे. उद्योग वाढवताना उद्योजकांना किती गांभीर्य व सौहार्द लागते या सर्व गोष्टी लेखक डॉ. शंकर बोऱ्हाडे यांनी विडीची गोष्ट या ग्रंथात संशोधनात्मक मांडल्या आहेत. हा ग्रंथ एक अतिशय महत्त्वाचा दस्तऐवज आहे.

**डॉ. प्रकाश शेवाळे**
महात्मा गांधी विद्यामंदिर संचलित
म. स. गा. महाविद्यालय, मालेगाव, जि. नाशिक
चलभाष : ८९७५५५५८१५
prof.prakashshewale@gmail.com

◈ ◈



भारतरत्न डॉ. बाबासाहेब आंबेडकरांच्या 'मूकनायक' या पाक्षिकाला शंभर वर्षे पूर्ण होत आहेत. मूकनायकमधील डॉ. बाबासाहेब आंबेडकरांच्या विचारांचा आढावा घेणारा लेख.

# लोकजागृतीची चळवळ आणि मूकनायक

प्रा. डॉ. हरेश शेळके

डॉ. आंबेडकरांनी मूकनायक हे पाक्षिक ३१ जानेवारी १९२० रोजी सुरू केले. त्याला बरोबर आता शंभर वर्षं पूर्ण होत आहेत त्या निमित्ताने...

महाराष्ट्राला खूप मोठी उज्वल अशी वैचारिक परंपरा लाभलेली आहे. त्यातूनच महाराष्ट्राची उत्तम अशी जडणघडण झालेली आहे, म्हणूनच महाराष्ट्राची इतर राज्यांच्या पातळीवर नव्हे तर देशाच्या पातळीवर एक वेगळी ओळख आहे. ही महाराष्ट्राची ओळख बनविण्यात अनेक दिग्गजांनी, रथी - महारथींनी प्रचंड मोठे योगदान दिलेले आहे. याच सर्व उंबरठ्यावर मागे वळून पाहिले, की लक्षात येते, जानेवारी १९२०मध्ये डॉ. बाबासाहेब आंबेडकरांनी 'मूकनायक' हे पाक्षिक सुरू केले होते. त्याला आता बरोबर शंभर वर्षं पूर्ण होत आहेत. या मूकनायकाच्या शताब्दी वर्षानिमित्त पुन्हा एकदा वाटले मूकनायकचे पुनरावलोकन करूयात.. प्रत्येक कालखंडाचे मूल्यमापन आपण जेव्हा करतो तेव्हा त्या कालखंडात घडलेल्या महत्त्वाच्या घटनांचे, संदर्भांचे, विश्लेषण हे परिवर्तनाच्या प्रत्येक टप्प्यावर व्हायला पाहिजे असे वाटते.

मूकनायक आणि बहिष्कृत भारत याविषयी खूप विचारमंथन यापूर्वी अनेक अभ्यासकांनी केलेले आहे. तरीही या लेखात मूकनायकमध्ये त्या काळात कोणकोणत्या बातम्या विशेष करून छापल्या जात होत्या, अस्पृश्य समाजाचे कोणते प्रश्न त्या वेळी मांडले जात होते, त्या काळातील महत्त्वाचे नेमके प्रश्न कोणते होते, सामाजिक प्रश्नांची तीव्रता कशी होती, मूकनायक या सर्व पार्श्वभूमीवर कशा पद्धतीने समाजाचे वैचारिक भरण-पोषण करत होते हे येथे आपण जाणून घेणार आहोत. वृत्तपत्रं ही फक्त विचार देण्याचे काम करत नाहीत, तर समाजाला दिशा दाखवून समाजनिर्मितीचे महत्त्वाचे कार्य करत असतात. सुधारकाचा हेतू स्पष्ट करताना गोपाळ गणेश आगरकरांनी शंभर वर्षांपूर्वी जे लिहून ठेवले तेच आजही पत्रकारितेत लागू आहे. ते म्हणतात, 'स्वभूमीत, स्वलोकात, स्वधर्मात राहून अविचारी व अज्ञान देशबांधवांच्या निंदेस किंवा छळास न भिता त्यांच्याशी कधी भांडून, कधी युक्तिवाद करून, कधी लाडीगोडी लावून अथवा सामर्थ्य असल्यास कधी त्यांना दटावून त्यांची सुधारणा करणे यातच खरी देशप्रीती, खरी बंधुता खरा देशाभिमान, खरे शहाणपण व खरा पुरुषार्थ आहे.' समाज सुधारकाचे हे ब्रीद बाबासाहेब आंबेडकरांनीदेखील स्वीकारलेले होते. त्याकरिता वृत्तपत्र हे एक अमोघ अस्त्र आहे याची त्यांना जाणीव होती.

वरील आगरकरांच्या विश्लेषणावरून लक्षात येते की, पत्रकारिता म्हणजे केवळ विचार मांडणे, भूमिका स्पष्ट



अनुक्रमणिका

करणे, एवढेच नसून नव्या समाजनिर्मितीसाठी विचारांची पायाभरणी करण्याचे ते महत्त्वपूर्ण शस्त्र आहे. डॉ.आंबेडकरांची भूमिकाही याच धारणेची होती. म्हणूनच त्यांनी सुरुवातीला अस्पृश्य समाजामध्ये जाणीव जागृती घडवून आणण्यासाठीच नव्हे तर संपूर्ण हिंदू समाजातील जनतेला माणसाकडे आपण माणूस म्हणून कसे पाहिले पाहिजे, आपल्या पाहण्याला मानवतावादी दृष्टिकोनाचे अंग कसे असायला हवे यासाठी मूकनायक सुरू केले. ज्या वेळी बाबासाहेबांनी मूकनायक सुरू केले तेव्हा दलित समाजात साक्षरतेचे प्रमाण हजारी नऊदेखील नव्हते. त्या वेळी हे वृत्तपत्र काढले होते हे महत्त्वाचे आहे. यावरून असे लक्षात येते, की बाबासाहेबांनी मूकनायक सुरू करण्याचा विचार किती दूरदृष्टी ठेवून केलेला होता. मूलतः जेथे माणसाला माणसासारखे जगता येईल, जेथे स्वातंत्र्याला वाव राहील, समानतेला, समान संधींना जिथे विशेष महत्त्व राहील, उच्च-नीच भेदभाव राहणार नाही अशा विश्वात्मक समाजाचे स्वप्न डॉ.आंबेडकर पाहत होते, म्हणूनच त्यांच्या विचारांच्या केंद्रवर्ती कायम मानवता हे मूल्य दिसून येते.

बाबासाहेबांनी मूकनायक या वृत्तपत्राच्या पहिल्याच अंकात मूकनायक सुरू करण्याची भूमिका स्पष्ट करताना म्हटले होते की, 'आमच्या बहिष्कृत लोकांवर होत असलेल्या व पुढे होणाऱ्या अन्यायावर उपाययोजना सुचविण्यास तसेच त्यांची भावी उन्नती व तिचे मार्ग यांच्या खऱ्या स्वरूपाची चर्चा करण्यास वर्तमानपत्रासारखी अन्य भूमीच नाही म्हणून व स्वजनोद्धाराचे महत्कार्य करणारास योग्य पंथ दाखविण्यासाठी आपण मूकनायक पत्र सुरू करीत आहोत.' डॉ.आंबेडकरांच्या भूमिकेनुसार स्पष्टपणे जाणवते की, त्यांना तत्कालीन समाजात फक्त लोकजागृती घडवून आणणे एवढेच महत्त्वाचे ध्येय वाटत नव्हते, तर संपूर्ण हिंदू समाजात नव्या विचारांचे मंथन घडून यावे, समाजाचे मानसिक, शारीरिक भरण-पोषण व्हावे असे त्यांना वारंवार वाटत होते, म्हणूनच डॉ. आंबेडकरांची विचारांची पेरणी करण्याच्या बाबतीतील तळमळ आपल्याला त्यांच्या प्रत्येक कृतीतून दिसून येते. त्यांच्या विचारांत सातत्याने आपल्याला तर्कशुद्ध खंडन, युक्तिवाद, डौलदार व आवेशपूर्ण भाषा, समर्पक सुभाषिते अशा प्रकारे विचारमंथन प्रकट झालेले दिसते. डॉ.आंबेडकरांच्या चळवळीचे यथार्थ मूल्यमापन द्रष्टे विचारवंत करतील आणि काळ करील. सर्वसामान्य वाचकाने प्रथम त्यांचे विचार आज तटस्थ आणि विवेकशील वृत्तीने समजावून घेतले पाहिजेत. ते समजावून घेताना डॉ. आंबेडकरांचा काळ, परिस्थिती आणि त्यांचे विशिष्ट व्यक्तिमत्त्व यांचे भान ठेवले पाहिजे.

वरील विश्लेषणावरून लक्षात येते, की बाबासाहेबांनी केलेली प्रत्येक कृती ही विचारपूर्वक केलेली होती. त्या पाठीमागे त्यांचे द्रष्टेपण ठायी ठायी प्रकट होताना दिसते. त्यांचे मूकनायकमधील विचार, मूकनायकमध्ये प्रकाशित झालेले लेखन, बातम्या या सर्वांचा आपण धांडोळा घेणार आहोत. त्यातून आपणास लक्षात येईल की, मूकनायक वृत्तपत्राची भूमिका तत्कालीन कालखंडात कशी महत्त्वपूर्ण ठरलेली आहे.

मूकनायकाच्या सुरुवातीला डॉ.आंबेडकरांनी संत तुकारामांचा अभंग घेतलेला आहे. तो असा आहे. 'काय करू आता धरूनियां भीड नि:शंक हे तोंड वाजविले । नव्हे जगीं कोणी मुकीयांचा जाण सार्थक लाजून नव्हे हित ।।'

या चरणातून डॉ. आंबेडकर स्पष्ट सांगू पाहतात, की आता भीड धरून उपयोगाचे नाही. मी विनाकारण हे माझे तोंड वाजवित आहे. खरोखर माझ्या असे लक्षात आले आहे की, या जगात मुक्या लोकांना कोणीच वाली नाही त्यामुळे आपल्याला हाती घेतलेल्या या वृत्तपत्रीय कामामध्ये लाजून चालणार नाही कारण त्यामधून कोणाचेही हित होणार नाही म्हणूनच हे व्रत मी आता स्वीकारले आहे.

मूकनायकच्या पहिल्याच अंकात डॉ. आंबेडकर लिहितात, 'कोणतीही एखादी जात अवनत झाली, तर तिच्या अवनतीचा चट्टा इतर जातींस बसल्याशिवाय राहणार नाही. समाज ही एक नौकाच आहे व ज्याप्रमाणे आगबोटीत बसून प्रवास करणाऱ्या उतारूने जाणूनबुजून इतरांचे नुकसान करावे म्हणून किंवा आपल्या विनाशक स्वभावामुळे म्हणा, जर का इतरांच्या खोलीस छिद्र पाडले, तर सर्व बोटीबरोबर त्यालाही आधी नाही तरी मागाहून का होईना जलसमाधी ही घ्यावी लागणार आहे. त्याचप्रमाणे एका जातीचे नुकसान केल्याने, प्रत्यक्ष नव्हे, तरी अप्रत्यक्षपणे तरी नुकसान करणाऱ्या जातीचेही नुकसान होणार आहे, यात बिलकुल शंका नाही म्हणूनच

**बाबासाहेबांनी मूकनायक या वृत्तपत्राच्या पहिल्याच अंकात मूकनायक सुरू करण्याची भूमिका स्पष्ट करताना म्हटले होते की, 'आमच्या बहिष्कृत लोकांवर होत असलेल्या व पुढे होणाऱ्या अन्यायावर उपाययोजना सुचविण्यास तसेच त्यांची भावी उन्नती व तिचे मार्ग यांच्या खऱ्या स्वरूपाची चर्चा करण्यास वर्तमानपत्रासारखी अन्य भूमीच नाही म्हणून व स्वजनोद्धाराचे महत्कार्य करणारास योग्य पंथ दाखविण्यासाठी आपण मूकनायक पत्र सुरू करीत आहोत.'**

स्वहितसाधू पत्रांनी इतरांचे नुकसान करून आपले हित करण्याचे पढत मूर्खाचे लक्षण शिकू नये.

हा बुद्धिवाद कबूल आहे, अशी वर्तमानपत्रे निघाली आहेत हे सुदैवच म्हणायचे. दीनमित्र, जागरूक, डेक्कन रयत, विजयी मराठा, ज्ञानप्रकाश, सुबोध पत्रिका वगैरे पत्रांतून बहिष्कृत समाजाच्या प्रश्नांची चर्चा वारंवार होते; परंतु ब्राह्मणेतर या अवडंबर संज्ञेखाली मोडत असलेल्या अनेक जातींच्या प्रश्नांचा ज्यात खल होतो, त्यात बहिष्कृतांच्या प्रश्नांचा सांगोपांग ऊहापोह होण्यास पुरेशी जागा मिळणे शक्य नाही, हेही पण उघड आहे. त्यांच्या अतिबिकट स्थितीशी संलग्न असलेल्या प्रश्नांची वाटाघाट करण्यास एक स्वतंत्र पत्र पाहिजे हे कोणीही कबूल करील. ही उणीव भरून काढण्यासाठी या पत्राचा जन्म आहे.'

वरील सविस्तर विवेचन याचसाठी दिले की, कोणत्या पार्श्वभूमीवर डॉ. आंबेडकरांनी मूकनायक सुरू केले. त्यांना मूकनायक सुरू करण्याची तीव्रता कशी जाणवली, विचार करण्यासारखी बाब आहे. आपला समाज जर डोळ्यादेखत बुडत असेल, त्याच्याकडे जाणीवपूर्वक दुर्लक्ष केले जात असेल, त्याला तुच्छतेची वागणूक दिली जात आहे, त्यांच्यातील माणूसपणावरच प्रश्न उपस्थित केले जात असतील, त्यांचा स्वाभिमान मारला जात असेल, आत्मसन्मानाचे जगणेच त्याच्या वाट्याला येत नसेल, असा भलामोठा निरक्षर, दुर्लक्षित समाज आपल्या अवतीभोवती असताना एका विचारी माणसाला झोपसुद्धा येऊ शकत नाही, इतकं हे सत्य आहे. आजसुद्धा आपण जेव्हा हे वाचतो तेव्हा आपल्या अंगावर शहारे आल्यासारखे होते. भल्यामोठ्या हिंदू समाजात तेथील वर्तमानपत्रांत बहिष्कृत समाजाकडे अगदी जाणीवपूर्वक दुर्लक्ष व्हावे तो समाजही हिंदू समाजाचाच एक भाग असतानाही केवळ खालच्या जातीचे, अस्पृश्य, घाणेरडे अशी बिरुदे लावून एखाद्या समाजावर आक्षेप घेणे म्हणजे महापाप करण्यासारखे होते. त्या वेळी काही दिग्गज नामवंत वृत्तपत्र चालवत होते. वाणीने प्रकांड पंडित होते; परंतु त्यांच्या लेखणीत आणि वाणीत जमीन-अस्मानाचे अंतर होते. हे अंतर फक्त त्या वेळी एकाच माणसाला मोजता येत होते ते म्हणजे डॉ. आंबेडकर. या अंतरातील सीमारेषा पुसून कशी टाकता येईल यासाठी डॉ. आंबेडकरांनी मूकनायक सुरू केले असे म्हणावे लागेल. समाजातील जातीयता इतक्या टोकाची, तीव्र पातळीची असावी हा विचारही आजसुद्धा आपण करू शकत नाही. त्या वेळची परिस्थिती तर अशी होती की, हिंदू समाजात अस्पृश्य जातीत जन्माला येणे म्हणजे एखाद्याने महापाप करणे असे समजले जाई. या सर्व पार्श्वभूमीवर अतिशय गांभीर्याने विचार केल्यावर जाणवते की, मूकनायकची तत्कालीन काळातील भूमिका ही खूप महत्त्वाची राहिलेली आहे कारण मूकनायकच्या अग्रलेखांतून परिवर्तनाची मुहूर्तमेढ रोवली जात होतीच, झोपलेल्यांना, झोपेचे सोंग घेतलेल्यांना जागे तर केलेच जात होते; परंतु ज्यांना दृष्टी असूनही जे जाणीवपूर्वक आपल्या डोळ्यांवर गांधारीसारखी पट्टी बांधून वावरतात त्यांना विचारप्रवृत्त करण्याचे मोठे कार्य मूकनायकने केलेले आहे. मूकनायक मधून जे प्रश्न उपस्थित केले गेले, विचार प्रकट केले गेले ते फक्त बहिष्कृत समाजाच्या हितसंबंधांबाबत, केवळ बहिष्कृत समाजावर होणाऱ्या अन्यायाला वाचा फोडण्यासाठी, बहिष्कृत समाजात जागृती घडवून आणण्यासाठीच होते असे नाही, तर हिंदू समाजात जे जातीपातीच्या नावाखाली ढोंग चालले आहे, एकूणच हिंदू समाज जर असाच वागत राहिला, तर एकूणच समाज उन्नतीमध्ये आपण कसे मागे राहूसमाजाच्या सर्वांगीण विकासासाठी काय आवश्यक आहे, सर्वांचे कल्याण नेमके कशात आहे अशा सर्व बाजूंवर चहू बाजूंनी विचार करून मूकनायकमध्ये विचार प्रकट केले जात होते.

'विविध विचार' या सदरातील अनेक मथळे डॉ.



अनुक्रमणिका




आंबेडकरांच्या विचारांचे द्रष्टेपण आपल्याला दाखवतात. मथळ्यांची शीर्षकेच किती दूरगामी विचार करून दिलेली जाणवतात. उदा. स्वराज्याचे मातापिता, बुजतील म्हणून!, मुसलमान ब्राह्मण झाले! या मथळ्यांतून डॉ. आंबेडकर स्पष्टपणे प्रश्न उपस्थित करतात की, मुसलमान ब्राह्मणांच्या पंक्तीस बसले म्हणून वाईट वाटण्याइतके धर्मवेड आमच्यांत आहे; पण ते पाहून पोट दुखण्याइतकी माणुसकी मात्र आमच्यात आहे, आणि म्हणूनच घरच्यास सोडून बाहेरच्यास मिठी मारण्याचे आम्हांस आश्चर्य वाटते. हिंदूत गणलेल्या सहा कोटी बहिष्कृत समाजाशी सहभोजन न करता ब्राह्मणांनी बिनबोभाट परधर्मीयांच्या पंक्तीस बसावे हा केवढा अधमपणा? येथे डॉ.आंबेडकरांची भूमिका किती स्पष्ट आणि सरळ असलेली दिसून येते. सहजपणे आपल्याला विचार करायलाही भाग पाडते. म्हणजे जाणीवपूर्वक बहिष्कृत वर्गाला त्रास देण्याचे कार्य हिंदू समाजात सुरू होते. या अशा वातावरणात कोणत्याही प्रकारे अकांडतांडव न करता वैचारिक विचारमंथनाने लढत राहणे ही सोपी गोष्ट नव्हे; परंतु डॉ.आंबेडकरांनी मात्र आपले वैचारिक शहाणपण, वैचारिक समंजस भूमिका, वैचारिक सम्यक विचार कायम सातत्याने प्रगट केलेला आहे. हेच त्यांच्या लेखनशैलीचे खास वैशिष्ट्य आहे.

विशेष म्हणजे मूकनायकमध्ये बहिष्कृतेतर समाजाच्या हिताचे, गौरवाचे, कल्याणाचे, एका अर्थाने समाज, देश, व्यक्ती या सर्वांच्या प्रगतीसाठी परिवर्तनासाठी कोणताही भेदभाव न करता बातम्या छापल्या जात असत. उदा. मानपत्र समारंभ ही बातमी १४ फेब्रुवारी १९२० सालच्या मूकनायकाच्या अंकात सविस्तर छापलेली आहे. यामध्ये रोहिदास समाजासारख्या मागासलेल्या समाजातील अत्यंत गरीब सुप्रसिद्ध क्रिकेटपटू श्री. बाळू बाबाजी पालवणकर आणि त्यांचे बंधू यांना रोहिदास विद्यावर्धक समाजाच्या विद्यमाने मानपत्र देण्याचा समारंभ मुंबई येथे आयोजित केला होता. त्याची मानपत्रासहित अगदी पालवणकर यांच्या मनोगतासहित बातमी सविस्तर छापलेली आहे यावरून असे लक्षात येते की, मूकनायकाची भूमिका ही सर्वसमावेशक, राष्ट्रीय, देशहिताचीच राहिलेली आहे.

टोणगे पान्हवतील काय? या लेखात डॉ. आंबेडकरांनी प्राथमिक शिक्षण सक्तीचे करण्यासाठी १९१० साली कायदे कौन्सिलांत जे बिल आणले आहे त्याबद्दल सर्वसमावेशक असे विचार प्रकट केले आहेत. 'लोकलज्जेस्तव केसरीकारांनी आपल्या ब्राह्मणी धोरणांत सुधारणा केली आहे. त्यांच्या हल्लीच्या मते फक्त मुलांना सक्तीचे शिक्षण द्यावे मुलींना पुढे पाहू! याचे कारण

पैशाची तूट! ज्या राष्ट्रीय भक्तांनी स्त्रियांचे शिक्षण मागाहून देऊ म्हणावे यांत दिसून येत असलेली विसंगतता व विचारशून्यता राष्ट्रीय भक्तांशिवाय अन्यत्र सापडेल असे दिसत नाही. येथे आपणास स्पष्टपणे जाणवते की, मुलींना, मागासलेल्या व बहिष्कृत वर्गातील लोकांना शिक्षण मिळाले पाहिजे या अतिशय महत्त्वाच्या विषयापेक्षा केसरीकरांना दुसरे प्रश्न महत्त्वाचे वाटतात.' येथे स्पष्टपणे दिसून येते की, डॉ. आंबेडकर फक्त टीका करायची म्हणून नाही तर शिक्षण हा प्रश्न केवळ बहिष्कृत वर्गासाठी नव्हे तर संपूर्ण समाजासाठी किती महत्त्वाचा आहे हे या सविस्तर लेखातून स्पष्ट करतात. इतकी स्पष्ट आणि सविस्तर भूमिका त्या काळी फक्त डॉ. आंबेडकरच मांडू शकत असतील कारण त्यांचे अभ्यासपूर्ण चिंतन, संदर्भ देण्याची पद्धत, विश्लेषणाची पद्धत ही कोणाही सामान्यातील सामान्य वाचकाला सहज भावेल अशीच होती म्हणून तर मूकनायक हे सामान्य माणसाच्या, बहिष्कृत समाजाच्या मनाचा, आतील आवाजाचा एक प्रकारे हुंकार होता.

मूकनायकमधील पत्रव्यवहार पाहिल्यावर लक्षात येते की, २७ मार्च१९२० च्या अंकात चौकशी झाली पाहिजे असे एक पत्र आहे. त्यामध्ये लिहिले आहे, निराश्रित साहाय्यकारी संस्था स्थापन होऊन आज तेरा वर्षे झाली. बहिष्कृतांना शिक्षण देऊन त्यांच्यांत जागृती उत्पन्न करणे हे मिशनचे ध्येय आहे. या कामी लोक आणि सरकार यांजकडून मिशनला हजारो रुपये मिळत आहेत; परंतु त्या मानाने मिशनचा उद्देश कितपत सिद्धीस गेला याची आम्हांस मोठीच शंका आहे. एवढेच नव्हे तर मिशनच्या कार्यावरून तिच्या हेतूविषयीही बहिष्कृत वर्गात अविश्वास उत्पन्न झाला आहे, असो. ज्या अर्थी बहिष्कृत वर्गाच्या नावावर मिळणाऱ्या हजार रुपयांचा मिशन चुराडा उडवीत आहे त्या अर्थी काहीही म्हणोत, हे पैसे आपल्या पदरात पडतात की नाही हे पाहणे बहिष्कृत वर्गाचे कर्तव्य आहे. अतएव मिशनच्या कामाची चौकशी करण्याकरिता एक कमिटी नेमणे अत्यंत आवश्यक आहे. वरील पत्रावरून लक्षात येते की, मूकनायक स्वतःवर झालेल्या टीकेलाही तितकेच पारदर्शक महत्त्व देताना दिसून येते. याचा अर्थ स्पष्ट आहे की, डॉ. आंबेडकर यांची पत्रकारिता किती वस्तुनिष्ठ, पारदर्शी आणि दिशादर्शक अशी होती. यावरून असे लक्षात येते की, मूकनायक हे केवळ लोकजागृतीची भूमिका पार पाडत नव्हते तर तत्कालीन कालखंडात समाजनिर्मितीची पायाभरणी सत्याच्या मूल्यांवर आधारित करीत होते म्हणूनच आजही मूकनायककाकडे मागे वळून पाहिल्यावर लक्षात येते की, इतर वर्तमानपत्रांच्या तुलनेत मूकनायक एक पाऊल पुढे होते. मूकनायकमध्ये नेहमी देशहिताचा, समाजहिताचा व्यापक दृष्टिकोन ठायी ठायी प्रत्ययाला दिसून येतो. उदा. 'कुशल प्रश्न' या सदरातील आधुनिक काळात हिंदुस्थानचा सामाजिक दर्जा या लेखात लेखक मु. ना. खंडकर लिहितात, 'हल्लीच्या काळात पृथ्वीवरील इतर राष्ट्रांमध्ये प्रगती फार झपाट्याने चालली आहे आणि ती दूर गेल्यावर हा देश अतिशय मागे राहील आणि हिंदुस्तानची स्थिती जगापुढे अगदी हीन दीन पशुवत अशी दिसेल. सध्याच्या प्रगतीमध्ये इतर राष्ट्रांपेक्षा हिंदुस्थान पाच हजार मैल मागे पडेल. हिंदुस्थानची स्थिती आपल्या पुढे थोडक्यात ठेविली आहे. याचा ज्याला आपल्या मातृभूमीची उन्नती व्हावी असे वाटत असेल त्याने विचार करणे हे बरे.' वरील उताऱ्यावरून लक्षात येते की, किती तळमळ आपल्या देशाविषयी व्यक्त करण्यात आली आहे. देश पुढे जायला हवा, समाजाची प्रगती व्हावी असा सर्वांगीण हिताचा विचार, तत्कालीन काळात अतिशय तळमळीने, व्यक्त करणारे विचारवंत हेच खरे देशभक्त म्हणावे लागतील कारण जातीपातीची एवढी गुंतागुंत जगाच्या पाठीवर कोणत्याही देशात नाही म्हणून तर जातीमुळे, भेदभावामुळे आपले नुकसान होऊ नये यासाठी देशहिताच्या दृष्टीने जे विचार अतिशय महत्त्वाचे आहेत यावर मूकनायकमधून विचारमंथन घडलेले दिसून येते.

मूकनायकमध्ये छापल्या गेलेल्या प्रश्नांची शीर्षके हीसुद्धा बहिष्कृत समाजाचं नव्हे तर संपूर्ण समाजाच्या प्रगतीची द्योतके आहेत. उदा. अस्पृश्य बंधू आपल्या पायावर उभे राहतील काय? काठीचे सपाटे. आमची जखम, भावी सुधारणेचा ओनामा, पुढाऱ्यांचे लक्ष जाईल काय? आमची हालचाल!, दायीपेक्षा आईचेच दूध श्रेष्ठ! इ. अशा अनेक शीर्षकांमधून आपणास प्रगतीचा दूरदृष्टिकोन प्रत्ययाला येताना दिसतो.

मूकनायकमधील अग्रलेख, विविध विचार, क्षेम समाचार, कुशल प्रश्न, शेलापागोटे!, आमची जखम, कळावे की, जाहिराती इ. सर्व सदर लेखन हे विचारपूर्वक निवडलेले दिसून येते. या कोणत्याही सदरात व्यक्तिगत, विशिष्ट समाजाचीच बाजू रेटलेली नाही किंवा त्यांच्यावर

**मूकनायकमध्ये छापल्या गेलेल्या प्रश्नांची शीर्षके हीसुद्धा वहिष्कृत समाजाचं नव्हे तर संपूर्ण समाजाच्या प्रगतीची द्योतके आहेत. उदा. अस्पृश्य बंधू आपल्या पायावर उभे राहतील काय? काठीचे सपाटे, आमची जखम, भावी सुधारणेचा ओनामा, पुढाऱ्यांचे लक्ष जाईल काय? आमची हालचाल!, दायीपेक्षा आईचेच दूध श्रेष्ठ! इ. अशा शीर्षकांमधून आपणास प्रगतीचा दूरदृष्टिकोन प्रत्ययाला येताना दिसतो.**

होणाऱ्या अन्यायाची कीव केलेली नाही तर देशहित, समाजहित लक्षात घेऊन विचार प्रगट केलेले आहेत, त्यामुळे मूकनायकमध्ये लिहिणारे लोक हे सर्वव्यापी दिसून येतात.

एकूणच डॉ. आंबेडकर विचार प्रकट करताना अस्पृश्य हा घटक जरी केंद्रवर्ती ठेवत असले तरी एकूणच विशाल मानव सृष्टीचे स्वरूप कसे असावे या संदर्भातच ते आपले चिंतन अधोरेखित करतात. समाजातील सर्व घटकांना केंद्रवर्ती ठेवून, सर्वांना समजेल, रुचेल, पचेल, लक्षात येईल अशा साध्या, सोप्या भाषेत कधी म्हणी, वाक्प्रचार, संत तुकारामांचे अभंग, कबीरांचे दोहे, दृष्टांत, प्रतिमा, बोधकथा इ. सर्व गोष्टींचा उपयोग डॉ. आंबेडकर आपल्या लेखनात करताना दिसतात. डॉ.आंबेडकर आपल्या लेखनात कधी कधी आशयगर्भ आणि मूलभूत चिंतनाची मांडणी करताना पल्लेदार वाक्यांचा उपयोग करताना दिसतात. त्यामुळे ही पल्लेदार वाक्ये समाजमनावर सहज प्रभाव टाकताना दिसतात. डॉ. आंबेडकरांच्या लेखनात, भाषणांमध्ये अनेक वेळा ज्या वेगवेगळ्या प्रतिमा येताना दिसतात त्या प्रतिमा इतक्या समर्पक आणि यथार्थपणे उपयोगात आणलेल्या आहेत की, त्यातून विषयाचे वैविध्य तर लक्षात येतेच; पण त्याचबरोबर प्रतिमांतील अर्थाचे गांभीर्यही तितकेच भावताना दिसते.

बाबासाहेबांच्या झुंजार लेखणीबद्दल डॉ. गंगाधर पानतावणे लिहितात, मानवी स्वातंत्र्याच्या इतिहासात वृत्तपत्रीय कर्तृत्वाला महत्त्वाचे स्थान आहे. डॉ. बाबासाहेबांची पत्रकारिता या दृष्टीने विचारात घ्यावी लागते. त्यांची पत्रे ही प्रयोजनपत्रे होती. ती धूमकेतूसारखी होती. ते विख्यात अर्थशास्त्रज्ञ होते; परंतु त्यांना आपल्या वृत्तपत्रांचे अर्थशास्त्र कधीच जुळवता आले नाही. वृत्तपत्र जगविण्यासाठी त्यांच्याकडे अर्थओघ नव्हता आणि अद्ययावत व पुरेशी यंत्रणाही नव्हती. मात्र आपल्या पत्रातून चोवीस चोवीस रकाने लिहिणारे बाबासाहेबांचे हात, दलितांच्या नवसृष्टीचे रचनाकार होते.

ज्येष्ठ विचारवंत गंगाधर पानतावणे यांनी डॉ. आंबेडकरांबद्दल जे उद्गार काढले आहेत ते अगदी त्यांच्या व्यक्तिमत्त्वाला, त्यांच्या लेखनशैलीला चपखल बसणारे आहेत. 'मुळामध्ये मूकनायकमधून प्रगट होणारे सर्व लेखन हे तत्कालीन काळातील धर्ममार्तंडाचे, जातिवाद्यांचे, प्रतिगाम्यांचे डोळे उघडे करणारे होतेच त्याचबरोबर देशाचा, समाजाचा वर्तमान आणि भविष्य कसा असायला हवा याविषयी दिशादर्शन करणारेही होते म्हणूनच त्या काळातील अनेक पुढारलेले, परिवर्तनाच्या चळवळीशी नाते सांगणारे लोकही डॉ. आंबेडकरांच्या वृत्तपत्रात लेखन करत होते. डॉ.आंबेडकरांना वृत्तपत्राचे आर्थिक गणित बसवताना मात्र खूप संकटांना सामोरे जावे लागले; परंतु या अस्वस्थतेचा कोणताही परिणाम त्यांनी आपल्या लेखनावर होऊ दिला नाही. एकनिष्ठ बांधिलकी काय असते ती खरोखर डॉ.आंबेडकरांकडून शिकायला हवी. बाबासाहेबांचे मराठी वृत्तपत्रीय लेखन आत्मप्रत्ययी होते. लेखनक्रीडा हा त्यांच्या लेखणीचा धर्म नव्हता. त्यांच्या लेखनात टिळकांप्रमाणेच जोश व आवेश आहे; परंतु आक्रमकता आणि तीव्रता टिळकांपेक्षा काकणभर अधिकच. कदाचित परकीयांशी आणि स्वकीयांशी लढण्यातील फरकाचा हा भाग असावा. बाबासाहेबांची लेखणी स्वयंभू आणि स्वयंसिद्ध होती. वक्तृत्व आणि प्रवाहीत्व ही त्यांच्या लेखनशैलीची वैशिष्ट्ये आहेत. अमोघ युक्तिवाद हा तर त्यांचा ठळक लेखन विषय होय. हा युक्तिवाद भावनेपेक्षा बुद्धीला आणि कल्पना विलासापेक्षा तर्कशक्तीला आवाहन करतो. त्यांनी तत्कालीन विरोधी व जातिवादी पत्रांच्या व पत्रकारांच्या वृत्तीचा व अहंकाराचा दंभस्फोट वेगवेगळ्या उदाहरणांनी योग्य त्या वेळी केला आहे. वर वर प्रतिपक्षाचे बिनतोड वाटणारे मुद्दे कुशलतेने खोडून काढताना मार्मिक युक्तिवाद आणि मर्मभेदी इतिहास यांचे दर्शन घडविले आहे.'

पानतावणे सरांच्या वरील विश्लेषणावरून लक्षात

येते की, डॉ.आंबेडकरांची लेखणी ही कोणत्याही प्रश्नाचे, समस्येचे मूळ शोधून त्याचे विविध कंगोरे वाचकांपुढे आणणारी अशी होती. केसरीकारांवर तर त्यांनी खूप टीका केली; परंतु कधीही ती टीका आपणास व्यक्तिवादी किंवा फक्त वादासाठी होती अशी वाटत नाही, तर मूळ प्रश्न किती गंभीर आहे, त्याची तीव्रता किती आहे हे पारखून घेऊन त्या समस्येच्या, प्रश्नांच्या विविध बाजूंनी विचार करून अभ्यासपूर्ण अशा प्रकारे केलेले ते विश्लेषण आहे असे वाटे. इंग्रज सरकार असो, कौन्सिल, कायदे असे कोणीही असो डॉ. आंबेडकरांनी त्या त्या वेळी आपल्या लेखणीतून गांभीर्याने उत्तरे दिलेली आहेत म्हणून तर शंभरी पार केल्यानंतरही मूकनायक, बहिष्कृत भारत या मधील अग्रलेख आजही वाचनीय अग्रलेख वाटतात. किंबहुना त्या लेखनांतील म्हणी, वाक्प्रचार, संदर्भ, दृष्टांत आजही लागू पडतात. या सर्वापाठीमागे डॉ. आंबेडकरांचे इतिहास, समाजशास्त्र, अर्थशास्त्र, संस्कृती या विषयांचे असणारे सखोल चिंतन आहे म्हणूनच त्यांच्या लेखनातून जे विचार प्रगट झाले आहेत त्या विचाराची, लेखनाची भाषाशैली आपण पाहिली, तर त्यामध्ये आपणाला परिपक्वता, प्रौढता, लोकांना सहज समजेल अशा पद्धतीने सहज संवाद, सर्वसामान्यांच्या जगण्याशी समरस होणारी, एक प्रकारची व्यापकपण असणारी, सर्वसमावेशकता असणारी, गंभीर वास्तवाचे आणि वस्तुस्थितीचे भान जागृत करणारी, वाचकाच्या, जनतेच्या मनावर सहजपणे ठसणारी इ. ठळक वैशिष्ट्ये दिसून येतात.

मूकनायक आरंभले तेव्हा लोकमान्य टिळक हयात होते आणि त्यांचा केसरी घराघरात स्वराज्याचा विचार नेत होता. अन्य अनेक पत्रे स्वराज्याची बांधिलकी मानून आपला प्रवास करीत होती. ब्राह्मणेतरांचीही पत्रे वाटचाल करीत होती, आणि त्यातच बाबासाहेब मुक्त समाजाचे नायकत्व स्वीकारून बहिष्कृत समाजाच्या उत्थानासाठी सिद्ध झाले होते. मूकनायकातील त्यांचे सर्व अग्रलेख समाजकारणाबरोबरच धर्म आणि राजकारणाशी निगडित होते. तत्कालीन स्वराज्याच्या प्रश्नासंबंधी विचार मांडताना स्वराज्यापेक्षाही सुराज्याची आम्हाला गरज आहे असे एका अग्रलेखात त्यांनी प्रतिपादन केले होते.

पानतावणे सर म्हणतात, त्याप्रमाणे डॉ. आंबेडकरांचे लेखन त्या काळी ब्राह्मणी वृत्तपत्रसृष्टीतही ठळकपणे समाजाचे प्रबोधन करत होते. कोणत्याही प्रकारचे दडपण न घेता, कोणाच्याही टीकेची भीती न बाळगता डॉ.आंबेडकर बहिष्कृत वर्गाबरोबरच संपूर्ण समाजाच्या प्रगतीचा, भविष्याचा विचार मूकनायकमधून प्रकट करत होते म्हणून मूकनायकची भूमिका, प्रारंभ हा नव्या विचारांची झालेली एक प्रकारची मुहूर्तमेढसुद्धा आहे. समाजाचे प्रबोधन होण्यासाठी, मोठ्या प्रमाणात लोकजागृती घडून येण्यासाठी वृत्तपत्रे ही आजही आणि त्या काळीही महत्त्वाची भूमिका बजावत आले आहेत. मूकनायकने मात्र समाजात अनेक सामान्य माणसांमधील नायक तयार केले. बोलता येत आहे; परंतु दबलेल्या, समाजाने वाळीत टाकलेल्या, ज्यांना स्वाभिमानाने जीवन जगता येत नाही अशा सर्व नायकांना, बहिष्कृत वर्गाला, समाजातील वंचित, बहुजन घटकांना नवा विचार दिला नव्हे या सर्वांमधील अनेक नायक उभे करण्याचे काम केले.

### संदर्भसूची


१) मून वसत, नरके हरी, डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांचे बहिष्कृत भारत आणि मूकनायक (प्रस्तावना) डॉ. बाबासाहेब आंबेडकर, महात्मा फुले आणि राजर्षी शाहू चरित्र साधने प्रकाशन समिती, उच्च व तंत्रशिक्षण विभाग, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई, द्वितीय आवृत्ती. २००८

२) तत्रैव (प्रस्तावना) ३) तत्रैव (संपादकीय)

४) तत्रैव (संपादकीय) ५) तत्रैव पृष्ठ क्र. ३४५

६) तत्रैव पृष्ठ क्र. ३४७ ७) तत्रैव पृष्ठ क्र. ३५२

८) तत्रैव पृष्ठ क्र. ३६१ ९) तत्रैव पृष्ठ क्र. ३७१

१०) तत्रैव पृष्ठ क्र. ४०५

११) पानतावणे गंगाधर, मन्वंतर घडवणारी पत्रकारिता लोकराज्य, एप्रिल २०१६, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, नवीन प्रशासन भवन, १७ वा मजला, मंत्रालयासमोर, हुतात्मा राजगुरू चौक, मुंबई, पृष्ठ क्रमांक. ३७

१२) तत्रैव पृष्ठ क्र. ३७

१३) पानतावणे गंगाधर, डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांची पत्रकारिता धम्मचक्र प्रवर्तन सुवर्ण महोत्सव विशेषांक, लोकराज्य, ऑक्टोबर २००६, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, नवीन प्रशासन भवन, १७ वा मजला मंत्रालयासमोर, हुतात्मा राजगुरू चौक, मुंबई, पृष्ठ क्रमांक. ४६



**प्रा.डॉ. हरेश शेळके**

मराठी विभागप्रमुख, न्यू आर्टस्, कॉमर्स अँण्ड सायन्स कॉलेज
पारनेर, ता. पारनेर, जि. अहमदनगर- ४१४३०२
चलभाष: ९७६७१७६६५१ । hareshelke@gmail.com


◈ ◈






अनुक्रमणिका



मराठी कादंबरी वाचकांची अभिरुची आणि राजकारण यातील परस्पर संबंधावर भाष्य करणारा संशोधनपर लेख.

# मराठी कादंबरी अभिरुची आणि राजकारण



गजानन भोसले

नव्वदोत्तर सांस्कृतिक पर्यावरणात अभिरुची निश्चित करणे फार गुंतागुंतीचे व अवघड झाले आहे कारण एकूणच समाज हा वाचनापेक्षा प्रसार माध्यमे आणि वर्तमानपत्रे अशा हलक्याफुलक्या वाचनात आजचा वाचक अडकलेला दिसतो. साहजिकच यामुळे कादंबरी या दीर्घ वाङ्मयप्रकाराकडे दुर्लक्ष होताना दिसते. वाचकाकडे सलग वाचनासाठी असलेला अपुरा वेळ आणि एकाच कालावकाशात अनेकविध गोष्टींकडे वाचकाने पुरविलेले लक्ष यामुळे अभिरुची संदर्भात ठोस विधाने करणे अवघड बाब झाली आहे. मराठी साहित्य व्यवहार, वाचन-संस्कृती आणि मराठी अभिरुची आणि राजकारण ह्यांविषयी काही ठोस विधाने करणे ही गुंतागुंत उकलण्याचा प्रयत्न आहे. आपल्याकडे एकाच वेळी अनेक परस्परविरोधी, विसंगत वाटणाऱ्या गोष्टी घडत असलेल्या दिसून येतात. अर्थात एकीकडे आपल्याकडे गावपातळीपासून ते जागतिक पातळीपर्यंत भरणाऱ्या वेगवेगळ्या विचारांच्या संमेलनांना लाखो लोक हजेरी लावतात, आणि आपल्या वाचकाला 'कोसला' आणि 'मृत्युंजय' ह्यांसारख्या पूर्णतः भिन्न प्रकृतीच्या कलाकृती एकाच वेळी सारख्याच प्रमाणात आवडू लागतात; परंतु १९६० पूर्वीच्या मराठी कादंबरीची चर्चा अभिरुचीच्या संदर्भात करताना हे चित्र पालटलेले दिसते. विशिष्ट मध्यमवर्ग हा कादंबरीचा केंद्र असल्याचे दिसते. तसेच एकरेषीय कथानकांनी कादंबरी वाचकाला खिळवून ठेवण्याचे कामदेखील साठपर्यंतच्या कादंबऱ्यांनी केले.

साठोत्तर काळापासून वाचक हा खऱ्या अर्थाने सजग होताना दिसून येतो. मध्यम वर्ग मोठ्या प्रमाणात शिक्षित झाल्यामुळेदेखील कादंबरीच्या अभिरुचीमध्ये परिवर्तने झालेली दिसून येतात, यामध्ये तीन सूत्रांच्या अनुषंगाने मराठी अभिरुचीतील संघर्ष समजावून घेण्याचा प्रयत्न राहील, त्यामध्ये कादंबरी वाङ्मयाच्या सुरुवातीपासून ते साठपर्यंतचा पहिला टप्पा आणि साठ ते पंचाहत्तरपर्यंतचा दुसरा टप्पा व पंचाहत्तर ते २०२० पर्यंतचा तिसरा टप्पा या एकूण व्यामिश्र गुंतागुंतीतून मराठी कादंबरी आणि अभिरुची संघर्ष अशी मांडणी केली जाईल.

नव्वदोत्तर कालखंडात सामाजिक, सांस्कृतिक, आर्थिक, राजकीय आणि औद्योगिक बदल मोठ्या प्रमाणात झालेले दिसतात. यामुळे मानवी जीवनात एकूण गुंतागुंत वाढत गेलेली दिसून येते. या सर्व गुंतागुंतीच्या परिणामापासून वाचन संस्कृतीदेखील दूर राहिलेली नाही. अर्थात वाचकाच्या अभिरुचीतदेखील स्थित्यंतरे झालेली जाणवतात. नव्वदपूर्वी मध्यमवर्ग वाचक हा सलग एकसंघ वाचक असल्याचे चित्र दिसते; परंतु जागतिकीकरणातून उदयास आलेल्या यंत्र सामुग्रीमुळे वाचक मूळ प्रवृत्तीपासून

दुरावलेला दिसतो. या सगळ्याचा परिणाम म्हणजे वाचक तुकड्या-तुकड्याच्या स्वरूपात वाचत असल्याचे चित्र समोर येते. यातून जो प्रश्न निर्माण होतो तो म्हणजे अभिरुची निश्चित करणारे घटक काय करतात? तेव्हा ह्या घटकांचे चित्रण करता एकूण चित्र हे जागतिकीकरणामुळे आमूलाग्र बदललेले जाणवते.

कादंबरी वाङ्मयाच्या सुरुवातीपासून ते साठपर्यंतच्या अनुषंगाने अभिरुचीचा विचार करता असे चित्र हाती लागते, की लेखकाच्या प्रभावातून अभिरुची निश्चित होताना दिसते, यामध्ये जास्तीत जास्त काळ वाचकाला कलाकृतीत गुंतवून ठेवणे आणि वाचकाचे मनोरंजन करणे म्हणजे अर्थात मागणी तसा पुरवठा अशा स्वरूपाच्याच बहुसंख्य कादंबऱ्या ह्या कालखंडात निर्माण झाल्याचे दिसून येते. हा कालखंड जसा शिक्षणापासून वंचित असलेलाच दिसतो, तसा या कालखंडातला वाचकदेखील विशिष्ट स्वरूपाचा मध्यमवर्गच होता. त्यामुळे त्याला या कालखंडातील निर्माण झालेल्या कादंबऱ्या अधिकाधिक जवळच्या वाटायच्या आणि सुरुवात-मध्य-शेवट अशा स्वरूपाच्या असल्यामुळे वाचकालादेखील वाचन करताना कसरत करावी लागायची नाही. ह्या कादंबऱ्यांना समर्पक स्वरूपाचा शेवट असल्यामुळे वाचक अधिक गुरफटून जाताना दिसतो; परंतु नंतरच्या काळात कादंबरीत झालेले नवे प्रयोग वाचकालादेखील एक आव्हान ठरले. त्यामुळे एकूण अभिरुचीतील स्थित्यंतरे स्पष्ट होतात.

साठोत्तरी कालखंडात अभिरुचीच्या अनुषंगाने विचार करता असे लक्षात येते की, अभिरुचीचे केंद्र बदललेले दिसते. म्हणजे अभिरुची ही लेखकाला घडविण्याचे कामदेखील एका दृष्टीने करत असते. तसेच अभिरुची काळाचे अपत्य असते. अर्थात प्रत्येक कालखंडात नवनव्या घटना घडत असतात. त्यातून अभिरुची घडत असते. १९६० नंतरचा काळ हा अनेकविध घटितांचा प्रभाव पडलेला काळ आहे. त्याचप्रमाणे ह्या कालखंडात वाङ्मय निर्मितीचे केंद्र देखील बहुजनवर्ग असल्याने या कालखंडाला वेगवेगळे आयाम प्राप्त झाल्याचे दिसून येतात. ह्या कालखंडाचे अभिरुचीच्या अनुषंगाने महत्त्वमापन करताना एकच-एक घटक केंद्र ठेवून मीमांसा करता येणे शक्य नाही. त्यासाठी अनेकविध घटितांच्या अनुषंगाने अभिरुचीचा विचार करणे महत्त्वाचे ठरते.

प्रामुख्याने वाङ्मयीन अभिरुचीच्या संदर्भात लेखक-प्रकाशन व्यवहार आणि समीक्षक यांच्या अनुषंगानेदेखील एक मांडणी करता येऊ शकते. अर्थात एखाद्या लेखकाकडे म्हणजेच किरण नगरकर, मनोहर शहाणे, बाबू बिरादार यांचे लेखन सक्षम असूनदेखील समीक्षक याकडे जाणीवपूर्वक दुर्लक्ष करताना दिसतात. यातून समीक्षक हादेखील वाङ्मयीन अभिरुची नियत करण्यात मोलाची भूमिका पार पाडत असतो. त्यासाठी त्याला तटस्थ राहून कलाकृतीचे वाङ्मयीन दृष्ट्या महत्त्व समजावून घेऊन समीक्षा करणे महत्त्वपूर्ण असते; परंतु आज मराठी वाङ्मयीन व्यवहार समीक्षा ही तटस्थ व पारदर्शक स्वरूपाची न होता एका विशिष्ट लेखकाला अधिकाधिक मोठं करण्यासाठी आणि व्यक्तिगत स्वरूपाच्या पातळीवर होताना दिसून येते. त्यामुळे अनेक लेखक वाङ्मयीन अभिरुचीपासून दूरच फेकले जाताना दिसतात. त्यामुळे नको त्या संहितांना अधिकाधिक महत्त्व प्राप्त होताना दिसून येते. या पुढील काळात समीक्षकांनी कलाकृतीशी प्रामाणिक राहून समीक्षा केल्यास आजच्यापेक्षा वेगळ्या स्वरूपाचे वाङ्मयीन पर्यावरण तयार होण्यास मदत होईल.

अभिरुची विकसित करण्यात प्रकाशन व्यवहार हा प्रामुख्याने महत्त्वाचे काम करीत असतो. कलाकृतीचा प्रसार आणि कलाकृती जास्तीत जास्त वाचकांपर्यंत पोहोचविणे यावरून देखील कलाकृतीची अभिवृद्धी सिद्ध होत असते. याबाबतीत समकालीन प्रकाशन व्यवहाराकडे दृष्टिक्षेप टाकल्यास मराठी प्रकाशन व्यवहार खूप मागे असल्याचे चित्र दिसून येते. एका कलाकृतीच्या किती आवृत्त्या निघाल्या यावरून देखील त्या कलाकृतीची अभिरुची मोजली जाऊ शकते. त्याचप्रमाणे वाचकाच्या वय, लिंग, वंश, जातपरत्वेदेखील अभिरुचीच्या संदर्भात काही ठोस विधाने करता येऊ शकतात. त्याचबरोबर लेखक हा एकापेक्षा अधिक भाषेत कलाकृती लिहीत असतो तेव्हा मात्र लेखकीय अभिरुचीच्या संदर्भात मत मतांतरे करणे अधिकाधिक गुंतागुंतीचे होऊन बसते, असे म्हणता येईल. खऱ्या अर्थाने कलाकृतीवर अभिरुचीचा कळत नकळत प्रभाव हा असतोच. तसेच अभिरुची



अनुक्रमणिका

विकसित करण्यात साहित्य संस्था, ग्रंथालय, शाळा, महाविद्यालये, विद्यापीठे, नियतकालिके, वर्तमानपत्रे या अनुषंगानेच सामाजिक, सांस्कृतिक, राजकीय पर्यावरण वाङ्मयीन अभिरुची विकसित करण्यात महत्त्वाची भूमिका पार पाडत असतात. अर्थात साठोत्तर कालखंडात बहुजनसमाज, वाचक हा अभिरुचीच्या केंद्रस्थानी आल्यामुळे अभिरुचीच्या रूढ संकेत व्यवस्थेला धक्के बसल्याचे दिसून येतात आणि अभिरुचीमध्ये सर्व समूहाचा समावेशदेखील दिसून येतो. अर्थात एकूण वाचन संस्कृती आणि मराठी अभिरुची आणि त्यातील राजकारण ह्याविषयी ठोस विधाने करणे गुंतागुंतीचे आहे.

अर्थात वाङ्मयीन अभिरुची टप्याटप्याने विकसित रूप धारण केलेली दिसून येते. नव्वदोत्तर कालखंड खूप मोठा व्यामिश्रतेचा म्हणून ओळखला जातो. जागतिकीकरणात विविध साहित्य प्रकारांत वेगवेगळ्या प्रकारचे आशय आणि अभिव्यक्ती या अनुषंगाने प्रयोग झालेले दिसतात. मूळ अभिरुचीला नाकारून साहित्य व्यवहारात हे नवे प्रयोग लेखकाने केलेले दिसतात. समकालीन पर्यावरणातूनच अभिरुची विकसित होत असते. नव्वदोत्तर कालखंडात खऱ्या अर्थाने अभिरुचीचे केंद्र साहित्याकडूनप्रसार माध्यमे अशा सामाजिक माध्यमातून तुकड्या-तुकड्याच्या स्वरूपात वाचक आपली अभिरुची सिद्ध करताना दिसतो आहे. गेल्या दोन दशकांत एकूण वाङ्मयीन पर्यावरणात कमालीचे बदल होताना दिसतात. त्याचीच परिणती म्हणजे प्रकाशन व्यवहारात फार मोठ्या प्रमाणात बदल झालेले दिसून येतात. त्यामध्ये एखाद्या कलाकृतीला किती वाचकांपर्यंत नेऊन पोहोचवायचे आणि अभिरुची निर्माण करायचे हे मोठे आव्हान आजच्या एकूण समकालीन प्रकाशन व्यवसायांनी स्वीकारल्याचे दिसते. त्यातून कलाकृतीही वाचकाच्या मनावर अधिराज्य गाजवताना दिसते. यातूनच अभिरुची विकास पावतानादेखील दिसते.

वाङ्मयीन अभिरुचीचे स्वरूप हे खऱ्या अर्थाने नव्वदोत्तर कालखंडात अधिकाधिक बदलत आणि रूपांतरीत होत गेल्याचेदेखील दिसून येते. अभिरुची निश्चित करणे या कालखंडात फार अवघड झाल्याचे देखील दिसून येते. म्हणजेच अभिरुची ही एकजिनसी स्वरूपाची गोष्ट नसून ती अनेक पातळ्यांवर बदलत असते असे दिसून येते. खऱ्या अर्थाने अभिरुची घडविण्यामध्ये लेखकसुद्धा महत्त्वाचा घटक असल्याचे दिसते. प्रत्येक काळात वाचकाला एका विशिष्ट पद्धतीने वाचनाची सवयदेखील लागलेली असते. अर्थात अनेक लेखक वाचकांची अभिरुची ओळखूनदेखील लेखन करत असतात. म्हणजे अर्थातच लेखकही सातत्याने वाचकाच्या परिघामध्ये राहून लेखन करताना दिसतात. त्याचबरोबर कधी-कधी लेखक प्रस्थापित अभिरुचीला नाकारून लेखन करण्याचा प्रयत्नदेखील करताना दिसतात. यातून असे स्पष्ट होते की, वाङ्मयीन निर्मितीचा वाङ्मयीन अभिरुचीशी एक अनोखा संबंध असल्याचे स्पष्ट करता येऊ शकते. अर्थात कोणत्याही समाजातील लेखन व्यवहार हा त्या-त्या समाजातील कालखंडातील स्थितिशील स्वरूपाच्या संकेतांनी बद्ध झालेला दिसतो. त्या अनुषंगानेच अभिरुचीदेखील घडत असते. 'प्रत्येक कालखंडाची अभिरुची वेगवेगळी असते. इतिहासाचा तिच्या घडणीत थोडा वाटा असतो. आर्थिक आणि सामाजिक स्थितीगती, चळवळी या अभिरुचीच्या घडणीस, पोषणास फार मोठी मदत करत असतात. अर्थात अभिरुचीचे स्वरूप तपासताना तिच्यात काही मूल्ये दडलेली आहेत, असेही दिसून येते. किंबहुना अभिरुचीच्या अनेक घटकांपैकी मूल्यात्मकता हा महत्त्वाचा घटक असतो.'

यावरून असे स्पष्ट होते की, अभिरुचीच्या स्वरूपात सातत्याने बदल होत असतो. अभिरुचीत बदल जरी होत असला तरी प्रस्थापित व्यवस्थेतील अभिरुची संपूर्णतः मोडीत काढून नवीन अभिरुची निर्माण होते असे मात्र नाही; पण त्याच्या बदलाच्या स्वरूपातील परिवर्तने मात्र मान्य करावी लागतात. संपूर्णतः वाचक एकाच अभिरुचीने प्रभावित झालेला असतो काय? तर असेदेखील चित्र दिसणार नाही. जसे कालखंडातील घटितांप्रमाणे अभिरुचीचे स्वरूप बदलते, तसेच त्या-त्या कालखंडातील वेगवेगळे गटदेखील निर्माण झालेले असतात. त्याची अभिरुचीदेखील तपासणे गरजेचे असते. अर्थात नव्वदोत्तर कालखंडातील कादंबरीच्या संदर्भात विचार करता असे दिसते की, या कालखंडातील कादंबरीच्या वेगवेगळ्या प्रवृत्ती जाणवतात, त्यानुसारदेखील अभिरुचीचा विचार होऊ शकतो. म्हणजे

नवकादंबरी, आधुनिक कादंबरी, उत्तर आधुनिक कादंबरी, तसेच दलित कादंबरी, ग्रामीण, स्त्रीवादी, आदिवासी अशा वेगवेगळ्या प्रवाह व प्रवृत्तीच्या अनुषंगानेदेखील अभिरुचीचा अभ्यास करावा लागतो. प्रामुख्याने हा अभ्यास करताना प्रश्नावलीच्या स्वरूपात काही एक प्रयोगकरूनदेखील अभिरुची निश्चित करता येऊ शकते; परंतु अशा एकाच पद्धतीने अभिरुचीचे स्वरूप समजावून घेणेदेखील स्तुत्य ठरणार नाही; त्यासाठी अनेकविध संशोधन पद्धतींचा वापर करणे महत्त्वाचे वाटते. तसेच त्या-त्या काळाची मूल्यव्यवस्था या अनुषंगाने अभिरुची नियत करता येऊ शकते.

'अर्थात अभिरुची काही एकजिनसी आणि ठरीव अशी गोष्ट आहे, असे नाही. पुष्कळदा अभिरुचीच्या घडणीत लेखक-कलावंताचाही फार मोठा वाटा असतो. साहित्यात जेव्हा-जेव्हा नवे प्रवाह येतात, नवे प्रयोग होतात तेव्हा-तेव्हा प्रस्थापित अभिरुचीशी लेखक टक्कर घेत असतो. म्हणजे असे की, वाचकांना एका विशिष्ट पद्धतीने वाचायची सवय असते. एका विशिष्ट आशयाचीच सवय लागलेली असते. बहुसंख्य लेखक या वाचकांच्या सवयीशी तादात्म्य पावून लिहितात किंवा असे म्हणता येईल की, 'वाचकाच्या अभिरुची परिघामध्येच घोटाळत राहतात.' अर्थात ज्याप्रमाणे वाचकाची अभिरुची कळत नकळत स्वरूपात आपोआप घडत असते. त्याप्रमाणे लेखकाकडून कधी-कधी जाणीवपूर्वक वाचकाला अभिरुचीमध्ये गुंतवून ठेवण्याचादेखील प्रयोग केला जातो. हे जसे घडते तसेच प्रस्थापित अभिरुचीला तडे जातील अशा प्रकारे साहित्यकृतीमध्ये प्रयोग करून वाचकाची अभिरुचीदेखील घडवली जाते. म्हणजेच असे द्वंद्व कोणत्याही कालखंडात नाकारता येणार नाही; परंतु अभिरुचीच्या गटाचे स्वरूप मात्र कमी-जास्त प्रमाणात सातत्याने दिसून येते. अर्थात अभिरुचीचे स्वरूप सर्व कालात, सर्व परिस्थितीत सारख्याच स्वरूपाचे नसते, तर त्यात सातत्याने बदल होत असतो.

त्याचप्रमाणे कला व्यवहारातील समाजातील वेगवेगळ्या क्रांत्या, सामाजिक, राजकीय, सांस्कृतिक, आर्थिक पातळीवरील बदल त्याचप्रमाणे विज्ञान व औद्योगिक क्षेत्रांतील विविध बदल या घटनांतून कलावंताच्या सर्जनशीलतेतून प्रस्थापित समाज व्यवस्थेपेक्षा काही वेगळे प्रयोग साहित्यकृतीतून कलावंत करत असतो म्हणजेच प्रस्थापित समाज व्यवस्थेला टक्कर देत असतो. रूढ अभिरुचीशी मिळतीजुळती कलावंताची भूमिका नसल्यामुळे वाचक हे सहजपणे स्वीकारण्यास कचरतानादेखील दिसतात. ते एका स्वरूपाचे अभिरुचीपुढे आव्हानदेखील असते; परंतु ते हळूहळू वाचक स्वीकारायला लागतो कारण वाचकाचा मूल्यव्यवस्थेशी असलेला संबंधदेखील त्यातून स्पष्ट होत असतो.

अभिरुचीचा संबंध हा जसा काळ परिवर्तनाशी आहे तसाच त्या-त्या कालखंडातील विज्ञान, औद्योगिकीकरण आणि कलेतील प्रयोगशीलतेशी घनिष्ठ स्वरूपाचा संबंध अधोरेखित करता येऊ शकतो. कला व्यवहारात जे नवे प्रयोग जन्माला येतात त्या-त्या प्रयोगाशी वाचक नकार व स्वीकाराच्या पातळीवर संबंध जोडत असतो. अ. वा. कुलकर्णी म्हणतात, 'अभिरुची ही जन्मजात असली तरी विकासक्षम जरूर आहे. सर्व साधारण स्वरूपातील समाजाची सामूहिक अभिरुची ललितकलांच्या विकासानुसार उत्क्रांत व प्रगत होत गेलेली दिसते. कोणताही साहित्य प्रकार घेतला तरी त्याचे प्रारंभकालातील रूप आज कालमानानुसारच्या वाटचालीत बदललेले दिसते.' अभिरुचीचे स्वरूप हे सातत्याने विकसित होत असते. आपण आजपर्यंतच्या अभिरुचीचा इतिहास बघितला तरी ही गोष्ट सहजपणे लक्षात येते. समाजातील परिवर्तनाप्रमाणे अभिरुचीतदेखील परिवर्तन लक्षात येते. समाजातील परिवर्तनाप्रमाणे अभिरुचीतदेखील परिवर्तने होऊन अभिरुची विकासक्षम रूप धारण करताना दिसते. यातूनच उत्तर आधुनिक मराठी कादंबरीच्या अनुषगाने विचार करता अभिरुची साहित्यव्यवहारातील या स्थित्यंतरांना समग्रपणे पेलताना दिसते. म्हणजेच तिची उत्क्रांत व प्रगत अवस्थादेखील याठिकाणी सिद्ध करत असते. साहित्य हे काळाचे अपत्य असते अर्थात काळाच्या पटावर घटितांची नोंद सर्जनशीलतेच्या अनुषंगाने घेत असते. यातून अभिरुची वृद्धिंगत होत असते.

प्रत्येक कालखंडाला एक नवा चेहरा लाभलेला असतो. त्या कालखंडातील घटितांतून सर्जनशील कलात्मक मांडणी कलावंत करीत असतो. जसा त्या

**नव्वदोत्तर कालखंडात अभिरुचीच्या संदर्भात विचार करता विशेषतः कादंबरी वाङ्मय प्रकाराच्या अनुषंगाने त्यातल्या त्यात उत्तर आधुनिक कादंबरीच्या बाबतीत वाङ्मयीन अभिरुची पाहताना विदारक स्वरूपाचे चित्र दिसून येते कारण हा कालखंड मुख्यतः विज्ञान, तंत्रज्ञान, औद्योगिकीकरण या क्रांतिकारक बदलाची नांदी म्हणून ओळखला जातो. यात कादंबरी वाचनाची अभिरुची बाळगणारा खूप कमी वर्ग दिसतो. याची कारणे समकालीन पर्यावरणात व समकालीन आर्थिक, सामाजिक, सांस्कृतिक बदलांत तपासणे पोषक ठरेल. कादंबरीचा अवकाश हा मोठा असतो. त्यातल्या त्यात आज अभिरुचीचे केंद्र वाचनापेक्षा इतर घटकांकडे वळलेले दिसते.**

घटितांचा साक्षीदार कलावंत असतो तसाच वाचकदेखील असतो. त्यानुसार कालखंडातील वाटचालीला विकसित रूप प्राप्त होत असते. अर्थात अभिरुचीच्या स्वरूपामध्ये मतभिन्नता जरी दिसत असली तरी त्याच्या विकसित व प्रगत अवस्थेच्या संदर्भात मात्र एकमत असल्याचे मान्य करावे लागते. नव्वदोत्तर कालखंडात अभिरुचीने अनेकविध कलाव्यवहारांतील प्रयोगशीलतेला पोटात सामावून समृद्ध रूप धारण केल्याचे दिसून येते.

'साहित्याचे मूलद्रव्य शब्द व शब्दबंध असल्याने साहजिकच साहित्यिक अभिरुचीत शब्द ज्ञानाला महत्त्वाचे स्थान लाभते. मुळात शब्द हे इतर कलांच्या साधनांहून (मौखिक संगीत वजा करता) वेगळे साधन आहे. ती माणसाची स्वनिर्मिती आहे. तिला स्थूल वा जड अस्तित्व नाही. समाजाच्या साह्यानेच तिचे स्वरूप घडत जाते. माणसाला संदेशाचा स्वीकार करण्याचे साधनही शब्द व भाषा हेच आहे. याच भाषेच्या आधारे साहित्यकलेची निर्मितीही माणूस साधतो; पण साहित्यकलेतील भाषा वेगळी कला घेऊन अवतरत असते. या वेगळ्या कलेचे भान साहित्यिक अभिरुचीत अभिप्रेत असते.' या ठिकाणी वाङ्मयीन अभिरुचीचा विचार करताना कलावंत व रसिक या दोन्ही अंगांनी कलाकृतीचा तसेच अभिरुचीचा विचार प्रस्तुत ठरतो. प्रत्येक कलाकृती एखाद्या साहित्य प्रकारात मोडत असते. त्यातून कलाकृतीचे रूप, घाट, भाषा, आकार स्वतंत्र ओळख निर्माण करत असते. काही नियमांच्या अनुषंगाने एकसंघ कलाकृती उभी राहू शकते. त्याचप्रमाणे साहित्यिक अभिरुचीला वाङ्मय प्रकाराची रूप, घाट, आशय, भाषा याची जाणीव असणे गरजेचे आहे. अन्यथा निर्मिती प्रक्रिया आणि आस्वाद प्रक्रिया या गोष्टी नीट पद्धतीने होणार नाहीत.

तसेच वाङ्मयीन अभिरुची निश्चित करताना भाषिक भान असणे गरजेचे आहे. मानवी जीवनातील प्रत्यक्ष व्यवहारात वाच्यार्थ पुरेसा असतो; परंतु ललित साहित्यात व्यंजना व लक्षणा या दोन्ही शब्दशक्तींचे उत्तम आकलन हवे. वाचकाकडे व्यंजनेचे अर्थनिर्णयन करण्यासाठी भाषिकदृष्ट्या ज्ञान आणि सौंदर्यात्मक मर्मदृष्टी असणे गरजेचे असते. समाजभाषा व साहित्यिक भाषा यांच्यातील द्वंद्वाचे रसिकाजवळ सजग भान असणे गरजेचे असते अन्यथा अभिरुचीमध्ये अडचणी निर्माण होत असतात. 'वाचकाला समाज भाषा आणि साहित्याची भाषा यांच्यात फारकत करता आली पाहिजे.' वरील अवतरणातून असे स्पष्ट होते की, साहित्यिक भाषा व समाज भाषा तसेच वाङ्मय कला प्रकार या गोष्टीचे ज्ञान रसिकाजवळ असणे गरजेचे असते. यातूनच वाङ्मय अभिरुची विकसित होतअसते.

'साहित्यकृतीची समाजसापेक्षता लक्षात घेतली, तर तो समाज, तेथील संस्कृती, विशेष अशी सांस्कृतिक मूल्ये, त्या समाजाच्या वाटचालीचा इतिहास या बरोबरच साहित्यकृतीचा उलगडा नीट होण्यासाठी ज्यांना सामाजिक शास्त्रे (Social Sciences)म्हणतात, त्या तत्त्वज्ञान, समाज, अर्थ, भूगोल, मानस इ. शास्त्रांची किमान तोंडओळख तरी असणे आवश्यक आहे. असे ज्ञान अभिरुची समृद्ध आणि संपन्न करीत असते. अभिरुचीला यामुळे वजन, खोली आणि व्यापकता प्राप्त होत असते. ती निश्चितच निर्मितीला मदत करते.' वाङ्मयीन अभिरुचीचा नीट उलगडा होण्यासाठी प्रामुख्याने रसिकाला तो ज्या कालखंडातील साहित्यकृतीचे वाचन करीत असेल त्या काळातील स्थित्यंतराचा, चढ-उताराचा आणि सूक्ष्म अशा घटितांचा आढावा घेता आला पाहिजे कारण साहित्यनिर्मिती प्रक्रियेत हे घटक महत्त्वाचे

असतात. म्हणजे कलावंत ह्या घटकांच्या अनुषंगाने कल्पित व वास्तवाचा वापर करत सर्जनशीलता पणाला लावत असतो आणि कलाकृतीची निर्मिती करत असतो. रसिक कलाकृतीचा आस्वाद घेताना ह्या घटितांचे संदर्भ त्याच्याकडे असणे गरजेचे असते. त्याचप्रमाणे प्रत्येक काळाची सांस्कृतिक मूल्येदेखील बदलत असतात. त्या मूल्यांचा अनन्वार्थदेखील वाचकाला लावता आला पाहिजे. समकालीन साहित्य शास्त्राचे ज्ञानदेखील असणे महत्त्वाचे असते. आज एकाच वेळेस वाचक अनेक घटितांना स्पर्श करताना दिसतो. त्यामुळे किमान या सर्व घटनांची तोंडओळख महत्त्वाची आहे. नव्वदोत्तर साहित्य व्यवहाराचा अभ्यास करताना या संपूर्ण घटना प्रसंगाची नोंद घेतल्याशिवाय लेखक व वाचक यांना समोर जाताच येणार नाही. या संपूर्ण गोष्टीचे ज्ञान असेल, तर अभिरुची अधिकाधिक संपन्न व समृद्ध झाल्याशिवाय राहणार नाही असे म्हणता येईल. यातूनच अभिरुचीला व्यापकतादेखील प्राप्त होत असते. एखादी कलाकृती वाचकाला आवडली नसेल तर खऱ्या अर्थाने यास निर्माता जबाबदार की वाचक ह्या अशा अनेक प्रश्नांची कोंडीदेखील अभिरुचीच्या संदर्भात वरील अवतरणातून सोडवता येते.

'साहित्यनिर्मितीच्या सातत्यामुळे अभिरुची संस्कारीत होण्यास मदत होते हे खरे! पण दीर्घकाळ त्या दोहोत काही बदल घडले नाहीत, तर एकसुरीपणा येतो. मराठीतील अध्यात्मप्रवण मध्ययुगात असे झालेले दिसते. अर्थात ग्रंथरचना आणि आस्वाद या मागे त्या काळी वाङ्मयीन प्रेरणा होत्या असे नव्हे. इंग्रज इथे आले इंग्रजी भाषेचे अध्ययन सुरू झाले आणि क्रमाक्रमाने शुद्ध म्हणू असे एक वाङ्मयीन पर्यावरण तयार होत गेले. अर्वाचीन साहित्य हे त्याचे उदाहरण होय. साहित्य व अभिरुची यांनी एकदम फार मोठे वळण या काळात घेतलेले दिसते.' साहित्य आणि अभिरुचीमध्ये सातत्याने काही एक बदल होत असतात. भारतीय व्यवस्थेत इंग्रज आल्यानंतर मात्र अभिरुचीतील स्थित्यंतरे वेगाने घडायला लागली. त्याचबरोबर मुद्रणाचा शोध लागल्यामुळे तर साहित्यव्यवहार लिखित स्वरूपात वाचकापर्यंत पोहचू लागला. त्यामुळे अभिरुची लिखित मजकुरातून पोसली जाऊ लागली. एकोणिसाव्या शतकातील या घटितांमुळे जो काही एकसुरीपणा अभिरुचीमध्ये आला होता त्याचे स्वरूप बदलताना दिसते. इंग्रजांच्या आगमनापासून ते नव्वदोत्तर कालखंडापर्यंतचा विचार करता अभिरुचीमधे अनेकविध परिवर्तने झालेली जाणवतात. खऱ्या अर्थाने नव्वदोत्तर अभिरुचीचे स्वरूप निश्चित करणे म्हणजे तारेवरील कसरत करण्यासारखे आहे, असेदेखील एकूण घटितांच्या संदर्भांच्या अनुषंगाने सांगता येते. विज्ञान, तंत्रज्ञान, औद्योगिकीकरण, नफेखोरीचे तत्त्व अशा घटनामुळे वाचक सलगपणे कादंबरी वाचताना दिसत नाही, आणि त्यातल्या त्यात कादंबरीची वाढती पृष्ठसंख्या या कारणामुळे वाचकाचा दृष्टिकोन बदलत चाललेला दिसतो. तरीपण असे म्हणून चालणार नाही. एकीकडे असेदेखील चित्रण वाङ्मयीन अभिरुचीच्या संदर्भात दिसत असले तरी तेवढ्याच गंभीरपणे वाचणारी पिढीदेखील नव्वदोत्तर कालखंडात दिसून येते. भलेही गंभीर, तत्त्वज्ञानात्मक, उत्तर आधुनिक विचारव्यूहातून वाचन करणारा वाचक कमी असला तरी त्याच्या म्हणून अभिरुचीचादेखील एक गट अस्तित्वात असल्याचे दिसून येते. हा गट मूल्यात्मक अभिरुचीचे महत्त्व अधोरेखित करत असतो.

'वाङ्मयाभिरुचीचा विचार करताना वाङ्मयनिर्मितीशी जिचा जिव्हाळ्याचा संबंध आहे. अशा एका मानस शक्तीपासून ती वेगळी आहे हे लक्षात ठेवणे अगत्याचे आहे. ती शक्ती म्हणजे प्रतिभा होय. प्रतिभा म्हणजे वाङ्मयनिर्मितीच्या मुळाशी असणारी हेतुभूत अशी निर्मितीक्षम प्रज्ञा आहे. बुद्धीची वा मनाची शक्ती आहे. वाङ्मयनिर्मितीस किंवा कोणत्याही प्रकारच्या नवनिर्मितीस कारणीभूत अशी अत्यंत आवश्यक अशी ती शक्ती आहे. ह्याबद्दल जुन्या व नव्या वाङ्मय मीमांसकांत एकवाक्यता आहे. अभिरुची हा निर्मितीक्षम असा मनोधर्म आहे असे म्हणता येत नाही.' प्रामुख्याने वरील अवतरणातून आपणास प्रतिभा आणि अभिरुची ह्या दोन गोष्टी कशा वेगवेगळ्या स्वरूपाच्या आहेत हे सांगता येते. प्रतिभा ही कलानिर्मितीच्या मूळ तत्त्वाशी असते. म्हणजे साहित्यिक सर्जनाच्या निर्मितीची शक्ती म्हणून देखील पाहिले जाते. या शक्तीच्या अनुषंगानेच कलावंत आपली कलाकृती साकार करत असतो; पण अभिरुची पूर्णतः ह्यापेक्षा वेगळ्या स्वरूपाची आहे. अर्थात वाचन आणि निर्मिती प्रक्रिया यांच्यातील गूढ समजावून घेतल्याशिवाय अभिरुचीचा उलगडा नीट पद्धतीने होऊ शकणार नाही. वाचकालादेखील वाचन करताना काही गोष्टींची आखणी

करता यावी लागते. म्हणजेच कलाकृतीतील एकूण घटनांचा एक क्रम लावता आला पाहिजे, यातून वाचन प्रक्रिया सुलभ करता येईल; आणि अभिरुची संपन्न होण्यास मदत होईल. म्हणजे अभिरुची ही निर्मितीसारखी प्रक्रिया आहे असे म्हणता येणार नाही. जरी वाचक कलाकृतीला अन्वयार्थ लावण्याचा प्रयत्न करत असला तरी मुळात या दोन वेगवेगळ्या प्रक्रिया आहेत. प्रतिभेचा तसा कलानिर्मितीशी अधिकाधिक जवळचा संबंध आहे. अर्थात प्रतिभेशिवाय कलाकृतीच संभवू शकणार नाही असे म्हटल्यासदेखील वावगे ठरणार नाही. यापेक्षा अभिरुचीला प्रतिभेची गरज असतेच असे नाही, त्यामुळेच ही निर्मितीपेक्षा वेगळ्या पद्धतीची गोष्ट आहे.

'अभिरुचीचा विचार सामाजिक संदर्भात केला, तरी अभिरुचीची संकल्पना ही अंतिम पृथःकरणाच्या संदर्भातील मानावी लागते. कदाचित राष्ट्रीय अभिरुची म्हणून काही एक संस्कृतीसापेक्ष असे अभिरुचीचे स्वरूप मांडता येईलही. तथापि हे स्वरूपही स्थूल अर्थानेच मांडलेले असते. विशिष्ट समाजाच्या बाबतीत धार्मिक, सामाजिक, वैज्ञानिक, वाङ्मयीन, कलात्मक असे विविध अभिरुची भेद केले, तरी त्याचा वर्गसापेक्ष संकोच करता येत नाही.' अभिरुचीच्या संदर्भात सामाजिक घटिताच्या अनुषंगाने विचार करता एक अडचण जाणवते. ती म्हणजे सामाजिक घटकाची म्हणजे कोणत्या घटकाची, वर्गाची अभिरुची असादेखील प्रश्न निर्माण होतो म्हणून अभिरुचीच्या संदर्भात एकच एक भूमिका घेणेदेखील धोक्याचे असते. अर्थात आपण जेव्हा एका समाज गटाचा विचार करू तेव्हा त्यातील सामाजिक, धार्मिक, वैज्ञानिक, वाङ्मयीन या संदर्भातदेखील अभिरुचीत मतभिन्नता असल्याचे दिसून येते.

सामाजिक वर्गाच्या संदर्भात अभिरुचीचे स्वरूप भिन्न-भिन्न स्वरूपाचे जाणवते. अर्थात समाज गटाच्या राहणीमान, पोषाख, गृहरचना, भाषिक लकबी, खानपान याच्यातदेखील एकाच वर्गातील लोकामध्ये वेगळेपण जाणवते. हे जरी असले तरी वाङ्मयीन अभिरुचीच्या सदर्भात विचार करता ज्या समाजवर्गात वैचारिक अर्थात ज्ञानात्मक पातळीवरती आवड-निवड जोपासली जाते तेथे खऱ्या अर्थाने कलात्मक अभिरुचीचा विचार प्रस्तुत ठरतो. त्यातून कलात्मकतेकडे पाहण्याची सौंदर्यदृष्टीदेखील समाज वर्गापरत्वे वेगवेगळी अभिरुची जोपासताना दिसून येते. तरीदेखील कलाविषयक अभिरुचीला सामाजिक वर्गाचे अधिष्ठान असते. तसेच समाजात अभिरुची संदर्भात अनेकताही असते तीदेखील अभिरुचीचा विचार करताना स्वीकारावी लागते. समाजात अशी अभिरुची सर्जनशीलतेला एक खुले व मुक्त क्षेत्र उपलब्ध करून देते. ज्ञानविषयक व कलाविषयक अभिरुची भेददेखील संभवत असतात.

लेखक सतत सजग, जाणकार वाचकाच्या शोधात असतो. वाचन प्रक्रिया आणि लेखन यांचा अतूट असा संबंध असतो. एकमेकातून दोन्ही प्रक्रिया समृद्ध होण्याच्या प्रक्रियेत असतात. तसेच चांगल्या साहित्यातून वाचक पाहिजे तेवढे चांगले घेत असतो. अशातून आस्वाद घेण्याची क्षमता वाचकाने विकसित करायची असते. यातूनच वाचक वाचन समृद्ध करून स्वतःची अभिरुची विकसित करत असतो. 'आपली मानसिकता कोणत्या प्रकारच्या लेखनाशी सहज अशी जोडली जाते हे वाचकाने ओळखायचे असते. मनोरंजन, त्यापलीकडे बुद्धिरंजन व त्याही पलीकडे जाणारे अभिजात असे साहित्य शोधून त्यात रमणाऱ्या वाचकांचा अभिरुचीचा स्तर सतत सूक्ष्मपणाने वाढत जात असतो. वाचकाने आपली अभिरुची वाढवण्यासाठी काय केले पाहिजे याबाबत कोणतेही सोपे सूत्र नाही. वाढणारी अभिरुची ही सततच्या प्रक्रियेतून हळूहळू वाढत जाते. काही चिंतनातून. काही एक मशागतीतून वाचकाला आपली आवड विकसित करता येते. लेखकाला सहकार्य करीत वाचन प्रवास पुढे नेणे ही वाचकाची जबाबदारी आहे.' अर्थात वाचन प्रक्रियेतून वाचनाची आवड निर्माण होत असते. लेखक जसा आपली प्रवृत्ती पाहून लेखन करतो तशाच प्रकारे वाचन प्रक्रियादेखील घडत असते. अशातूनच उत्तर आधुनिक मराठी कादंबरीकारदेखील वाचकाला घडवण्याचा व वाचन अभिरुची विकसित करण्याचा प्रयत्न करत असतो, व तसेच चांगल्या लेखकाचा शोधदेखील सातत्याने घेत असतो. लेखक आणि वाचकाच्या नाते संबंधाचा विचार करता लेखक आपल्या निर्मितीच्या माध्यमातून व्यक्त होत असतो, तर वाचक आस्वादाच्या पातळीवरून विचार करतो. यातूनच लेखक वाचकाची दृष्टी वाढवू शकतो त्याचप्रमाणे लेखक वाचकाच्या क्षमतांचा विकासही करत असतो. अशा वेगवेगळ्या अनुषंगाने लेखक, वाचक आणि अभिरुची या संदर्भात

विचार करणे, स्थूलतेकडून द्रव्यरूपाकडे झालेला प्रवास समजून घेणे महत्त्वाचे आहे.

'एकूण साहित्यकृती समाज अभिरुचीत अंतर्भूत असते. साहित्यकृतीतील मर्माचा, सौंदर्याचा वेध घेण्याची क्षमता, आशय व अभिव्यक्ती यातील अद्वैत मान्य करूनही असे म्हणता येईल की, साहित्यकृतीत नेमके काय सांगितले आहे, आणि ते कसे सांगितले आहे. हे समजून घेण्याची पात्रता म्हणजेच साहित्यिक अभिरुची.' कलावंताने साहित्यकृतीत काय सांगितले आहे याचा उलगडा वाचक आपल्या क्षमतेनुसार करत असतो. तसेच कलाकृतीतील काही घटितांची वेगवेगळ्या क्षमतांच्या अनुषंगाने चिकित्सादेखील करतो. अर्थात साहित्यकृती समजून घेणे म्हणजेच वाङ्मयीन अभिरुची असे म्हणता येते. मानवी जीवन अनुभवातील खोली, व्यापकता आणि व्यामिश्रता या घटकांच्या अनुषंगाने वाङ्मयीन सौंदर्य निश्चित करता येते. वाङ्मयीन सौंदर्याचा आस्वाद व आकलन करून घेण्याची क्षमता वाचकाकडे असते. यातूनच वाचक साहित्यकृतीचा अर्थ लावत असतो. एकंदरीत अभिरुची म्हणजे कलाकृतीतील मर्म व सौंदर्य आत्मसात करण्याची क्षमता होय. तिचा संबंध हा माणसातील रसिकतेशी जोडला जातो. साहित्यकृती कशा पद्धतीने अभिव्यक्त होत असते, अर्थात आशय, भाषा, कालावकाश, वातावरण म्हणजेच कलाकृतीचा आशय आणि अभिव्यक्तीच्या अनुषंगाने वाचक पात्रता बाळगणे म्हणजेच अभिरुची होय.

नव्वदोत्तर कालखंडात अभिरुचीच्या संदर्भात विचार करता विशेषतः कादंबरी वाङ्मय प्रकाराच्या अनुषंगाने त्यातल्या त्यात उत्तर आधुनिक कादंबरीच्या बाबतीत वाङ्मयीन अभिरुची पाहताना विदारक स्वरूपाचे चित्र दिसून येते कारण हा कालखंड मुख्यतः विज्ञान, तंत्रज्ञान, औद्योगिकीकरण या क्रांतिकारक बदलांची नांदी म्हणून ओळखला जातो. यात कादंबरी वाचनाची अभिरुची बाळगणारा खूप कमी वर्ग दिसतो. याची कारणे समकालीन पर्यावरणात व समकालीन आर्थिक, सामाजिक, सांस्कृतिक बदलात तपासणे पोषक ठरेल. कादंबरीचा अवकाश हा मोठा असतो. त्यातल्या त्यात आज अभिरुचीचे केंद्र वाचनापेक्षा इतर घटकांकडे बदललेले दिसते. प्रसार माध्यमे व वर्तमानपत्रे यामुळे एकूण घटितांची नोंद घेऊ पाहणारा वाचक वर्ग वाढलेला दिसतो. ह्या घटितांतूनच अभिरुचीचे स्वरूप स्थित्यंतरीत होत आहे याचे चित्र स्पष्ट होते.

नव्वदोत्तर मराठी कादंबरीचा विचार करता विपुल प्रमाणात लेखन झाल्याचे दिसून येते; परंतु त्या तुलनेत उत्तर आधुनिक समजल्या जातील अशा कादंबऱ्या या काळात खूपच कमी सापडतात. त्यात अनिल दामले 'गौतमची गोष्ट', श्याम मनोहर 'कळ', 'खूप लोक आहेत', 'खेकसत म्हणणे आय लव्ह यू', मकरंद साठे 'अच्युत आठवले आणि आठवण', 'ऑपरेशन यमू', रंगनाथ पठारे 'नामुष्कीचे स्वगत', 'भर चौकातील अरण्यरुदन', विलास सारंग 'रुद्र', 'अमर्याद आहे बुद्ध', 'तंदुरच्या ठिणग्या', प्रवीण बांदेकर 'चाळेगत', विश्राम गुप्ते 'ईश्वर डॉट कॉम' इ. कादंबऱ्यांचा उल्लेख करता येईल. अर्थात या कादंबऱ्यांच्या अभिरुची संदर्भात शोध घेताना हाती खूप काही लागताना दिसत नाही. म्हणजेच अभिरुचीवर जेवढा ठसा उमटायला हवा तेवढा दिसत नाही. तरीदेखील एका विशिष्ट वर्गात ह्या कादंबऱ्यांच्या बाबतीत अभिरुची जोपासलेली दिसून येते.

अर्थातच अभिरुची नियत करण्यात त्या-त्या कालखंडाचा आणि त्या काळातील युगप्रवृत्तीचादेखील मोठा वाटा असतो. उत्तर आधुनिकतावाद हा तसा मराठी कादंबरीच्या संदर्भात १९९० नंतर आलेला दिसतो म्हणून ह्या विचारव्यूहाबरोबरच इतर सामाजिक, सांस्कृतिक आणि वाङ्मयीन घटितेदेखील अभिरुची नियत करण्यात महत्त्वाची भूमिका बजावत असतात. ह्या समकालीन घटितांतून मार्गक्रमण करत उत्तर आधुनिक मराठी कादंबरीच्या अनुषंगाने चिकित्सा करता अभिरुची संदर्भात पुसटशी रेषा अधोरेखित करता येऊ शकेल. पुसटशी जरी रेषा असली तरी या कालखंडाची म्हणून अभिरुची नियत करण्यासाठी वाङ्मयीन दृष्टीने तिचा वाटा महत्त्वाचा असल्याचे नाकारता येत नाही. नव्वदोत्तर अभिरुची नियत करणारे जे घटक आहेत त्याचे स्वरूप आज आमूलाग्र बदललेले दिसून येते आणि प्रत्येक कालखंडात हे स्वरूप सातत्याने बदलत असते. त्यामुळेच वाङ्मयीन अभिरुची नियत करणारे घटक जेवढे प्रबळ तेवढे वाङ्मयीन अभिरुचीचे स्वरूप व्यापक होत असते. सातत्याने चाललेला मराठी वाङ्मयातील अभिरुचीतील संघर्ष खऱ्या अर्थाने अभिरुची वाढवण्यास व समृद्ध करण्यास उपकारक ठरत असते. हा वाङ्मयीन अभिरुची संदर्भात

चाललेला निरंतर प्रवास असतो.

मराठी उत्तर आधुनिक कादंबरीच्या वाचन व्यवहाराचे व्यूह आपल्याला तपासायचे झाल्यास परत आपल्याला तेच म्हणावे लागते की, हा उत्तर आधुनिक कादंबरीच्या वाचन व्यवहाराचा व्यूह सामान्यीकरणाला खोडून काढतो. महत्त्वाच्या नसलेल्या गोष्टींच्या चर्चा या उत्तर आधुनिक कादंबरीतून आपल्या दृष्टिक्षेपास येताना दिसतात. कथानकात येणारे जे तपशील येतात ते फार गंभीरपणे घेण्याची वाचकाला आवश्यकता वाटत नाही कारण, त्याच्याही रोजच्या जगण्यात असे अनेक तपशील ठासून भरलेले आहेत, की जे फार महत्त्वाचे नाहीत. असे तपशील उत्तर आधुनिक कादंबरीच्या वाचन व्यवहाराचे व्यूह म्हणून आपण पाहणे आवश्यक ठरते. म्हणजेच एका घटनेचे ज्या वेळी लेखक वर्णन करतो, त्या वेळी त्याला गरज नसताना आणखी एक महत्त्वाची नसलेली घटना सांगावी लागते. हा उत्तर आधुनिकतेत असलेला वाचकाच्या किंवा सामान्य माणसाच्या जीवनातील एक व्यूह म्हणून आपण लक्षात घेणे गरजेचे आहेच. उदाहरणार्थ ईश्वर डॉट कॉम या कादंबरीतील मेंडीस पीन ड्रॉप सायलेन्सची प्रत्यक्षात शब्दश: पडताळणी करून पाहतो. या कादंबरीतील ब्रह्मास्त्रांचे प्रक्षेपण किंवा इतरही अनेक छोट्या छोट्या घटना ह्या अत्यंत छोट्या पातळीवर केलेल्या सामान्यीकरणातूनच घडत असतात आणि त्यातूनच वाचन व्यवहाराचे व्यूह आकाराला येतात. यातील तेलंगी पान टपरीवाला, मिलिट्री भरतीच्या ग्राऊंडवर भेटलेले लोक, त्याच्या मुलाची मैत्रीण, त्याचा वर्गमित्र जगन्नाथ न्हावी, इंटूक बंगाली लेखिका, पॅट्रिशिया रॉकहोल्डर या सगळ्यांपर्यंत त्याला काय म्हणायचंय हे नीट पोहचत नाही. त्यातही बऱ्याचदा त्याचे बोलणे अर्धवट पोहोचून त्यातून गैरसमज मात्र निर्माण होतात, आणि म्हणून भाषेद्वारे आशयाचे पूर्णत: नीट वहन होईलच याचा काही नेम नाही, अशी उत्तर आधुनिक भूमिकाच लेखकाने प्रयोगशील रीतीने मांडली आहे. शेवटी शेवटी हा निवेदक कुत्रा आणि कावळा यांच्याशी बोलायला लागतो. यातूनच त्या निवेदकाचा विक्षिप्तपणा आपल्याला दिसून येतो. एकूण इथे वाचन व्यवहाराची चर्चा करता आपल्याला जो व्यूह येथे लक्षात येतो त्याबाबत बोलायचे झाल्यास ही कादंबरीची; जशी एकूण तिच्या विषयाची; मांडणी वाचन व्यवहाराला धरूनच अपेक्षित आहे, असे म्हटले तरी वावगे ठरणारे नाही.

भोवतालचे वास्तव विखंडित आणि विसंगतीपूर्ण झालेले आहे, हे आधुनिकवादी नव कादंबरीनेही मांडले असले तरीही भोवतालाचा अनुभव देणारा 'स्व' जो आहे तो स्वसुद्धा विखंडित आणि विसंगतीपूर्णच असल्याची जाणीव उत्तर आधुनिक मराठी कादंबरीने व्यक्त केली आहे. मग या वाचन व्यवहाराला धरूनच काही मिथ कथा येतात. त्याही या उत्तर आधुनिक अनुषंगाने आपण पाहणे उचित ठरेल. या वाचन व्यवहाराच्या व्यूहाला घेऊनच आपण बोलायचे झाल्यास विलास सारंग यांच्या 'रुद्र' आणि 'अमर्याद' आहे बुद्ध या दोन्ही कादंबऱ्यांमध्ये आलेल्या आख्यायिकांचे स्थान महत्त्वाचे आहे. या कादंबऱ्यांमध्ये येणारी मिथके आणि आख्यायिका या प्राचीन काळापासून मानवी समाजाच्या समूह आणि मानसिकतेचाच एक भाग आहेत. उत्तर आधुनिक आधुनिकपूर्व जाणिवांनाही नव्याने समोर कशी आणते, हे समजून घेण्यासाठी विलास सारंगांच्या कादंबऱ्या मदत करतात. यातून जो वाचन व्यवहार उभा राहतो तो वास्तवतेला अद्भुत स्वरूपाचे नवे आयाम प्राप्त करून देतो. या कादंबऱ्यांतील वास्तव आणि कल्पित यांच्यातील सीमारेषा पुसट करण्यास मदत करतो.

तर 'गौतमची गोष्ट' मध्ये गौतम ही व्यक्तिरेखाच चार मित्रांच्या बोलण्यातून काल्पनिक पद्धतीने रचलेली आहे. कादंबरीचा शेवट हा वास्तविक असून इतर चार मित्र म्हणजे त्याच्या डोक्यातील काल्पनिक व्यक्तिरेखा आहेत की काय असा प्रश्न वाचकाला पडतो, त्यामुळे वास्तवाचे दोन स्तर यात येऊन, एका स्तराला वास्तव मानले, तर दुसरा स्तर हा कल्पित वास्तव ठरतो. अशा प्रकारे बहुस्तरीय, कल्पित, जादुई, अद्भुत आणि शंकास्पद मांडणी हे उत्तर आधुनिक मराठी कादंबरीचे लक्षण आहे. या लक्षणाकडेही आपण वाचन व्यवहाराचे एक अंग म्हणून व्यूहात्मक दृष्टीने पाहायला हवे आहे.

याबाबत आपण आनंद विनायक जातेगावकरांच्या 'अस्वस्थ वर्तमान' या कादंबरीचा उल्लेख येथे करणे गरजेचे आहे, असे वाटते. इतिहास आणि वर्तमान यांच्यातील सहसंबंध ती कादंबरी नव्याने शोधण्याचा प्रयत्न करते. ऐतिहासिक संहितांचे नव्याने अर्थ निर्णयन या कादंबरीत केलेले आहे. मिर्झा गालिब, बहादूरशहा जफर, शाहू

महाराज, लोकमान्य टिळक अशा अनेक ऐतिहासिक व्यक्तिरेखांविषयी या कादंबरीत भाष्ये करण्यात आली आहेत. इतिहासात ज्यांना हिरो मानले गेले, त्यांच्या दैवतीकरणाला नकार देऊन त्यांना माणूसपणाच्या अस्सल पातळीवर लेखकाने आणून सोडले आहे. त्यांचे राग, लोभ, मद, मोह आणि मत्सर यांनी स्पर्श झालेले आयुष्य मांडायचा लेखकाने केलेला प्रयत्न अनोखा आणि वेगळा आहे. एकाच कालखंडातील विविध व्यक्तींच्या जीवन जाणिवांबाबत ही कादंबरी आपल्याला येथे भाष्य करताना दिसते. यातून लेखकाला जे काही वाचकांना सांगायचे आहे ते आपल्या लक्षात येते. ऐतिहासिक व्यक्तींकडे एक सामान्य माणूस म्हणून पाहण्याचे जे मूल्यमापन जातेगावकर करतात त्याबाबतचे वाचकांचे अनेक व्यूह बदलण्यास किंवा विकसित होण्यास मदत होते.

'नामुष्कीचे स्वगत' या रंगनाथ पठारेंच्या कादंबरीतही इतिहासाचे अनेक दाखले निवेदकाने दिले आहेत. माणसाचे वर्तमान हे त्याच्या इतिहासानेच उभे झालेले दिसते. हा इतिहास कधी स्पष्ट झालेला असतो, तर कधी अस्पष्ट. वाचन व्यवहाराच्या बाबतीतील मुद्दा आपण येथे काही उदाहरणांच्या आधारे मांडण्याचा प्रयत्न केला.

विसाव्या शतकाच्या अखेरच्या दशकात प्रसिद्ध झालेल्या कादंबऱ्यांनी मराठी कादबरीच्या पारंपरिक संकेत व्यूहाच्या पलीकडे जाण्याचा प्रयत्न केला आहे. पारंपरिक मराठी कादंबरीचा संकेत व्यूह हा वास्तववादी दृष्टिकोनातून आकाराला आला होता. हा संकेत व्यूह बदलण्याचा प्रयत्न सत्तर-ऐंशीच्या दशकांत लिहिल्या गेलेल्या आधुनिकतावादी नव कादंबरीने केला. 'कोसला', 'सात सक्कं त्रेचाळीस', 'काळा सूर्य' या कादंबऱ्यांनी हे काम केले; परंतु त्या नंतरही मराठीमध्ये वास्तववादी कादंबरीचा प्रभाव राहिलाच आहे. वास्तववादाकडे आपण दोन अंगांनी पाहू शकतो. एक तात्त्विक भूमिका म्हणून आणि एक तांत्रिक भूमिका म्हणून. तात्त्विक वास्तववादाचे मूळ युरोपातील मानवतावादी विचारात आहे. प्रबोधन चळवळीच्या काळात हा विचार प्रस्थापित झाला. मानव विश्वाच्या केंद्रस्थानी आहे. तो भोवतालच्या विश्वाचे, त्याविषयीच्या सत्याचे ज्ञान करून घेऊ शकतो. विश्वाची पुनर्रचना अथवा पुनर्मांडणी करू शकतो. हे सर्व त्याला त्याच्या अंगी असलेल्या विवेकवादी विचारशक्तीने करणे शक्य होते. वास्तवावर मानवाची हुकूमत आहे. पूर्ण नियंत्रण आहे आणि त्याचा अर्थ लावण्याची, त्याला हवा तसा आकार देण्याची क्षमता मानवाच्या अंगी आहे, अशी धारणा या विचारामागे आहे. ही वास्तववादाची तात्त्विक बाजू. या बाजूत साहित्यात वास्तवाचे आकलन व त्याची पुनर्मांडणी करण्यासाठी अवलंबलेली तंत्रे म्हणजे वास्तववादी तंत्रे होय. उत्तर आधुनिक कादंबऱ्यांमध्ये वास्तववादी तंत्राला दूर लोटत नव्या तंत्रांचा वापर केला आहे. या तंत्रांमध्ये वाचन व्यवहारांचे विविध व्यूह समाविष्ट असलेले आपल्याला पाहावयास मिळतात. उदा. नामुष्कीचे स्वगतमध्ये आपण यापूर्वी पाहिल्याप्रमाणे वेगवेगळ्या काळातील पात्रे एकत्र येत आहेत. काळ आणि अवकाश या दोहोंनाही निवेदनाच्या तंत्रात बांधण्याचा येथे प्रयत्न होताना आपल्याला दिसून येतो.

आपण गौतमची गोष्ट या कादंबरीचे उदाहरण घेऊयात. कादंबरीची सुरुवातच, माझं नाव गौतम सहस्रबुद्धे. माझा जन्म वयाच्या पस्तिसाव्या वर्षी मुंबईतल्या एका पोलिस स्टेशनच्या लॉकअपमध्ये झाला. त्या वेळी माझ्या अंगावर खूप उंची, महागडा सूट होता. हातात सोन्याचा पट्टा असलेलं घड्याळ होतं. बोटात प्लॅटिनमची, मध्ये हिरा बसवलेली अंगठी होती. हे उघडच आहे की, माझ्या मामाचं नाव कंस नव्हतं. त्या माझ्या जन्माच्या अद्वितीय क्षणी माझे आईवडील कोण असावेत, हे ठरलं नव्हतं. एवढंच नव्हे, तर मला आईवडील असतील की नाही, हेही अनिर्णित होतं; पण, माझ्या पोटात एक बिअरची बाटली आणि अर्धी कोंबडी होती. यावरून आपल्या लक्षात येतं, की उत्तर आधुनिक कादंबरीच्या वाचन व्यवहाराचा व्यूह काय आहे ते. पारंपरिक अर्थाने वाचणाऱ्यांना ही सुरुवात अत्यंत अनोखी अशीच आहे. आपण वास्तववादाची या आधी जी चर्चा केली त्या अनुषंगाने याकडे पाहता मानवतावादाला जे काही तात्त्विक पाठबळ होते त्यातील सत्य जाणून घेत भोवतालच्या परिस्थितीमध्ये परिवर्तन घडवून आणण्याचा जो प्रयत्न होता त्यास उत्तर आधुनिक कादंबरीत तडा गेला, असेच आपल्याला येथे म्हणावे लागेल.

या उत्तर आधुनिक तत्त्वज्ञानात जो स्व येतो त्याचीच तर येथे चिरफाड केली गेलेली आपणास दिसून येते. हा उत्तर आधुनिकवादी कादंबरीचा विचारव्यूहच आहे असे आपल्याला येथे म्हणता येते. या वाचन व्यवहाराच्या व्यूहाकडे पाहिल्यास आपल्या असे लक्षात येते की,



अनुक्रमणिका

मानवी पातळीवर जी काही गोंधळाची स्थिती चालू आहे तिला किंवा एका विशिष्ट विवेकवादी वातावरणाला किंवा जी काही महापुरुषीय म्हणूनची विचारवंतांची संस्कृती उभी राहते तिलाच हा उत्तर आधुनिक कादबरीतील वाचन व्यवहाराचा व्यूह तडे लावतो आहे. उत्तर आधुनिक वाचन व्यवहाराच्या अनुषंगाने आपण असे म्हणू शकतो.

प्रयोगशीलता हे उत्तर आधुनिक कादंबरीचे महत्त्वाचे वैशिष्ट्य आहे. आतापर्यंत आपण ज्या कादंबऱ्यांचा येथे उल्लेख केला आहे, त्या कादंबऱ्यांची प्रयोगशीलता येथे तपासून पाहण्यासारखी आहे. ती प्रयोगशीलता वाचन व्यवहाराच्या अंगाने पाहणे महत्त्वाचे ठरते. खरंतर ही प्रयोगशीलता आपण पाहायची म्हटल्यावर आपल्याला असे म्हणावे लागते की, अनेक लेखक हे एकाच काळात लिहीत आहेत; परंतु जे तथाकथित संस्कार घेऊन काही लेखक लिहितात किंवा त्यांच्यावर ज्या काही वादांचा पगडा आपल्याला दिसतो तो उत्तर आधुनिक कादंबरीने मोडीत काढला आहे. श्याम मनोहर यांची 'खूप लोक आहेत', 'खेकसत म्हणणे आय लव्ह यू', भालचंद्र नेमाडे यांची 'हिंदू', विलास सारंग यांची 'तदूरच्या ठिणग्या', 'अमर्याद आहे बुद्ध', रंगनाथ पठारे यांची 'भर चौकातील अरण्यरुदन', 'नामुष्कीचे स्वगत', मकरंद साठे यांची 'अच्युत आठवले आणि आठवण', 'ऑपरेशन यमू', आनंद विनायक जातेगावकर यांची 'अस्वस्थ वर्तमान', राजन गवस यांची 'ब,बळीचा', प्रवीण बांदेकर यांची 'चाळेगत', रमेश इंगळे-उत्रादकर यांची 'सर्व प्रश्न अनिवार्य' या कादंबऱ्यांचा आपल्याला प्रयोगशीलतेच्या अंगाने विचार करावा लागेल. यातील कादंबऱ्यांना उत्तर आधुनिकतेचे तत्त्व जसेच्या तसे लागू पडेल असे काही नाही. काही कादंबऱ्यांना ते तंतोतंत बसेलही; परंतु गौतमची गोष्ट ही कादंबरी ज्या अर्थाने उत्तर आधुनिकता वादाचे सूचन करते तसे सूचन तंतोतंतपणे इतर कादबऱ्यांतून येईलच असे नाही. त्यात थोड्या मतभेदाच्या जागाही असतीलच; परंतु उत्तर आधुनिक प्रयोगशीलतेचे जे तत्त्व आपल्याला इथे या कादंबऱ्यांतून दृष्टीस पडते त्याबाबत इथे दुमत असण्याचे काहीही कारण नाही. या कादंबऱ्यांतून जो प्रयोगशीलतेतील असणारा व्यूह येथे निर्माण होतो आहे तो पाश्चात्त्य जगतात चालणाऱ्या उत्तर आधुनिक चर्चा विश्वाशी नाते सांगतो.

एकूण मराठी कादंबरी अभिरुची आणि राजकारण याचा विस्तृत अंगाने वरील काही मुद्द्यांच्या आधारे आपण विचार केला आहे. मराठी वाचन व्यवहारातील बरेचसे संकेत व्यूह उत्तर आधुनिक कादंबरी व्यवहारामुळे मोडीत निघाले आहेत. उत्तर आधुनिक कादंबरीची तिची तिची एक शैली आहे; परंतु तिचे तिचे असे एकात्मपणही आहे; परंतु अनेकविधतेला सामोरे जाताना परत पुन्हा मूल्याकडून मूल्यऱ्हासाच्या गोष्टीकडे हा प्रवास सुरू झालेला आपल्याला दिसतो आणि मराठी वाचन व्यवहाराला तो निश्चितच एक नवी दिशा देणारा आहे. या सर्व दृष्टिकोनातून आपण येथे चर्चा करण्याचा एक प्रयत्न केला आहेच. अर्थात त्यात आणखी काही गोष्टी येत राहतीलच. विषयाचा आवाका मोठा असल्याने ज्या मुद्द्यांची चर्चा इथे करायची आहे त्याची चर्चा आपण येथे करण्याचा प्रयत्न केला आहे.


संदर्भग्रंथ:

१. जोग. ग. श्री., मराठी वाङ्मयाभिरुचीचे विहंगमावलोकन, साधना प्रेस पुणे, प्रथमावृत्ती १९५९

२ सासणे भारत, लेखक, वाचक आणि अभिरुची, ललित वाचन संस्कृती विशेषांक, जानेवारी २०१३

३. कुलकर्णी गो. म., अभिरुची ग्रामीण व नागर, अ.भा. मराठी साहित्य संमेलन कऱ्हाड, प्रथमावृत्ती १९७६

४. पठारे रंगनाथ, आजची कादंबरी: नोंदी आणि निरीक्षणे, शब्दालय प्रकाशन, प्रथमावृत्ती २०१४

५. मालशे मिलिंद, जोशी अशोक, आधुनिक समीक्षा सिद्धांत, मौज प्रकाशन गृह मुंबई, द्वितीयावृत्ती २०१३

६. डहाके वसंत आबाजी व इतर संपा. वाङ्मयीन संज्ञा संकल्पना कोश, भटकळ फाउंडेशन, मुंबई २००१



**डॉ. गजानन भोसले**

मराठी विभाग सावित्रीबाई फुले पुणे विद्यापीठ, पुणे-७

चलभाष: ९७३०१६१३०४






मराठी साहित्य विश्वातील प्रकाशन संस्था व साहित्य व्यवहारावर भाष्य करणारा लेख.

# प्रकाशन संस्था व साहित्य व्यवहार

प्रा. नंदकुमार भाऊसाहेब उदार

वाचक हा साहित्यव्यवहारातील महत्त्वाचा घटक असला तरीसुद्धा वाचक, लेखक व पुस्तक यामध्ये अनेक घटक असतात. त्यातीलच एक महत्त्वाचा घटक म्हणजे प्रकाशक हा होय. हा प्रकाशकही शेवटी समाजाचाच घटक असतो. समाज व संस्कृतीचे त्याच्याही व्यक्तिमत्त्वावर बरेवाईट परिणाम झालेले असतात, त्यामुळे त्याचा पुस्तक, लेखक यांच्या निवडीवर परिणाम होऊ शकतो, हे गृहीत धरून एक गोष्ट निश्चितपणे सांगता येते, ती म्हणजे प्रकाशक पुस्तकाची निर्मिती करतो. लेखकाकडून तो हस्तलिखित घेतो आणि पुस्तक निर्माण करतो. हे करताना प्रकाशक अनेक घटकांची मदत घेत असतो, त्यासाठी प्रकाशक काही रक्कम या व्यवहारांत गुंतवित असतो. म्हणजेच लेखकाकडून साहित्यकृतीचे हस्तलिखित घेऊन तो मुद्रणालयापासून ते चित्रकारापर्यंत अनेकांशी संपर्क साधतो व पुस्तकाची निर्मिती करतो. या पुस्तकनिर्मितीत त्याने काही आर्थिक गुंतवणूक केलेली असते. म्हणजेच वाचकाला प्रथमदर्शनीच त्या पुस्तकाने प्रभावित केले पाहिजे अशा तऱ्हेने प्रकाशकाने पुस्तक तयार केलेले असते. साहित्यव्यवहारात लेखकाने निर्माण केलेली साहित्यकृती वाचकांपर्यंत पोहोचविण्यासाठी प्रकाशक महत्त्वाची भूमिका बजावत असतो.

लेखक हा त्याच्या जीवनानुभवाच्या आधारे वास्तव व कल्पिताचा मेळ घालून साहित्यकृतीची निर्मिती करत असतो. साहित्याची निर्मितीप्रक्रिया पूर्ण झाल्यावर ती कलाकृती वाचकांपर्यंत पोहोचावी, वाचकांनी तिला प्रतिसाद द्यावा अशी त्याची मनोमन इच्छा असते. त्यामुळे सदर कलाकृती प्रकाशित करण्यासाठी लेखक प्रकाशकाची मदत घेतो. यासंदर्भात डॉ. नागनाथ कोत्तापल्ले म्हणतात, 'जेव्हा एखादे हस्तलिखित मुद्रित होऊन वाचकांपर्यंत जाते, तेव्हाही अनेक गोष्टी घडत असतात. एकतर मुद्रणव्यवस्था हवीच असते. दुसरे म्हणजे प्रकाशक नावाची एक व्यक्ती किंवा संस्था अस्तित्वात येते. प्रकाशक हा लेखक व वाचक यांचा मध्यस्थ असतो. म्हणजे तो ते पुस्तक लेखकांकडून घेऊन (स्वामित्व धन देऊन किंवा न देताच) मुद्रणालयातून छापून घेऊन बाजारात पाठवित असतो तेव्हा स्वाभाविकपणेच प्रकाशक या सगळ्या व्यवहारात पैसे गुंतवित असतो.' (कधीकधी लेखकही गुंतवितात किंवा स्वतःच प्रकाशक होतात.) त्यामुळे ते पैसे कसे वसूल होतील याची चिंताही त्याला असतेच. त्यासाठी बाजारावर, विक्रेत्यांवर अवलंबून राहावे लागते. आता पुस्तक नावाची गोष्ट बाजारातील वस्तू झालेली असते. म्हणजे सरस्वतीच्या दरबारात वावरणाऱ्यांना लक्ष्मीच्या दारात फेऱ्या माराव्या लागतात. शिवाय वाचकांच्या खिशात पैसे असले तरच



अनुक्रमणिका

पुस्तक घेता येईल. तत्त्वतः वाचता येण्याची परिस्थिती निर्माण झालेली असूनसुद्धा अर्थकारणामुळे त्यावर मर्यादा येऊ शकतात. म्हणजेच लेखकाने निव्वळ साहित्यकृतीची निर्मिती करून भागत नाही, तर ती कलाकृती प्रकाशित करण्यासाठी लेखक-प्रकाशकाने पैसे गुंतवलेले असतात. त्या गुंतवलेल्या पैशांची वेळेत वसुली व्हावी, त्यातून काही नफा मिळावा अशीही प्रकाशकाची अपेक्षा असते. त्यासाठी तो सदर पुस्तक अधिकाधिक आकर्षक कसे होईल हे पाहतो. वाचकाच्या पसंतीस उतरण्यासाठी जे जे करणे आवश्यक असते त्या सर्व गोष्टी प्रकाशक करत असतो. नव्या काळात नुसते पुस्तक प्रकाशित करून चालत नाही. त्यासाठी ते बाजारात उठून दिसेल अशा पद्धतीने प्रकाशित करावे लागते. म्हणजे मुळात ते पुस्तक चांगले आहे, विकले जाईल अशी खात्री प्रकाशकाला वाटली पाहिजे. त्या दृष्टीने तो पुस्तकांची निवड करतो. आता ते पुस्तक चांगले आहे, महत्त्वाचे आहे, असे त्याचे मत असते. (कधी कधी त्या प्रकाशकांसाठी काम करणाऱ्या संपादकांचे) गमतीची गोष्ट म्हणजे पुस्तक कोणत्या प्रकाशकाने प्रकाशित केलेले आहे, याला महत्त्व प्राप्त होत जाते. कधी कधी त्या प्रकाशनामागे असणाऱ्या संपादकाचाच अधिक दबदबा असतो. वाचक म्हणायला लागतात, अमूक एका प्रकाशनसंस्थेने पुस्तक प्रकाशित केलेले आहे, तेथे तमूक तमूक तज्ज्ञ आहेत, तेव्हा ते पुस्तक चांगलेच असले पाहिजे. म्हणजे त्या पुस्तकाने अर्धी लढाई जिंकलेली असते. याचा आणखी एक परिणाम म्हणजे फारसे नाव माहीत नसलेल्या प्रकाशकाने पुस्तक प्रकाशित केलेले असेल, तर मग ते कितीही महत्त्वाचे असो, त्याकडे वाचक वळत नाही. ते पुस्तक वाचले जावे, यासाठी खूप काळ जावा लागतो. तरीही बाजारपेठेत आपल्या प्रकाशनसंस्थेने प्रकाशित केलेले पुस्तक उठून दिसण्यासाठी सारेच प्रकाशक धडपडत असतात. मजकूर चांगला आहे याची त्यांना खात्री असते. मग उत्तम मुखपृष्ठ, नीटनेटकी माडणी, पुस्तकात नेमके काय आहे हे सागणारे ब्लर्ब, उत्तम छपाई, चांगला कागद अशा सगळ्या जामानिम्यासह पुस्तक बाजारपेठेत आले पाहिजे अशी काळजी सध्या सगळेच प्रकाशक घेत आहेत. अत्याधुनिक तंत्रज्ञान अगदी छोट्या गावांपर्यंत पोहोचल्यामुळेही साऱ्या प्रकाशकांना हे शक्य होत आहे किंवा बहुतेक सारे प्रकाशक उत्तम मुद्रणालयाची निवड करतात. म्हणजेच अमूक एक प्रकाशनसंस्था गुणवत्तापूर्ण दर्जेदार पुस्तके प्रकाशित करते अशी धारणा वाचकाची असते. म्हणजे अमुक एक प्रकाशनसंस्था दर्जेदार आहे, अशा वाचकाचा दृष्टिकोन असतो. अशा प्रकाशनसंस्थेने एखादे पुस्तक प्रकाशित करण्यास लेखकाला होकार दिला की, लेखक त्याच्या पुस्तक प्रसिद्धीची अर्धी लढाई जिंकलेला असतो. म्हणजेच वाचकाच्या दृष्टीने निश्चित झालेला प्रकाशनसंस्थेचा दर्जा साहित्यव्यवहारावर परिणाम करत असतो. वाचक (आणि समीक्षकही) प्रकाशकांमध्ये काही क्रमवारी मनोमन लावतो. त्यासाठी त्याच्याकडे काही शास्त्रीय आधार असतो असे नाही पण तो क्रमवारी लावतो हे मात्र खरे. प्रतिष्ठित, उच्च प्रतीची पुस्तके प्रकाशित करणारे, मध्यम प्रतीची पुस्तके प्रकाशित करणारे, विकाऊ पुस्तके प्रकाशित करणारे अशी एक प्रतवारी केली जाते. पुस्तकांच्या बाजारपेठेत जेव्हा आपण फिरायला लागतो, तेव्हा ही क्रमवारी कुठेतरी विक्रेत्यांच्या, वाचकांच्या मनात आहे असे जाणवते. यावर मात करण्यासाठी प्रकाशक काही मार्ग अवलंबितात. म्हणजे पोस्टर छापून पुस्तक-विक्रीच्या ठिकाणी लावणे, वर्तमानपत्रामधून जाहिराती देणे (ज्या अतिशय खर्चिक असतात. ज्या प्रकाशकाची आर्थिक परिस्थिती बरी नाही ते वर्तमानपत्रांना जाहिराती देण्याचा विचारही करू शकत नाहीत.) ग्रंथव्यवहारासाठी जी नियतकालिके असतात (जी तुलनेने कमी पैसे घेतात) तेथे जाहिराती देणे, मित्र मंडळींना सांगून ग्रंथालयातून पुस्तके विकली जातील असे पाहणे असे काही मार्ग प्रकाशक मंडळी हाताळीत असतात, काही फिरते विक्रेते ठेवतात. काही प्रकाशकांनी त्यांच्या प्रकाशनसंस्थेची मुखपत्रे सुरू केलेली असतात. हे सगळेच मार्ग तसे अवघड असल्यामुळे नव्या प्रकाशकांना ते चोखाळणे शक्य होत नाही. परिणामी या प्रकाशकांनी कितीही महत्त्वाची पुस्तके काढलेली असली तरी त्यांची चर्चा फारशी होत नाही. एक प्रकारे या प्रकाशकांकडून जी पुस्तके प्रकाशित केली जातात मग ती कितीही महत्त्वाची, प्रायोगिक असोत त्यांची चर्चा होईलच असे नाही. पुस्तकांच्या बाजारातही ही पुस्तके खपणे, खपवणे अतिशय अवघड जाते. प्रकाशनसंस्था पुस्तक प्रकाशित करते तेव्हा ते पुस्तक

**बाजारपेठेत आपल्या प्रकाशनसंस्थेने प्रकाशित केलेले पुस्तक उठून दिसण्यासाठी सारेच प्रकाशक धडपडत असतात. मजकूर चांगला आहे याची त्यांना खात्री असते. मग उत्तम मुखपृष्ठ, नीटनेटकी मांडणी, पुस्तकात नेमके काय आहे हे सांगणारे ब्लर्ब, उत्तम छपाई, चांगला कागद अशा सगळ्या जामानिम्यासह पुस्तक बाजारपेठेत आले पाहिजे अशी काळजी सध्या सगळेच प्रकाशक घेत आहेत. अत्याधुनिक तंत्रज्ञान अगदी छोट्या गावांपर्यंत पोहोचल्यामुळेही साऱ्या प्रकाशकांना हे शक्य होत आहे किंवा बहुतेक सारे प्रकाशक उत्तम मुद्रणालयाची निवड करतात.**

वाचकांपर्यंत पोहोचविण्यासाठी पोस्टर छापणे, वृत्तपत्रांतून जाहिराती देणे, वाङ्मयीन नियतकालिकांत जाहिराती देणे या माध्यमांतून पुस्तकाची प्रसिद्धी काही प्रस्थापित करत असतात; पण ज्या प्रकाशनसंस्था नव्याने सुरू झालेल्या असतात त्यांना या सर्व बाबी करणे शक्य नसते, त्यामुळे नव्याने प्रकाशन व्यवसायात आलेल्या प्रकाशनसंस्थांना पुस्तक प्रसिद्धीचे उपक्रम राबविणे शक्य नसते. परिणामी एखादे पुस्तक कितीही महत्त्वाचे असले तरीही ते दुर्लक्षिले जाण्याची शक्यता निर्माण होते.

समाजात जितके लोक राहात असतात त्या प्रत्येकाचे विचार, आवडी-निवडी भिन्न असतात तसेच समाजाकडे पाहण्याचा दृष्टिकोनही वेगळा असतो. याप्रकारे अनेक प्रकाशनसंस्था वेगवेगळ्या विषयांवरती पुस्तके प्रकाशित करत असतात. त्या सर्व विषयांच्या पुस्तकांना मागणी असतेच असे नाही. त्यातील काही पुस्तकांचा लक्षणीय खप होतो; पण काही पुस्तके दर्जेदार असूनही दुर्लक्षित राहण्याची शक्यता असते. प्रकाशक आणि पुस्तक विक्रेते यांच्या म्हणण्याप्रमाणे जीवनोपयोगी पुस्तकांचा खप वाढला आहे (ते स्वाभाविकच म्हणायला हवे कारण लोकांना वेगवेगळ्या कारणांसाठी अशी पुस्तके हवी असतात.) वेगवेगळ्या कारणासाठी अनुवादित पुस्तकेही विकत घेतली जातात. मराठी ललित लेखकांनी विचार करावा, आत्मपरीक्षण करावे असा हा मुद्दा आहे. चरित्र, आत्मचरित्र, प्रवासवर्णने या साहित्याच्या सीमारेषांवर वावरणाऱ्या पुस्तकांचाही खप पुष्कळच आहे. खरा प्रश्न मराठीतील ललित वाङ्मयासंबंधीचा आहे, असेही प्रकाशक आणि पुस्तक विक्रेते सांगतात, ही चिंता वाटावी अशी गोष्ट आहे. कोणतेही ललित वाङ्मय त्या त्या भाषिक समाजाच्या प्रश्नांचे दर्शन घडविणारे असते. जर त्या त्या समाजाचे स्वरूप समजावून घ्यायचे असेल, तर ललित साहित्य वाचणे आवश्यक असते. या साहित्यातून लेखकाची निर्मितिशीलता, सामाजिक भान प्रकट होत जातेच. त्यामुळे निर्मितिशीलतेच्या दृष्टीने ललित साहित्य वाचले जाणे महत्त्वाचे असते; परंतु ललित साहित्याचा खप इतर पुस्तकांच्या तुलनेने खूपच कमी असल्याचे निरीक्षण प्रकाशक नोंदवतात. मराठीतील ललित साहित्य किती वाचले जाते हा खरा महत्त्वाचा प्रश्न आहे. ते कमी वाचले जाते, असे अनुमान करता येऊ शकते. आपण म्हणतो की, पूर्वीच्या वाचकांच्या संख्येपेक्षा आजची वाचकांची संख्या अधिक वाढली आहे. या दोन बाबींचा ताळमेळ कसा घालायचा हा महत्त्वाचा प्रश्न आहे, आणि त्याचे थोडक्यात उत्तर द्यायचे तर असे म्हणता येईल की, पूर्वीच्या तुलनेत वाचकांचे प्रमाण वाढले; पण उच्च शिक्षणाचा, साक्षरतेचा जेवढा प्रसार झाला, त्या तुलनेत वाचकांचे प्रमाण मात्र नगण्यच आहे असे म्हणावे लागते. तर्क लावून विचार करायचा किंवा अंदाज बांधायचा, तर असे म्हणता येईल की, वाचकांच्या टक्केवारीत फार वाढ झाली नाही. आता हे जे कोणी थोडेसे वाचक आहेत, ते प्रामुख्याने ऐतिहासिक, पौराणिक स्वरूपाचे ललित साहित्य वाचतात. आजसुद्धा स्वामी, ययाती, मृत्युंजय, मंत्रावेगळा अशा कादंबऱ्या खपत असतील, तर या वाचनाबद्दलही चिंता करावी अशी परिस्थिती आहे. भालचंद्र नेमाडे यांच्या कोसलाच्याही आवृत्त्या निघत आहेत, ही त्यातल्या त्यात चांगली गोष्ट आहे; परंतु धग, माणूस, चक्र, या कादंबऱ्याही महत्त्वाच्या आहेत. इतरही अनेक महत्त्वाच्या कलाकृतींचा निर्देश करता येईल. या पुस्तकांचे नेमके किती वाचक आहेत, हे कळायला मार्ग नाही. अर्थात एक गोष्ट लक्षात ठेवली पाहिजे की, काही कालावधीत नवे लेखक आणि नव्या











साहित्यकृती येत असतात. त्यामुळे आधी प्रकाशित झालेली काही पुस्तके बाजूला पडणे गृहीतच असते म्हणून दुसरी आवृत्ती काढायला प्रकाशक फारसे तयार नसतात, ते यामुळेच. नाहीतरी सध्यासुद्धा हजार प्रतींची आवृत्ती संपायला पूर्वीप्रमाणेच पाचेक वर्षे लागतातच. इ. स. १९७५ पूर्वी जितकी वाचकांची संख्या होती त्या तुलनेत आज वाचकांची संख्या वरवर पाहता वाढलेली दिसत असली तरीसुद्धा इ. स. १९७५ नंतर शिक्षणाचा जितका विस्तार झाला त्या तुलनेत वाचक वाढल्याचे दिसत नाहीत. तसेच आजही पौराणिक स्वरूपाचे ललित साहित्य वाचणाऱ्या वाचकांची संख्या जास्त आहे. त्या तुलनेत समाजाचे व माणसांचे प्रश्न मांडणारे ललित साहित्य कमी वाचले जाते. अशा पुस्तकांचा खप व्हावा, यासाठी प्रकाशक विविध योजना राबवत असतो. पुस्तकांचा खप व्हावा यासाठी कधी कधी लेखकाला पुस्तकांच्या दुकानात (स्वतःच्या किंवा इतरांच्या) बसवतो. अमूक दिवशी पुस्तक घेतल्यास लेखकाची स्वाक्षरी मिळेल असे प्रलोभन वाचकांना-ग्राहकांना दाखविण्यात येते. पुष्कळ वाचकांच्या मनात लेखकाविषयी प्रेमभाव, आदरभाव क्वचित भक्तिभाव असल्यामुळे तो त्या दिवशी लेखकाच्या स्वाक्षरीसह पुस्तक घेतो, (अर्थात अशा योजनेत क्वचितच वैचारिक किंवा समीक्षेची पुस्तके घेतली जातात.) क्वचित होणाऱ्या प्रकाशन समारंभात प्रकाशक सवलतीच्या दरात पुस्तक देण्याची घोषणा करतात. तेथे काही पुस्तकांची विक्री होते, होऊ शकते. असे काही प्रसंग सोडले, तर लेखक आणि बाजारपेठ यांचा संबंध येत नाही; पण अशा प्रसंगांतून लेखकाचा दबदबा वाढण्यास मदत होते आणि त्याचा वाचकाच्या मनावर परिणाम होऊन पुस्तक-विक्री वाढू शकते. लेखक हा कलावंत असतो. तो आपल्या प्रतिभाशक्तीच्या व कल्पनाशक्तीच्या सामर्थ्याने साहित्यकृतीची निर्मिती करत असतो. वाचकालाही लेखकाच्या व्यक्तिमत्त्वाबद्दल कुतूहल असते. प्रत्यक्षात लेखकाला भेटावे, त्याच्याशी संवाद साधावा, साहित्यकृतीच्या निर्मितीप्रक्रियेबद्दल जाणून घ्यावे अशी वाचकाची इच्छा असते. जेव्हा प्रकाशक प्रकाशनसंस्थेत लेखकभेटीची योजना राबवतो तेव्हा वाचक त्या निमित्ताने प्रकाशन संस्थेला भेट देऊन लेखकाशी संवाद साधतो व त्याच्या वाङ्मयीन भूमिकेबद्दल जाणून घेतो व पुस्तक खरेदीही करतो.

लेखक जेव्हा साहित्यकृतीची निर्मिती करतो तेव्हा ती साहित्यकृती प्रकाशित व्हावी, ती वाचकांपर्यंत पोहोचावी. वाचकांनी तिला प्रतिसाद द्यावा अशी लेखकाची इच्छा असते. विशेषतः नवोदित लेखकाला प्रकाशनव्यवहाराबद्दल जर विशेष माहिती नसेल, तर तो प्रकाशन संस्थेचे साहित्यव्यवहारात काय स्थान आहे हे जाणून न घेता आपले पुस्तक त्या प्रकाशनसंस्थेकडे प्रकाशित करण्यासाठी देतो. काही लेखक मात्र प्रकाशक कोण आहे, त्याची बाजारातील प्रतिमा काय आहे, याचा विचार न करता आपली पुस्तके कोणत्याही प्रकाशकास देतात. परिणामी एकूण ग्रंथव्यवहारात त्यांच्या पुस्तकाची चर्चा होण्याची शक्यता कमी असते. एवढेच काय, त्यांच्या लेखकपणाबद्दलही शंका घेतली जाते. त्याचे कारण त्या लेखकाची पुस्तके बाजारात मिळत नाहीत, खरे म्हणजे पुस्तक कोणत्या प्रकाशकाने काढले आहे, यापेक्षा ते कसे आहे, ते वाचून वाचकाने, समीक्षकाने ठरविले पाहिजे; परंतु मराठी साहित्य जगतासाठी तरी तो दिवस खूप दूर आहे, असे म्हणावे लागते! एखादी प्रकाशनसंस्था नव्याने प्रकाशन व्यवसायात आली असेल, तर तिच्याबद्दल वाचकांच्या मनात अनेक प्रश्न असतात. तसेच त्या प्रकाशनसंस्थेच्या पुस्तक वितरण व प्रसिद्धीच्या मर्यादा असतील, तर अशी पुस्तके कितीही श्रेष्ठ दर्जाची असली तरीसुद्धा दुर्लक्षित राहण्याची शक्यता अधिक आहे. वाचकही प्रकाशनसंस्थेच्या नावाचा विचार करून लेखक व त्याच्या साहित्यकृतीचे (न वाचताच) मूल्यमापन करत असेल, तर असा लेखक व साहित्यकृती साहित्यव्यवहारात दुर्लक्षित राहतात.

कोणत्या पुस्तकांना वाचकांचा प्रतिसाद चांगला असतो याची कल्पना प्रकाशकांना असते. विशेषतः मराठी वाचक पौराणिक व ऐतिहासिक साहित्य अधिक वाचताना दिसतात. प्रकाशकाचा आणि बाजारपेठेचा रोजचाच संबंध असतो. कोणती पुस्तके वाचली जातात, कोणती पुस्तके वाचली जाऊ शकतात याचा काही अंदाज प्रकाशकांना येत असतो. विशेषतः मराठी वाचक प्रामुख्याने पौराणिक, ऐतिहासिक साहित्य वाचतो. त्यातही त्याला काही नवा दृष्टिकोन नको असतो. प्राचीन काळापासून चालत आलेला दृष्टिकोन असेल, तर अधिक

बरे असा विचार करणारा असतो. अशा वाचकांसाठी जुनी व नवी अशी बरीच पुस्तके बाजारात असतात. यापेक्षा काही नवे प्रकाशित करावे असा विचार करणारे प्रकाशकही असतात. वेगळा दृष्टिकोन असणारी पुस्तके कमी वाचली जातात असाही अनुभव सांगितला जातो. रणांगण आणि कोसला या दोन कादंबऱ्या पहिली दहा-बारा वर्षे फारशा खपल्याच नाहीत असे सांगितले जाते. वाचक हासुद्धा समाजात राहतो. समाजातील परंपरा, चालीरीती, संस्कृती यांचा त्याच्या व्यक्तिमत्त्वावर बरा-वाईट परिणाम होत असतो. ज्या सामाजिक परंपरांच्या संस्कारातून वाचकाच्या व्यक्तिमत्त्वाची जडण-घडण झालेली असते. त्याच विचारांचे साहित्य वाचकाला वाचावेसे वाटते, त्यामुळे पौराणिक व ऐतिहासिक साहित्य वाचण्यास वाचक प्राधान्य देतो. जे साहित्य सामाजिक प्रश्नांना हात घालते, वाचकांना नवा दृष्टिकोन देऊ पाहते अशा साहित्याकडे वाचक दुर्लक्ष करतात. म्हणजेच सामाजिक संस्कारांचा प्रभाव वाचकाच्या व्यक्तिमत्त्वावर पडल्यामुळे वाचक पारंपरिक साहित्य वाचनालाच प्रतिसाद देताना दिसतात. त्यामुळे नव्या दृष्टिकोनाचे साहित्य कितीही दर्जेदार असले तरी वाचक अशा साहित्याला प्रतिसाद देत नाहीत. तेव्हा प्रकाशकही असे साहित्य प्रकाशित करण्यास फारसे उत्सुक नसतात. तेव्हा लेखक किंवा लेखकाचे कुटुंबीय त्याची पुस्तके स्वतः प्रकाशित करून थेट वाचकांपर्यंत पोहोचवण्याचा प्रयत्न करत असतात. कधी कधी एखाद्या लेखकाचे कुटुंबीय त्यांची पुस्तके प्रकाशित करत असतात. रा. ना. चव्हाण हे महाराष्ट्रातील एक महत्त्वाचे परिवर्तनवादी विचारवंत. त्यांनी आयुष्यभर प्रबोधनात्मक लेखन केले. वाई येथे असणाऱ्या रा. ना. चव्हाण यांनी आयुष्यभर एकच ध्यास घेतला होता. तो म्हणजे शोषितांची मुक्ती. जवळजवळ ६० वर्षे ते लिहीत होते; परंतु त्यांच्या हयातीत त्यांचे केवळ एक पुस्तक प्रकाशित होऊ शकले. त्यांच्या निधनानंतर त्यांचे चिरंजीव श्री. रमेश चव्हाण आणि त्यांच्या पत्नी वैशाली रमेश चव्हाण हे एखादे व्रत घेतल्यासारखे रा. ना. चव्हाण यांचे लेखन ग्रंथरूपाने प्रकाशित करीत आहेत. आत्तापर्यंत त्यांनी रा. ना. चव्हाण यांची ३५ पुस्तके प्रकाशित केली आहेत. अशी उदाहरणे दुर्मिळच असतात. असा सगळा मराठी प्रकाशनाचा व्याप आहे. त्यात

**आजही पौराणिक स्वरूपाचे ललित साहित्य वाचणाऱ्या वाचकांची संख्या जास्त आहे. त्या तुलनेत समाजाचे व माणसांचे प्रश्न मांडणारे ललित साहित्य कमी वाचले जाते. अशा पुस्तकांचा खप व्हावा, यासाठी प्रकाशक विविध योजना राबवत असतो. पुस्तकांचा खप व्हावा यासाठी कधी कधी लेखकाला पुस्तकांच्या दुकानात (स्वत:च्या किंवा इतरांच्या) बसवतो. अमूक दिवशी पुस्तक घेतल्यास लेखकाची स्वाक्षरी मिळेल असे प्रलोभन वाचकांना-ग्राहकांना दाखविण्यात येते. पुष्कळ वाचकांच्या मनात लेखकाविषयी प्रेमभाव, आदरभाव क्वचित भक्तिभाव असल्यामुळे तो त्या दिवशी लेखकाच्या स्वाक्षरीसह पुस्तक घेतो,**

वैयक्तिक पुस्तके प्रकाशित करणारे असतातच. वैचारिक साहित्य हे वाचकांच्या विचारांना थेट चालना देत असते. अशा साहित्यातून व्यक्त होणारे विचार तर्काधिष्ठित असतात. अशा साहित्याला वाचकांचा पुरेसा प्रतिसाद मिळत नसल्यामुळे प्रकाशनसंस्था अशी पुस्तके प्रकाशित करण्यास उत्सुक नसतात. त्यामुळे लेखक व त्याचे कुटुंबीयच स्वतः पुढाकार घेऊन पुस्तक प्रकाशित करतात तसेच वितरणही स्वतः करून वाचकांपर्यंत पोहोचवत असतात. अलीकडे महाराष्ट्र शासनाच्या वतीने वैचारिक व शास्त्रीय व विषयांवरील पुस्तके प्रकाशित होताना दिसतात.

एकेकाळी पुणे आणि मुंबई येथेच प्रकाशनाचा व्यवसाय करणाऱ्या प्रकाशनसंस्था होत्या; परंतु अलीकडे प्रकाशनसंस्थांची संख्याही खूप वाढली आहे. राज्याच्या जवळजवळ प्रत्येक जिल्ह्यांत प्रकाशनसंस्था असल्याचे दिसून येते. एकेकाळी फक्त पुणे आणि मुंबई येथेच प्रकाशनाचा व्यवसाय करणाऱ्या प्रकाशनसंस्था होत्या. त्यांची संख्याही अगदीच हाताच्या बोटावर मोजता येईल एवढीच होती. आज उत्तमातील उत्तम आणि दर्जेदार पुस्तके प्रकाशित करणाऱ्या प्रकाशकांची संख्या खूप

वाढली आहे. ज्या पुणे आणि मुंबईत मर्यादित प्रकाशक होते. (कारण लेखक आणि वाचकही मर्यादित होते.) महाराष्ट्राच्या सर्व भागांमध्ये दर्जेदार पुस्तके प्रकाशित करणाऱ्या प्रकाशनसंस्था निर्माण झाल्या आहेत. औरंगाबाद, नाशिक, नागपूर, अमरावती, नांदेड, कोल्हापूर, सातारा अशा शहरांमधून पुस्तके प्रकाशित होत आहेत. याशिवाय विशिष्ट हेतूने निर्माण झालेल्या प्रकाशनसंस्था असतात. उदा. अंधश्रद्धा निर्मूलनाचे काम करणाऱ्या पुस्तकांचे प्रकाशन करणारी एक स्वतत्र प्रकाशनसंस्था आहे. वेगवेगळ्या प्रकारचे कोश प्रकाशित करणे त्या त्या भाषेसाठी आवश्यक असते; परंतु असे कोश प्रकाशित करण्यास प्रकाशक फारसे उत्सुक नसतात. तेव्हा त्यांच्या प्रकाशनासाठी कोशकर्त्यांनाच पुढाकार घ्यावा लागतो. अशा प्रकारचे ज्ञानकोश (श्री. व्यं. केतकर), संस्कृतिकोश (पं. महादेवशास्त्री जोशी), चरित्रकोश (चित्रावशास्त्री), समाजविज्ञान कोश (स. मा. गर्गे), कृषिविज्ञान कोश (जोशी) हे आणि यांसारखे इतर कोश प्रकाशित करण्यासाठी त्या त्या मान्यवरांनी पुढाकार घेत स्वतःच्याच प्रकाशनसंस्था सुरू केल्या. याशिवाय काही मान्यवर लेखक केवळ स्वतःची पुस्तके प्रकाशित करण्यासाठी स्वतंत्र प्रकाशनसस्था काढतात आणि ते स्वतंत्रपणे विक्री करतात. पूर्णवेळ प्रकाशक जसे आहेत, त्याप्रमाणे इतर व्यवसाय करणाऱ्या काही मान्यवरांनी प्रकाशनसंस्था सुरू केल्या आहेत. याशिवाय काही वर्तमानपत्रांच्याही प्रकाशन संस्था आहेत. म्हणजेच प्रारंभीच्या काळात ग्रंथव्यवहार हा मर्यादित स्वरूपात होता. त्यामुळे पुणे, मुंबईसारख्या शहरांमध्येच प्रकाशनसंस्था कार्यरत होत्या; परंतु जसजसे शिक्षणाचे प्रमाण वाढत गेले तसतसा साहित्यव्यवहारही विस्तारल्याचे दिसते. शिक्षणामुळे ग्रामीण भागात हळूहळू वाचकवर्ग निर्माण होत आहे, वाढतो आहे. म्हणजे पुस्तकांची बाजारपेठ विस्तारत विस्तारत ती आता छोट्या छोट्या गावांपर्यंत गेली आहे. या विस्तारलेल्या बाजारपेठेशी प्रकाशक कसा संवाद करणार आहेत हा आजचा महत्त्वाचा प्रश्न आहे. अशा सगळ्या गोष्टींची चर्चा केल्यानंतर एक गोष्ट मात्र स्पष्ट होते, ती अशी की, पुस्तकांची बाजारपेठ ही अत्यंत महत्त्वाची गोष्ट आहे. तिच्यावर ताबा मिळविणे, निदान तिच्याशी संवादी राहणे मात्र लेखक-प्रकाशकांच्या दृष्टीने आवश्यक आहे. आज मात्र पुस्तकांच्या बाजारपेठेवर वरचष्मा असतो तो प्रतिष्ठित मान्यवर प्रकाशकांचा हे मात्र कबूल करावे लागेल. अर्थात एखाद दुसरे अपवादात्मक पुस्तक जे नव्या किंवा अपरिचित प्रकाशकाने प्रकाशित केले आहे त्याची विक्री होते त्याची दखल घेतली जाते, चर्चा होते. लेखकाने साहित्यकृती निर्माण केली तरी लेखक म्हणून जी मान्यता प्राप्त होते ती प्रकाशकामुळे; कारण प्रकाशक ती साहित्यकृती वाचकांपर्यंत पोहोचवत असतो. आजच्या स्थितीत साहित्यव्यवहाराच्या क्षेत्राचा मोठ्या प्रमाणात विस्तार झालेला आहे. दररोज शेकडो पुस्तके विविध प्रकाशनसंस्था प्रकाशित करत असतात. महाराष्ट्र शासन, विविध विद्यापीठे, साहित्यसंस्था आणि काही वैयक्तिक प्रकाशने सोडली तरीही आज महाराष्ट्रात किमान चारशे ते पाचशे प्रकाशक प्रकाशन व्यवसायात कार्यरत असावेत. महाराष्ट्रात खेड्यापाड्यात उच्च शिक्षणापर्यंतचा शिक्षणप्रसार झाल्यामुळे मराठीतील ग्रंथव्यवहार (वर्षापूर्वीच्या तुलनेत) खूप वाढल्याचे दिसते. दर महिन्याला विविध प्रकाशनसंस्थांच्या माध्यमातून किमान तीन-चारशे पुस्तके बाजारात येतात. यातील किती पुस्तकाची दखल घेतली जाते? त्यांची साहित्यव्यवहारात चर्चा होते का? असे अनेक प्रश्नही निर्माण होतात; परंतु ज्या प्रस्थापित, प्रतिष्ठित प्रकाशनसंस्था आहेत त्याच्याकडे मोठा वाचकवर्ग विश्वासाने पाहत असतो. अशा प्रकाशनसंस्थांनी प्रकाशित केलेल्या पुस्तकांची साहित्यव्यवहारात चर्चा होते. नागपूर-चंद्रपूरसारख्या शहरांमधून प्रकाशित झालेली पुस्तके पुण्या-मुंबईच्या बाजारपेठांमध्ये क्वचितच दिसतात. हाच प्रकार इतर शहरांबाबतही आहे. एकतर ही पुस्तके त्या त्या प्रदेशात विकली जात असणार अगर महाराष्ट्रभर पोहोचायला कितीतरी वर्षे जात असणार म्हणून एलकुंचवार, मनोहर, ग्रेस, राजन गवस यांच्यासारखे लेखक आपली पुस्तके पुणे किंवा मुंबईच्या मान्यवर प्रकाशकांना प्रसिद्धीसाठी देत असतात; पण वेगवेगळ्या ठिकाणांहून प्रकाशित झालेली पुस्तके चांगली, दर्जेदार नसतातच असे म्हणता येणार नाही कारण वाचल्याशिवाय ती कशी आहेत, हे कसे ठरविता येणार? पण एवढे परिश्रम तरी सध्या कोण घेतो? मराठीत असे कुठलेही नियतकालिक नाही की जे आलेल्या नव्या

पुस्तकांवर किमान अर्ध्या पानाची तरी समीक्षा देईल. प्रकाशनसंस्थेने पुस्तक प्रकाशित केले तरी त्या पुस्तकावर चर्चा झाल्याशिवाय, प्रकाश-झोतात आल्याशिवाय साहित्यव्यवहारात स्थान मिळत नाही, त्यामुळे अनेक प्रसिद्ध लेखक आपली साहित्यकृती पुणे-मुंबई येथील प्रतिष्ठित व प्रस्थापित प्रकाशनसंस्थांमध्ये प्रकाशित करताना दिसतात. म्हणजेच लेखकाला लेखक म्हणून व्यापक स्वरूपात मान्यता मिळवायची असेल, तर प्रतिष्ठित साहित्यसंस्थेकडून पुस्तक प्रकाशित करावे लागते.

वरील विवेचनावरून असे दिसून येते की, प्रकाशक हा लेखक व वाचक यांच्यातील मध्यस्थाची भूमिका बजावत असतो. पुस्तक प्रसिद्धीसाठी लेखक प्रकाशकाने जे पैसे गुंतवलेले असतात त्याची वेळेत नफ्यासह वसुली व्हावी अशी प्रकाशकाची अपेक्षा असते. त्यासाठी वाचकाच्या पसंतीस सदर पुस्तक उतरावे म्हणून पुस्तकाचे मुखपृष्ठ-मलपृष्ठ आकर्षक करण्याचा प्रयत्न करतो. साहित्यव्यवहारात वाचकांचा काही विशिष्ट प्रकाशन संस्थांवर विश्वास असतो; नव्हे त्यांच्या दृष्टीने प्रकाशनसंस्था ह्या (Brand) आहेत. ज्या प्रकाशन संस्थेचे प्रकाशन व्यवसायात विशेष नाव नाही अशा प्रकाशन संस्थेने प्रकाशित केलेले पुस्तक कितीही दर्जेदार असले तरीही वाचक बहुधा दुर्लक्ष करताना दिसतात. ज्या प्रकाशनसंस्थांकडे वाचक विश्वासाने पाहतात अशा प्रकाशनसंस्थेने लेखकाला पुस्तक प्रकाशित करण्याची मान्यता दिली की, लेखक पुस्तक प्रसिद्धीची अर्धी लढाई जिंकलेला असतो. म्हणजेच प्रकाशनसंस्थेचा दर्जा साहित्यव्यवहारावर परिणाम करत असतो. पुस्तक प्रसिद्धीसाठी व साहित्यव्यवहारात पुस्तकाची चर्चा घडवून आणण्यासाठी प्रकाशक पोस्टर छापून पुस्तक-विक्रीच्या ठिकाणी लावणे, वर्तमानपत्रातून जाहिरात देणे, ग्रंथ व्यवहारासाठीच्या नियतकालिकांमध्ये जाहिरात देणे, एका विशिष्ट दिवशी पुस्तक खरेदी केल्यास लेखकाशी संवाद साधता येईल व पुस्तकावर स्वाक्षरी मिळेल असे विविध उपक्रम राबवत असतात, तर ज्या प्रकाशनसंस्था नव्याने सुरू झालेल्या असतात त्यांना पुस्तक प्रसिद्धीसाठीचे असे उपक्रम राबविणे शक्य नसते. परिणामी एखादे पुस्तक कितीही महत्त्वाचे असले तरी ते दुर्लक्षित राहण्याची शक्यता असते. आजही पौराणिक स्वरूपाचे ललित साहित्य वाचणाऱ्या वाचकांची संख्या जास्त आहे, त्या तुलनेत समाजाचे व माणसांचे प्रश्न मांडणारे ललित साहित्य कमी वाचले जाते असे निरीक्षण प्रकाशक नोंदवतात. काही लेखक व त्यांचे कुटुंबीय स्वतःच स्वतंत्रपणे पुस्तक प्रकाशित करून वाचकांपर्यंत पोहोचवताना दिसतात. एके काळी पुणे आणि मुंबई येथेच प्रकाशनाचा व्यवसाय करणाऱ्या प्रकाशनसंस्था होत्या; परंतु अलीकडे प्रत्येक जिल्ह्यात प्रकाशनसंस्था सुरू झालेल्या दिसून येतात. उच्च शिक्षणाचा ग्रामीण भागात प्रसार झाला त्यामुळे साहित्यव्यवहाराचे क्षेत्रही काही प्रमाणात विस्तारल्याचे दिसते. लेखकाने साहित्यकृतीची निर्मिती केली तरी त्याला लेखक म्हणून समाजमान्यता मिळवून देण्यात काही प्रमाणात प्रकाशकाचेही योगदान असते.

संदर्भसूची


१) कोत्तापल्ले नागनाथ, 'साहित्यव्यवहाराचा प्रमुख आधार; वाचक', अंतर्भूतः कोठावळे केशवराव, (संपा.) 'ललित' (मासिक) फेब्रु २०१८ पृ.१४.

२) कोत्तापल्ले नागनाथ, 'वाचक, वाचन आणि वाचनप्रक्रिया पुस्तकांची बाजारपेठ', अंतर्भूतः कोठावळे केशवराव, (संपा.) 'ललित' (मासिक) ऑक्टो २०१८ पृ. ३४ व ३५.

३) तत्रैव पृ. ३५.

४) कोत्तापल्ले नागनाथ, 'जागतिकीकरण आणि वाचन', अंतर्भूतः कोठावळे केशवराव (संपा.) 'ललित' (मासिक) जुलै २०१८ पृ. २२.

५) तत्रैव पृ. २२.

६) कोत्तापल्ले नागनाथ, 'वाचक, वाचन आणि वाचनप्रक्रिया पुस्तकांची बाजारपेठ, अंतर्भूतः कोठावळे केशवराव (संपा.) 'ललित' (मासिक) ऑक्टो २०१८ पृ. ३४.

७) तत्रैव पृ. ३५. ८) तत्रैव पृ. ३४.

९) तत्रैव पृ. ३६. १०) तत्रैव पृ. ३६.

११) तत्रैव पृ. ३८. १२) तत्रैव पृ. ३७.



प्रा. नंदकुमार भाऊसाहेब उदार
चलभाषः ९८२२७४८७७२
udarnandkumar@gmail.com















# झेन

अशोक बागवे यांच्या झेन
कथांमधील सौंदर्य स्थळे
उलगडून दाखवणारा लेख.

नारायण लाळे



Zen म्हणजे काय किंवा zen कथा कशा असतात किंवा माझ्या zen कथा म्हणजे कोणाच्या कथा, याचा शोध घेण्याआधी लेखक म्हणून माझ्या zen कथा लिहिणारे प्रा.अशोक बागवे यांचा संबंध zen शी कधी आणि कसा आला, त्यांच्या डोक्यात zen कधी शिरला, याचा शोध घेणे मला महत्त्वाचे वाटते कारण zen कथा ऐकणे सोपे काम आहे, इंटरेस्टिंग आहे; परंतु zen कथांना जन्म देणे, त्यांची निर्मिती करणे, हे zenच जाणे! जसं फुलाचा सुगंध घेणे सोपे आहे; पण ते फूल तयार कसं होतं, हे ते झाडच जाणे. मला तर प्रत्येक zen कथा अणुरेणूसारखी वाटते. त्या असतातही लहान. किमान संवादी; परंतु त्या कथांमधील अर्थबोधाची व्याप्ती महाप्रचंड, आयुष्य बदलवणारी. zen कथा मला शुगर कोटेड कॅप्सूलसारखी वाटते. चवीला गोड परंतु जालीम ऊर्जा स्रोतांनी भरलेली. सूर्यतेजाने भरलेल्या दवबिंदूसारख्या या zen कथा असतात. ऐकायला सोप्या; निर्मितीसाठी मात्र प्रतिभेचा वरदहस्त आणि zen होणे क्रमप्राप्त असावे. zen मधील सहजता अंगी बाणावी लागत असावी.

प्रा. अशोक बागवेंच्या एकूण साहित्याचा अभ्यास करीत असताना त्यांनी केलेले वृत्तपत्रीय लिखाणही माझ्या नजरेसमोर होते. एका वृत्तपत्रामध्ये 'बोरू म्हणे' नावाचे सदर ते सातत्याने लिहीत होते. बागवेंच्या भाषाशैलीमुळे बोरू म्हणे हे सदर त्या वेळी चांगलेच गाजले. हे सांगण्याचे कारण या 'बोरू म्हणे'मध्ये सकल संत शिरोमणी बोरू महाराज हे पात्र नेहमी गोवलेले असायचे. समाजात काही विपरीत घडले की, या बोरू महाराजांचा रागाचा पारा चढत असे.

बोरू महाराज चिडले, की ते फराफरा 'झ्यान कथा' लिहीत आणि आपला संताप व्यक्त करीत. त्यावरून त्यांच्या रागाचा अंदाज, रोख ओळखता येत असे. प्रा.अशोक बागवे लिहीत असलेल्या बोरू म्हणे या सदरात बोरू महाराजांनी फराफरा सांगितलेली झेन कथा वाचकांना सातत्याने वाचायला मिळत होती. ही नोंद देण्याचे कारण प्रा. अशोक बागवे यांनी लिहिलेल्या 'माझ्या zen कथांचा उगम बोरू म्हणेमधील बोरू महाराजांनी लिहिलेल्या झ्यान कथांमध्ये आहे, हे लक्षात येते. हा बागवेंच्या लिखाणात झेन म्हणून १९८०-८२ पासून वावरत असावा. बागवेंचा तोच झ्यान आता zen बनून माझ्या zen कथा सांगतो आहे.

माझ्या zen कथा हे पुस्तक नावाप्रमाणेच माझ्या, म्हणजे प्रा. अशोक बागवे यांनी लिहिलेल्या zen कथांचा संग्रह आहे. मुंबईच्या डिंपल पब्लिकेशनने या कथासंग्रहाचे प्रकाशन केले आहे. संग्रहाचे मुखपृष्ठ आणि सुलेखन सुप्रसिद्ध चित्रकार सरदार जाधव यांचे आहे.



अनुक्रमणिका








लेखक आणि चित्रकार त्यांची कल्पकता म्हणजे, झेन हा शब्द त्यांनी zen असा लिहिला आहे. संपूर्ण कथासंग्रहातही सर्वत्र zen असाच उल्लेख केलेला दिसतो.

१७ सप्टेंबर२०१५ मध्ये प्रकाशित झालेले हे पुस्तक मराठी साहित्यामध्ये कथासंग्रह विभागातील सर्वोत्कृष्ट निर्मिती आहे, असे म्हटले तर चुकीचे ठरणार नाही. निर्मिती सर्वांगाने, म्हणजे एक प्रॉडक्ट म्हणून आणि आतील (zen) कथासाहित्य म्हणूनही. मराठी साहित्यात स्वतःच्या zen कथा सांगणारे हे एकमेव पुस्तक म्हणावे लागेल. अभ्यासक नितिन भरत वाघ यांचे झेन हे झेन कथांचे पुस्तक आहे; परंतु यातील झेन कथा म्हणजे मूळ झेन कथांचा मराठी अनुवाद आहे. प्रदीर्घ अभ्यासपूर्ण प्रस्तावना, हे या पुस्तकाचे वैशिष्ट्य म्हणावे लागेल. माझ्या zen कथा मधील zen कथा मात्र संपूर्णपणे प्रा. अशोक बागवे यांची निर्मिती आहे. मराठी साहित्याच्या दृष्टीने दुर्दैवाचा भाग असा की, या महत्त्वपूर्ण पुस्तकाकडे तथाकथित साहित्यिकांनी किंवा समीक्षकांनी दुर्लक्ष केलेले दिसते. वाङ्मयीन नियतकालिकांनीही या पुस्तकाची दखल घेतली नाही. किंवा कुणा अनुवादकानेही माझ्या zen कथांचा अनुवाद अन्य भाषेत (इंग्लिश किंवा हिंदी) केलेला नाही. एकमेव अपवाद म्हणून एका नवोदित लेखकाने माझ्या zen कथा वर वृत्तपत्रीय परीक्षण लिहिले आहे.

प्रस्तुत पुस्तकासंबंधी (माझ्या zen कथा) प्रा. अशोक बागवेंशी चर्चा करत असताना आणखी एक धागा मला सापडला. तो धागा म्हणजे बागवेंचा मित्र, हसु मिस्त्री. हा नुसता मित्र नाही तर बागवेंचा zen मित्र. दोघांच्या जेव्हा गप्पा चालत त्या वेळी बागवेंच्या तोंडून बरेच वेळा हसु मिस्त्रीला शब्दक्रीडा ऐकायला मिळायची. वास्तव-विस्तव, पारा- पारावर, चिमटीत धरता न येणारा पारा, तोंड सुख म्हणजे काही न बोलता मुके राहणे इ. इ. हसु मिस्त्रीला बागवे यांच्या बोलण्यात zen दिसू लागला. मग त्यानेच बागवेंकडे आग्रह धरला, आप zen कथा लिखो! याचा अर्थ, मी म्हणतो त्याप्रमाणे एका zen ने एकाzen ला zen कथा लिहिण्यास प्रवृत्त केलं. अशोक बागवे यांनी माझ्या zen कथाच्या अर्पणपत्रिकेत लिहिलेले आहे, माझा zen मित्र, हसु मिस्त्री यांस सादर समर्पण झेनमध्ये अर्पणपेक्षा समर्पणला महत्त्व आहे, हे वेगळेपणाने सांगण्याची आवश्यकता नाही.

झेन पंथाबद्दल मराठी विश्वकोशात मिळणारी माहिती इथे देणे सयुक्तिक ठरेल.

संस्कृत ध्यान व पाली भाषेतले ज्झान या शब्दाचे चीनी भाषेत लिप्यांतर करताना जी लिपी चिन्हे वापरली जातात, त्यांच्या 'झेन्ना' या उच्चाराचे 'झेन' हे संक्षिप्त रूप आहे. समाधी, मनन, चिंतन हा त्याचा मूलभूत अर्थ आहे. ज्ञानप्राप्तीचे साधन म्हणून प्राचीन काळापासून ध्यान समाधीची कल्पना भारतात अस्तित्वात होती. तिला शास्त्रशुद्ध पायावर उभी करण्याचे कार्य शाक्यमुनीने म्हणजे गौतम बुद्धाने स्थापिलेल्या बौद्ध विचारसरणीने केले. परिमित व सापेक्ष मानवप्राणीही अपरिचित व केवल पद प्राप्त करू शकतो. त्यासाठी ध्यान हा आदर्श मार्ग होय, या सत्याचे दर्शन शाक्यमुनींना बोधीवृक्षाखालील समाधी साधनेत स्वानुभवाने झाले. त्यानी प्राणिमात्रांना तारक ठरावे, यासाठी सुधारित व सापेक्ष स्वरूपात सत्याची शिकवण दिली. झेन पंथाचा प्रारंभ शाक्यमुनींपासून झाला आहे, याची माहिती मराठी विश्वकोशात मिळते.

शाक्यमुनींपासून प्रारंभ झालेला झेन पंथ, त्यात गुरु-

शिष्याने प्रश्नोत्तर संवादातून सागितलेल्या झेन कथा आणि प्रा.अशोक बागवे यांनी सांगितलेल्या zen कथा यात एकमेव; परंतु महत्त्वाचा फरक लक्षात येतो, तो म्हणजे, माझ्या या शब्दाचा. बागवेंनी लिहिलेल्या माझ्या zen कथा मधून माझा शब्द काढला तर, या zen कथाही तेवढ्याच समर्पक आहेत, जशा मुळातल्या झेन कथा आहेत. या बाबतीत अशोक बागवेंचे कौतुक करावे तेवढे थोडेच आहे. झेन कथांमधील असलेले गुणविशेष बागवे यांच्या कथांमधूनही तंतोतंत आढळतात आणि म्हणूनच या zen कथा असल्या तरी, त्या अशोक बागवे यांनी रचलेल्या, सांगितलेल्या आहेत, हे विसरून चालणार नाही.

झेन पंथात संवादाला आणि प्रश्नोत्तरांना 'उपकरण' (tool) मानतात. ते आणि तसेच प्रश्नोत्तरांचे उपकरण अशोक बागवे यांनी zen कथा रचताना वापरले आहे. तसे नसते, तर या zen कथा झाल्याच नसत्या. सरळ सोपेपणा, सोपी, संवादी प्रश्नोत्तररूप रचना आणि तिरकस, मिश्कील परंतु गूढ संकेत, ही झेन कथेची वैशिष्ट्ये अशोक बागवेंच्या zen कथांमधूनही सहजपणे प्रदर्शित होतात. झेन कथांमध्ये संदेश नसतो; इसापनीतीत असतो त्याप्रमाणे नित्य उपदेश किंवा तात्पर्य नसते; परंतु थेटपणे दिलेले गूढ संकेत असतात. हेच पथ्य बागवेंच्या zen कथांमधूनही दिसून येते. मराठी काव्य क्षेत्रात ओवी, अभंग, लावणी यांची पारंपरिक रचना आजही केली जाते. त्याप्रमाणे झेन कथांची पारंपरिक रचना मराठीतून कुणी केल्याचे ऐकिवात नाही. अशोक बागवे यांनी तसा प्रयोग माझ्या zen कथा लिहून यशस्वीपणे केला आहे. बागवेंकडे सढळ असलेले नाट्यगुण, वक्तव्यगुण, काव्यगुण, कथागुण, कादंबरीगुण, मिश्कीलपणा, भ्रमंती, निसर्गप्रेम, ज्ञानेश्वरीचा अभ्यास, मराठी शब्दकळेशी असलेले सख्य या सर्वांचा परिपाक, त्यांनी रचलेल्या zen कथांमध्ये परावर्तीत झाला आहे. मुळात चालणे, बोलणे, उभे राहणे, पहुडणे, बसणे ही झेनची रूपे सांगितली जातात. याचाही अभाव बागवेंकडे नाही.

शून्य ते एकशेअकरा अशा क्रमाने झेन कथांची मांडणी माझ्या कथामध्ये दिसून येते. झेनमध्ये शून्याचे महत्त्व, किंबहुना 'शून्य' (Emptyness) होणं ही पहिली पायरी आहे. ते झाल्याशिवाय झेन पुढे जात नाही. चहाचा कप या मूळच्या झेन कथेत, एक प्रोफेसर झेन गुरूकडे येतो.

**शून्य झाल्याशिवाय ओळख नाही, असे झेन म्हणतो. त्यामुळे मी, माझा, माझ्यामुळे अशा बिरुदांना झेनमध्ये थारा नाही. याची पूर्ण जाणीव असल्यामुळे सुरुवातीच्या 'दोन शब्दांत' आधुनिक Zen कथाकार अशोक बागवे यांनी माझा या शब्दाला मीपणाचा दर्प नसल्याचे स्पष्ट केले आहे. या पुस्तकाने मराठी साहित्य क्षेत्रात वेगळी; परंतु अत्यंत महत्त्वपूर्ण अशी भर टाकली आहे. लहान थोरांनी वाचाव्यात आणि सांगाव्यात अशा या Zen कथा आहेत, आणि शक्यतेनुसार स्वत:ला Empty करत, स्वत:ला विसरून झेन भरून घेतल्यास, ही माझ्या Zen कथांची फलश्रुती ठरेल.**

स्वत:ची भलीमोठी ओळख देत गुरूला म्हणतो, ''मला झेन शिकायचे आहे. तुम्ही शिकवाल का?'' झेन गुरू म्हणतो, ''हो, शिकवीन; पण त्याआधी आपण जरा चहा घेऊया.'' झेन गुरू चहा करतो. दोन कप आणतो. टेबलावर ठेवून त्यात चहा ओतायला लागतो. तेवढ्या वेळात प्रोफेसर विचार करत असतो. स्वत:च्या प्रौढीचे विचार त्याच्या डोक्यात गर्दी करून असतात. गुरू दुसऱ्या कपात चहा ओतत असतो, ओततच असतो, तो इतका की चहा कपाच्या बाहेर सांडू लागतो. तरी झेन गुरू चहा ओतायचं थांबवत नाही. प्रोफेसर ओरडून गुरूला सांगतो, ''गुरू, चहा बाहेर सांडतोय !'' झेन गुरू म्हणतो, ''मला तेच म्हणायचं आहे. तुझं डोकं असंच विचारांनी भरलेलं आहे. ते रिकामं झाल्याशिवाय मी तुला झेन कसं शिकवू ? कप रिकामा झाल्याशिवाय चहा भरणार नाही.''

शून्य झाल्याशिवाय ओळख नाही, असे झेन म्हणतो. त्यामुळे मी, माझा, माझ्यामुळे अशा बिरुदांना झेनमध्ये थारा नाही. याची पूर्ण जाणीव असल्यामुळे सुरुवातीच्या 'दोन शब्दांत' आधुनिक Zen कथाकार अशोक बागवे यांनी माझा या शब्दाला मीपणाचा दर्प नसल्याचे स्पष्ट केले आहे. या पुस्तकाने मराठी साहित्य क्षेत्रात वेगळी; परंतु अत्यंत महत्त्वपूर्ण अशी भर टाकली आहे. लहान थोरांनी वाचाव्यात आणि सांगाव्यात अशा या Zen कथा आहेत, आणि शक्यतेनुसार स्वत:ला

Empty करत, स्वतःला विसरून झेन भरून घेतल्यास, ही माझ्या Zen कथांची फलश्रुती ठरेल.

अशोक बागवेंच्या Zen कथांची काही बीजं त्यांच्या तिरकस या सुलेखन संग्रहातही सापडतात. अशोक बागवे यांची प्रत्येक Zen कथा त्यांच्या कवितेसारखीच वाटते. बागवेंच्या या कथांमधून एक झेनील लय अनुभवास येते. त्यांची Zen कथा वाचल्यावर आपण स्तब्ध होतो, शांत होतो आणि कथेतून मिळणाऱ्या संकेताला शोधण्याचा प्रयत्न करतो. या कथा स्वतःकडे पाहण्यास प्रवृत्त करतात, हे माझ्या Zen कथांचे साध्य सिद्ध होते.

'zen is not philosophy, zen is poetry' हे ओशोंचं वाक्य आहे. ते मनोमन पटणारे आहे. माझ्या zen कथा वाचून त्याची सत्यता पटते. थेट काहीच सांगत नाही. zen गूढ संकेत देतो. चांगली कविता हेच करीत असते. ती थेट अर्थ कधीच सांगत नाही. कवितार्थ शोधावा लागतो, अर्थ काढावा लागतो, प्रतिमा प्रतीकांच्या आधारे, चकित करणाऱ्या शब्दांच्या आधारे. कविता केवळ अर्थसंकेत देते. कवितार्थावर पांघरूण घालीत ती एक गूढता निर्माण करते. या सगळ्याचा अर्थ आस्वादकाला लावावा लागतो. कवितेचा अर्थ लावणे म्हणजे तो एक सौंदर्यानंद असतो. zen कथांचे यापेक्षा वेगळे काही नाही. zen कथेतील संकेतांचा अर्थ लागणे म्हणजे देखील एक सौंदर्यानंदच आहे. आत्ता या क्षणाचा तो अर्थ असतो. zen is poetry ओशोंच्या या वाक्याने आपल्याला zen चा स्पर्श झाला आहे, असे वाटू लागते. माझ्या zen कथांमधील कथाही काव्यमय वाटतात. अल्पाक्षरांमध्ये सहजपणे बंदिस्त केलेला 'spontaneous thought' हा काव्यगुण या zen कथांमधून दिसून येतो. प्रा.अशोक बागवे हे चांगले कवी आहेत. त्यामुळे त्यांच्या zen कथाही काव्यमय आहेत. या zen कथांना एक झेनील लय आहे.

'माझ्या zen कथांमध्ये चौसष्टावी कथा आहे,

**शिष्य: ध्यान कशाचे करावे. भगवन?**
**zen : जगाचे!**
**शिष्य: ध्यान कसे करावे?**
**zen : डोळे मिटून!**
**शिष्य: का?**
**zen: कारण डोळे मिटले की जगाचा विलोप.**
**शिष्य: डोळे उघडले की...**
**zen: ध्यानाचा विलोप.**

केवळ या आठ ओळींमध्ये कथा लेखकाने सर्व प्रश्नांची उत्तरे दिली आहेत आणि ती देताना, ध्यान कसे आणि कशाचे करावे याचे संकेत दिले आहेत. ज्याला zen व्हायचे आहे त्याने या संकेतांना स्वीकारून त्यांचा अर्थबोध कृतीत आणणे अपेक्षित असते, आणि ते सोपे नसते म्हणूनच मी म्हणतो, कथा ऐकणे सोपे आहे, आताचा क्षण पकडणे कठीण आहे. ते सोपे असते तर, सगळेच zen झाले असते.

zen 'मी'चा लोप करून स्वतःकडे बघायला शिकवतो. जे आहे ते स्वतःमध्येच आहे त्याचा शोध आपण कधीच घेत नाही, उलट जे स्वतःमध्येच आहे ते बाहेर आयुष्यभर आपण शोधात असतो. zen स्वतःला ओळखण्याची शिकवण देतो. स्वतःचा शोध घ्यायला लावतो. याच संग्रहातील अठ्ठ्याऐंशीवी zen कथा यापेक्षा वेगळं काही सांगत नाही.

zen आपल्या शिष्याला त्याचा हात दाखवायला सांगतात. शिष्य हात दाखवतो. zen विचारतात, "तुझ्या तळहातावर किती रेषा आहेत ?" शिष्य तळहातावरच्या रेषा मोजू लागतो. zen म्हणतात, "न मोजता सांग." शिष्य उत्तर देतो, माहीत नाही. zen म्हणतात, "वत्सा, हे असेच असते.
**जे आपल्या अगदी मुठीत असते**
**तेच नेमके आपणास**
**माहीत नसते !"**

या एकूण तेरा ओळींत केवढी मोठी शिकवण मिळते. (इथे तत्त्वज्ञान हा शब्द मी जाणीवपूर्वक वापरत नाही कारण झेन तत्त्वज्ञान सांगत नाही. झेन काहीच सांगत नाही आणि सर्वकाही सांगतो ! ) या संग्रहातील अठ्ठ्याहत्तरावी कथा आहे, शिष्य म्हणाला-

**मी प्रश्न विचारले नाही तर- !**
**zen म्हणाले- मी उत्तर देणार नाही**
**शिष्य म्हणाला- भगवन,**
**तुमच्याकडे प्रत्येक प्रश्नाचे**
**उत्तर असते काय?**
**zen म्हणाले- नाही.**
**वत्सा, मी फक्त प्रश्न**



अनुक्रमणिका

**चांगली कविता हेच करीत असते. ती थेट अर्थ कधीच सांगत नाही. कवितार्थ शोधावा लागतो, अर्थ काढावा लागतो, प्रतिमा प्रतीकांच्या आधारे, चकित करणाऱ्या शब्दांच्या आधारे. कविता केवळ अर्थसंकेत देते. कवितार्थावर पांघरूण घालीत ती एक गूढता निर्माण करते. या सगळ्याचा अर्थ आस्वादकाला लावावा लागतो. कवितेचा अर्थ लावणे म्हणजे तो एक सौंदर्यानंद असतो. zen कथांचे यापेक्षा वेगळे काही नाही. zen कथेतील संकेतांचा अर्थ लागणे म्हणजे देखील एक सौंदर्यानंदच आहे. आत्ता या क्षणाचा तो अर्थ असतो.**

**समजावून घेत असतो.**

नऊ ओळींची ही कथा, जे समोरच्याचे बोलणे समजावून घेत नाहीत, विचारलेल्या प्रश्नाचा अर्थ लक्षात घेत नाहीत आणि तसे न करता एकदम उत्तरावर उडी मारतात, निर्णय सांगण्याची घाई करतात त्यांच्यासाठी आहे. (म्हणजे शभरातील ऐंशी जणांसाठी आहे) हे वेगळेपणाने सांगण्याची गरज नाही. हा zen संकेत आहे. तो ऐंशी जणांनी ओळखायला हवा. अनुभव आल्याशिवाय बोलू नये. न पाहताच केवळ प्रश्न उपस्थित करू नयेत, असा संकेत देणारी चौऱ्याहत्तरावी कथा तितकीच महत्त्वाची आहे.

सहासष्टाव्या कथेत जीवनानुभवाचे सार संकेत मिळतात. ही आणि संग्रहातील प्रत्येक कथा वाचल्यावर वाचक शांत, स्तब्ध होतो, emply होतो, यात प्रश्नच नाही. zen कथांचे लेखक म्हणून, अशोक बागवे यांना सलाम करावासा वाटतो.

**शिष्याने विचारले – भगवन,**
**दळताना तुमच्या मुखात गाणे कसे?**
**zen म्हणाले – साहजिकच आहे.**
**दाणे पिसले की पीठ येते**
**आयुष्य पिसले की गाणे होते**
**दाणे ओठातून पोटात जातात**
**म्हणून गाणे पोटातून ओठात येते**

अशा ओळींनी zen कथा रचून प्रा.अशोक बागवेंनी मराठी साहित्य क्षेत्रात एक अमूल्य कामगिरी (साहित्य कृती) केली आहे, असेच म्हणावे लागेल. माझ्या zen कथामधील शून्य क्रमांकाची कथा आणि एकशेअकराव्या कथेचा उल्लेख अपरिहार्य ठरतो. शून्य कथेत,

zen ना मी एकदा विचारलं –
**आकाशाचा रंग कोणता?**
**ते म्हणाले – जो पाण्याचा आहे तो.**
**– मग पाण्याचा रंग कोणता? –**
**– जो आकाशाचा आहे तो.**

संग्रहातील केवळ या कथेतच 'मी' चा उल्लेख आला आहे. पुढील एकशेअकरा कथामध्ये मात्र शिष्य म्हणून उल्लेख येतात. मी फक्त शून्य कथेमध्येच दिसतो. एक लक्षात घेतले पाहिजे, हा मी म्हणजे अहं मधला मी नाही तर, स्वतः लेखक म्हणून अशोक बागवे या कथेत मी म्हणून उल्लेख करतात. पुढे अर्थ असा काढता येतो, या मीचा शून्य क्रमांकाच्या कथेतच लोप झाला आहे. त्याचे समर्पण झाले आहे म्हणून पुढील कथांमध्ये सर्वत्र शिष्य असा उल्लेख दिसतो. कथा वाचताना कुणाच्या लक्षातही येणार नाही इतके बेमालूमपणे मीचे शून्य होणे, zen कथांना हे साजेसे आहे. त्याशिवाय zen काय तर, zen कथाही लिहिता येणार नाहीत. लेखकाच्या या जाणिवेला दाद द्यावीशी वाटते.

माझ्या zen कथामधील एकशेअकरावी म्हणजे शेवटची कथादेखील मला महत्त्वाची वाटते. ज्यांना कुणाला zen बनायचे आहे, त्यांनी या कथेतून संकेत घ्यावा आणि zen बनायचे की नाही हे मनाशी (मन रिकामं करून) ठरवावे कारण हा विचार मनात आणणे सोपे आहे; परंतु हा विचार मनातून काढून टाकून मन रिकामं करणं महाकर्मकठीण आहे. संग्रहातील शेवटची म्हणजे, एकशेअकरावी कथा त्या दृष्टीने पाहता येईल –

**अखेरची सभा भरली होती.**

**शिष्यांनी एक मुखाने zen ना विचारले – भगवन,**
**आम्हाला zen कधी होता येईल ?**

**zen नी सर्वांकडे शांत नजरेने पाहिले.**
**म्हणाले – वत्सांनो, आपल्याला zen कधीच**

**होता येणार नाही; असे ज्या वेळी**
**तुम्हाला वाटेल तेव्हा –**

**आणि zen ध्यानस्थ झाले.**

**माझ्या zen कथा वाचून वाचकांनीच ठरवायचं आहे –**
**zen व्हायचं की नाही...**
**मला मात्र zen कधीच होता येणार नाही !!**

या लेखाच्या निमित्ताने झेनबद्दल मी जे वाचले किंवा ऐकले ते इथे नमूद करावेसे वाटते.

झेन म्हणजे काय आणि झेनं म्हणजे काय नाही, अशा दोन्ही तऱ्हेच्या असंख्य व्याख्या झेनच्या अभ्यासकांनी केलेल्या दिसतात. 'झेन म्हणजे पोएट्री आहे. फिलॉसॉफी नाही.' ओशोंनी केलेल्या या व्याख्या मला खूप अपील झाल्या. पोएट्रीबद्दलचे त्यांचे विचार वर उल्लेखिले आहेत. झेन म्हणजे फिलॉसॉफी नाही, याचेही ते विश्लेषण करतात. ओशो म्हणतात, 'फिलॉसॉफी डॉमिनेटिंग आहे. ती कमांड करते. कंट्रोल करते. ऑर्डर करते. तिचा संबंध फक्त मेंदूशी असतो. डोक्याशी असतो. बुद्धी, चर्चा, तर्कवितर्क, आर्ग्युमेंटस यासाठी शरीराच्या केवळ मेंदू या भागाशीच तिचा संबंध असतो. झेनचे तसे नाही. झेन माणसाच्या डोक्यापासून पायाच्या बोटांपर्यंत शरीराच्या प्रत्येक अवयवाला महत्त्व देतो. हा मोठा फरक आहे. झेन म्हणजे कविता असल्यामुळे तो सौंदर्याला महत्त्व देतो. लयबद्धतेला महत्त्व देतो. कवितेत व्हायोलन्सला थारा नाही. फिलॉसॉफीमध्ये एकमेकांतले वादविवाद, झगडे आहेत. तंटे आहेत. कवितेत प्रेम आहे. झेन स्त्रैण आहे म्हणूनच झेन म्हणजे कविता आहे म्हणून झेन निर्मितीक्षम, आहे. zen is magic', असे ओशो म्हणतात. स्वतःमध्ये शिरण्याची चावी झेनकडे आहे. आयुष्याकडे बघण्याचा मार्ग झेनकडे आहे. झेन म्हणजे दिवा आहे, टॉर्च नाही. तो काही शोधायला सांगत नाही. त्याने दिलेल्या दिव्यामुळे सगळेच उजळून निघते. दिसू लागते. टॉर्चचा फोकस मर्यादित आहे. झेन मिस्कील आहे. त्याला विनोदाचे वावडे नाही. झेनला त्यांनी 'नॉन सिरीयस' म्हटले आहे. झेनकडे सेलिब्रेशन आहे. जगातला कुठलाही पंथ, धर्म ह्युमरला स्वीकारत नाही. zenला आवडणारा ह्युमर अनुभवण्यासाठी माझ्या zen कथांमधील दहा, बारा, सेहेचाळीस, नव्व्याण्णव या क्रमांकाच्या कथा वाचाव्यात. म्हणजे हा, पानीमे आग लगी है. जाके देखांतला प्रकार होईल.

झेनमध्ये विनोदालाही स्थान मिळण्यास 'हाकुइन' (१६८५-१७६८ ) या झेन गुरूचा सहभाग मोठा आहे. त्याने अत्यंत सोपा सुबोध व लोकप्रिय असा झेनचा प्रकार विनोदाची कलाबूत लावून उपदेशिल्यामुळे सर्वसाधारण लोकांना आचरण्यास व स्वीकारण्यास तो सोपा वाटला आणि त्यामुळे रिंझाई पंथीय झेनचे पुनरुज्जीवन होऊन त्याला समाजाच्या अगदी खालच्या थरातही अनुयायी लाभले. आज त्याचे १४ उपपंथ असून पाच ते सहा हजार मंदिरे आहेत. (संदर्भ- मराठी विश्वकोश-झेन) झेनमध्ये सोपेपणा आणि विनोदाचे स्थान यासाठी हाकुइन या झेनने केलेले परिवर्तन महत्त्वाचे व सर्वस्वीकृत ठरले. माझ्या zen कथांमधील zen कथा 'हाकुइन'ने परिवर्तन केलेल्या zen च्या जवळ जाणाऱ्या आहेत, त्यातील कथांशी नाते जोडणाऱ्या आहेत, असे माझे निरीक्षण आहे. आता उदाहरण म्हणून मूळ झेन कथेचा मराठी अनुवाद देतो. हा अनुवाद अभ्यासक कवी नितिन भरत वाघ यांनी केला आहे. त्यांच्या झेन या संग्रहात तो समाविष्ट आहे.

एका बोधिसत्त्वाने मानसोपचार तज्ज्ञांच्या गटाला झेन समजावण्याचे मान्य केले. ठरल्याप्रमाणे तो गट येऊन बसला. एका शिष्याने वंदन करीत विचारले,

''झेन म्हणजे काय, झेन काय आहे?'' बोधिसत्त्वाने एक केळे काढले, त्याचे साल काढून टाकले आणि खायला सुरुवात केली.

''बस, एवढेच?'' असं म्हणत शिष्य जागेवर येऊन बसला. दुसरा शिष्य उठला आणि जमलेल्या प्रेक्षकांना सांगू लागला,

''कुणाला काही प्रश्न विचारायचे असतील तर विचारून घ्या.''

प्रेक्षकातील एक जण उठून उभा राहिला आणि म्हणाला,

''मी या नमुन्याने समाधानी नाही. झेन काय आहे, नक्कीच शब्दात सांगता येईल. गुरुजींनी आम्हाला शब्दात सांगावे, झेन काय आहे ?''

बोधिसत्त्व म्हणाले, ''जर तुम्ही शब्दावर जोर देताय, आणि तसा तुमचा आग्रहच असेल तर सांगतो, झेन म्हणजे हत्ती आणि मुंगीचा संभोग होय.''



अनुक्रमणिका



झेनमध्ये उत्तरं नसतात. तो प्रश्नांनाच शून्य करून टाकतो. zen is no God , no Book , no Prophet.

झेनमध्ये आत्मनिष्ठतेची जाणीव ध्यानाद्वारे 'झाझेन' द्वारे कमी केली जाते. त्यासाठी काही वाक्यांचा म्हणजेच 'कोआन्स'चा ( KOAN) वापर केला जातो. कोआन म्हणजे कुठलेही तार्किक उत्तर नसलेली कोडी. कोआन गोंधळात टाकणाऱ्या भाषेत वाक्य, परिच्छेद असतात. ते अंतिम सत्याच्या जाणिवेकडे निर्देश करतात. कोआन नेहमीच्या तर्कशुद्ध अर्थाद्वारे सोडवता येत नाहीत. मनाच्या खोल स्तरावरच्या जागरूकतेत ते समजून घेता येतात. कोआनचा इथे उल्लेख करण्याचे कारण, माझ्या zen कथामध्ये अशी काही वाक्यं आहेत जी कोड्यात टाकतात; परंतु सत्याच्या जाणिवेकडे निर्देश करतात. कोआनच्या जवळ जातात. उदा. संग्रहातील शहात्तर क्रमांकाची कथा विराट वस्तूशी संवाद साधणारा माणूस, तो कोरा कागद नाही, भगवन! त्यावर सूर्याचा उजेड पडला आहे. zen नी ते चित्र स्वतःच्या समोर ठेवले. असा निर्देश करणारे सूर्योदयाचे चित्र ही कथा व्याऐंशी, कल्पनेचे पंख अठ्ठावीस, माझ्या zen कथामधील अशा काही कथा कोआनच्या जवळ जातात. सदृश वाटतात.

सहजता ही झेनची शिकवण आहे. आपली प्रत्येक हालचाल, कृती ही मनात काही उद्देश ठेवून केलेली असते. झेनला ते मान्य नाही. निरपेक्ष कृती तुम्हाला सहजता शिकवते. सहजतेत आनंद आहे. कृत्रिमतेत पीडा आहे. ती अपेक्षांनी भरलेली असते. सहजतेमध्ये तुम्ही जसे आहात तसे, जिथे आहात तिथे अभिव्यक्त होता, सहज. याचेही संकेत माझ्या zen कथा वाचताना मिळतात. एखादी गोष्ट मिळत नाही, साध्य होत नाही तेव्हा अडचणींना तोंड देताना संघर्ष न करता, निराश न होता सहजभावाने त्यातून मार्ग काढायला शिकले पाहिजे. झेन हा जगण्याचा आणि जगण्याकडे बघण्याचा डोळस असा सकारात्मक दृष्टिकोन आहे. याच संदर्भात एका मूळ झेन कथेचा सारांश देतो-

झेन गुरू आणि शिष्य जंगलात एका ओहोळाजवळ आले. ओहोळ वाहत होता. त्या ओहोळाच्या बाजूला थोडावेळ उभं राहिल्यानंतर गुरू म्हणाले, त्या वाहत्या पाण्याकडे बघ. ते दगडांना, खडकांना मारत नाहीये. विरोध करत नाहीये आणि निराश होऊन धावत नाहीये तर, दगडधोंड्यांच्या आजूबाजूने वाहत पाणी पुढे सरकते आहे. सतत प्रवाही होतंय. या पाण्यासारखा हो. सतत पुढे जा. दगडधोंड्यांचा विचारही मनात आणू नकोस. तुला एकतानता म्हणजे काय ते समजेल.

माणसाची वृत्ती सतत रडण्याची आहे. भोवती सर्वत्र पसरलेला आनंद त्याला वेचता येत नाही. त्यापेक्षा रडत बसणे त्याला सोपे वाटते. नकारात्मक विचारांनी माणूस तुडुंब भरलेला असतो. अशा माणसांना (शिष्यांना) झेन उभं करत नाही. एका झेन कवितेची आठवण होते-

**संधी मिळत नाही,**
**असे बोलून कसे चालेल?**
**मिळणारा प्रत्येक श्वास**
**जगण्याची संधीच देत असतो**
**त्याचे आपण काय करतो?**
**मी पाहतो माझ्या जगण्याकडे**
**आणि क्षणोक्षणी मिळणाऱ्या संधीकडे**
**मी तिचे सोने करतो की,**
**माती...**

माझ्या zen कथांमधील कथा म्हणजे केवळ करमणूक समजू नये. टाईमपास व्हावा म्हणून या कथा लिहिलेल्या नाहीत. मूळच्या झेन कथा ज्याप्रमाणे केवळ आणि केवळ अनुभवाधारित आहेत, तशाच अशोक बागवे यांनी लिहिलेल्या zen कथांनाही अनुभवाचा आधार आहे. हल्ली मुलांच्या बोलण्यात, पालकांच्या सांगण्यात गोष्टींना स्थान उरलेले नाही. त्या ऐवजी सलमानचे किती बंगले आहेत, कंगनाला अटक केली की नाही अशा गॉसिपचा फैलाव सर्वत्र दिसून येतो. अपवादाने कुणाच्या बोलण्यात स्वानुभवाची गोष्ट येते. जे बोलतात ते सगळे ऐकीव. स्वतःचे काहीच नाही. माझ्या zen कथा स्वतःकडे बघायला शिकवतात जशा मूळच्या झेन कथा संकेत देतात. झेन रिकामं व्हायला शिकवतो. आपण तर काठोकाठ तुडुंब भरलेलो असतो. अशा परिस्थितीत माझ्या zen कथा मुलांना सांगून, त्यांना वाचायला देऊन पालकांनी प्रत्येक कथेचा मुलांसमोर अर्थबोध खुला करावा. स्वतःकडे बघायचं म्हणजे काय? याचा बोध सोप्या भाषेत गमतीजमतीत मुलांना सांगितला तर, प्रत्येक जण नितांत अनुभवाचा साक्षीदार होईल. मुलांच्या अभ्यासक्रमात माझ्या zen कथांचा समावेश झाल्यास जीवन धारणेचे अनेक मार्ग खुले होतील. आपण रिकामं



झाल्याशिवाय ते शक्य नाही. तेवढी सहजता आपल्याकडे नाही. सतत बाहेर शोधत राहण्यापेक्षा स्वत:चा शोध घेणं आपल्याला जमणार नाही. पदोपदी उपदेशाचे डोस आणि सल्ला देण्याचं वाण वाटत फिरण्यापेक्षा सत्याचे संकेत लक्षात घेणं, आपल्याला अपमानास्पद वाटतं. गुरूपुढे शिष्याप्रमाणे नम्र होण्यापेक्षा अहंभाव कुरवाळत बसणं आपल्याला सोपं पडतं. zen बनण्यात किंवा zen समजावून घेण्यात असे अनेक अडथळे आहेत; परंतु त्या झेन कथेत सांगितल्याप्रमाणे आपण पाण्यासारखं वाहात राहायचं. दगडगोट्यांच्या अडथळ्यांनी थांबून राहायचं नाही. जो प्रवाहित आहे तोच टिकणार आहे आणि तोच झेनच्या मार्गाने जाण्याचा संकेत पालन करणार आहे.

**एक कथा सांगून रिकामा होतो**

गुरू अबा आपल्या अभ्यासिकेत ध्यानस्थ बसले होते.

त्यांना वंदन करून शिष्याने विचारले : गुरुजी तुम्ही एकशे अकरा zen कथा लिहिल्यात. त्याचे हे पुस्तक.

गुरू अबांनी उत्तर दिले : माहीत नाही.

शिष्याने पुन्हा प्रश्न केला : या zen कथा कितीजणांनी वाचल्या असतील?

गुरू अबा शांतपणे म्हणाले : माहीत नाही.

गुरू अबांना आनंदाप्रीत्यर्थ शिष्य म्हणाला : मराठी साहित्य क्षेत्रात तुम्ही स्वत:च्या zen कथा लिहिल्यात. ही मोठी कामगिरी आहे.

अबा म्हणाले : माहीत नाही.

शिष्य : साहित्यिक, समीक्षकांनी तुमच्या zen कथा वाचल्या असतील का ?

गुरू अबा विचलित न होता म्हणाले : माहीत नाही.

अस्वस्थ होत शिष्याने प्रश्न केला : गुरुजी, तुमचे उत्तर फक्त माहीत नाही असे का असते?

गुरू अबा म्हणाले : माहीत नाही.

शिष्य तत्परतेने म्हणाला: याचा अर्थ तुम्हाला काहीच माहीत नाही?

अबांनी तेच उत्तर दिले : माहीत नाही.

आपली परीक्षा घेतली जातेय हे न समजून शिष्याने प्रश्न केला : तुम्हाला माहीत आहे हे माहीत नाही की माहीत नाही हे माहीत आहे. किंवा गुरुजी असं तर नाही, तुम्हाला माहीत नाही हेच तुम्हाला माहीत नाही?

गुरू अबा शांतपणे उत्तरले : माहीत नाही.

ही zen कथा माझ्या अनुभवाची आहे. या कथेतून मिळणारा संकेत ओळखताना तुमचे उत्तर माहीत नाही असे जर असेल तर, तुम्ही zen च्या प्रवासाला निघाला आहात, असे नक्की समजा कारण माहीत नाहीचा दरवाजा उघडा असल्याशिवाय 'माहीत आहे'चा प्रकाश आत येणारच नाही.

टीप :

प्रस्तुत लेख लिहिण्यास मला, कवी राजीव जोशी, गौरी देवळे, अभ्यासक नितिन भरत वाघ, ओशोची प्रवचने यांचा आधार मिळाला.

नितिन वाघ यांच्या, झेन या पुस्तकाचा (आन्हान बुकस्मिथ प्रकाशन ) मी संदर्भ म्हणून उपयोग केला आहे.

**नारायण लाळे**
चलभाष: ९९८७९२४१९९
narayanlale@gmail.com



चुकीची दुरुस्ती
गेल्या अंकात दा.गो.काळे यांच्या काव्यसंग्रहाचे आरण्याहत असे चुकीचे नाव छापले गेले आहे, ते 'अरण्याहत' असे हवे.
चुकीबद्दल दिलगीर आहोत.



अनुक्रमणिका





# लोकशाहीर द. ना. गव्हाणकर

सौ. पूजा पराग सामंत

**लोकशाहीर द.ना.गव्हाणकर शाहिरी-काव्यावर भाष्य करणारा लेख.**

शाहिरी वाङ्मयाचे मूळ लोकसाहित्यात आहे असे म्हटले जाते. लोकसाहित्यांतर्गत ज्या लोककथा, जी गीते, जे लोकप्रकार आहेत. त्याच्यातून आशय, अभिव्यक्ती, सादरीकरण घेऊन आलेला हा वाङ्मय प्रकार आहे.

मराठी वाङ्मयाच्या इतिहासातील 'शाहिरी वाङ्मय' हा अत्यंत महत्त्वाचा वाङ्मयीन प्रवाह दिसतो. या प्रवाहामधून मराठी साहित्यात अगदी पहिल्यांदा लौकिक जीवनाचा आविष्कार झाला. मराठी संस्कृतीचे विविधांगी दर्शन घडले. लावणी, पोवाडा, तमाशा, लोकनाट्य हे शाहिरी वाङ्मयातील वैशिष्ट्यपूर्ण घटक आहेत.

मराठी शाहिरी वाङ्मयाने, मराठी रसिकांना एक आगळीच मोहिनी घातली आहे. शाहिरी वाङ्मयात मानवी मनाच्या विविध सवेदना, विविध कला, मराठी माणसाची जीवन जगण्याची दुर्दम्य आशा-आकांक्षा प्रकट झालेल्या आहेत. खरंतर संतकाव्य, पंतकाव्य आणि शाहिरी काव्य यांना आपण वेगवेगळे ठरवूच शकत नाही. परिस्थितीप्रमाणे जे काव्य बहरत गेलं, तेच संतांनी आपल्या अभंगातून आणि शाहिरांनी आपल्या शाहिरीतून व्यक्त केलं इतकंच. तशी शाहिरी काव्याची भाषा सर्व सामान्यांची, ग्रामीणांची बोली भाषा. आजपर्यंत भक्ती, अध्यात्म यांमध्ये रमलेली मराठी कविता या नवीन प्रवाहामुळे मुक्तपणे गावागावांत, चौकांत, उत्सवांतून, खेड्यातील यात्रांतून, जनसामान्यांच्या मनामनांतून वाहू लागली. केवळ दमल्या-भागल्या, कष्टकऱ्यांचे मनोरंजन करावे, आजूबाजूला पराक्रमाच्या गाथा रचणाऱ्या वीरांचे पोवाडे गावेत, समाजमनातील वेगवेगळ्या प्रकारचे सुख-दुःख, वास्तव यांचा आधार घेऊन समाजजीवनावरच बोलावे, असे करता-करता लोकांना हसवावे, त्यांना हिताचा उपदेशही करावा आणि त्यांना अंतर्मुख होण्यास भाग पाडावे, हेच शाहिरांचे काव्य प्रयोजन दिसते. त्यामुळेच शाहिरी वाङ्मयामधून समाजजीवनाचा, समाजेतिहासाचा आणि संस्कृतीचा बराच व्यापक आशय अभिव्यक्त होतो.

मराठी माणसावर शाहिरीचा विलक्षण प्रभाव आहे. खरंतर महाराष्ट्रातील मराठी मनाला टाळ, मृदंगाइतकेच डफ, तुणतुण्याचे वेड. लोकांच्या भावना, आकांक्षा, जिज्ञासा, स्वप्न याबाबतचे चित्र, कोणत्या ना कोणत्या रूपात शाहिरीत उमटलेले दिसते. शाहिरी मुळातच लोक-साधनेची अशी खास वृत्ती आहे. कोणत्याही काळातील शाहिरीचा अभ्यास केला तरी हे स्पष्ट होते, की प्रत्येक काळातील शाहीर हा लोकभावनेशी समरस होत आलेला आहे. धर्म अथवा अध्यात्माच्या काळचक्रात गुरफटलेल्या समाजाला पारलौकिक विश्वाकडून स्वत:कडे पाहण्याची दृष्टी दिली ती शाहिरी वाङ्मयानेच. आधुनिक शाहिरी वाङ्मयात तत्कालीन समाजजीवनाचे चित्रण

कल्पनारम्यतेपेक्षा वास्तववादी चित्रित होते.

शाहिरी कवितेतील विविधता, आशयघनता आणि रचनेमध्ये आलेला सोपेपणा ही वैशिष्ट्ये लोकपरपरेतून आलेली आहेत. लोकसंगीताचाही परिणाम शाहिरी वाङ्मयावर झालेला आहे. शाहीर द. ना. गव्हाणकर, शाहीर अण्णा भाऊ साठे, शाहीर अमर शेख, शाहीर आत्माराम पाटील, शाहीर विश्वास रावफाटे, शाहीर नानिवडेकर असे असंख्य शाहीर मराठी मातीवर, मराठी संस्कृतीवर, मराठी भाषेवर, मराठी अस्मितेवर प्रेम करणारे आहेत. शाहीर द. ना. गव्हाणकर यांनी ज्या वर्गासाठी काव्यनिर्मिती केली तो वर्ग खेड्यापाड्यांतून राबणारा कष्टकरी होता. अन्यायाविरुद्ध झुंज देण्यासाठी द. ना. गव्हाणकरांची काव्यशक्ती बहरास आली होती. लोकसेवेसाठीच त्यांनी शाहिरी केली. लोकमनाचे रंजन करायचे; पण लोकजीवन बदलण्यासाठी अंजनही घालायचे हा त्यांनी मनाला ध्यास लावून घेतला होता.

त्या काळात गोरगरिबांपर्यंत क्रांतीचे विचार नेण्याचे साधन होते, पोवाडा, लोकनाट्य. शाहीर गव्हाणकरांनी हे सर्व काव्य प्रकार आपल्या प्रतिभेतून लोकांपर्यंत नेऊन फार मोठी लोकजागृती केली. छायाचित्रकार, कवी, गायक अशा विविध भूमिकेत वावरले, लोकप्रिय झाले. लोकसेवेचे हे कार्य त्यांनी अखंडपणे केले. सारे आयुष्य समाजसेवेत घालवणारे गव्हाणकर थोडीथोडकी नव्हे तर चाळीस वर्षे शाहिरी करत होते. टाईम्स ऑफ इंडियाने म्हटले आहे की,

'डफावर थाप मारत काळजाला भिडणाऱ्या गगनभेदी आवाजाच्या शाहिरांनी घडवून आणलेल्या क्रांतीची साक्षीदार म्हणजे संयुक्त महाराष्ट्राची चळवळ.' संयुक्त महाराष्ट्राच्या चळवळीत गव्हाणकर यांनी आपले सर्वस्व अर्पण केले. 'लाल बावटा' या कलापथकाच्या माध्यमातून प्रबोधनातून लोकांना लढण्यास भाग पाडले. संयुक्त महाराष्ट्राच्या चळवळीमध्ये शाहीर गव्हाणकर, शाहीर अण्णा भाऊ साठे आणि शाहीर अमर शेख हे महत्त्वाचे शाहीर होते. त्यांच्याशिवाय चळवळ पूर्ण होऊच शकत नाही.

शाहीर द. ना. गव्हाणकर यांचा जन्म आजरा तालुक्यातील, महागोंडला एका ब्राह्मण मध्यमवर्गीय शेतकरी कुटुंबात २२ एप्रिल १९१५ रोजी झाला. कोल्हापुरात शालेय शिक्षण घेतल्यानंतर, राजाराम कॉलेजमधून इंग्रजी बी. ए. ही पदवी त्यांनी मिळवली. शाहीर गव्हाणकर यांना लहानपणापासूनच गायनाची आवड होती. पंधराव्या वर्षी शाहीर नानिवडेकर यांच्याशी त्यांची ओळख झाली आणि गव्हाणकर यांनी त्याच्याकडून शाहिरीचे धडे घेतले. यासंबंधात डॉक्टर माधव पोतदार म्हणतात, 'लहानपणीच कवितेचे बीज मनात पडले होते. त्या बीजाचे नवे रूप उभारण्यासाठी नानिवडेकरांचा शाहिरी बाणा पोषक ठरला होता.'

संयुक्त महाराष्ट्राचा लढा हे महाराष्ट्राच्या जीवनातले एक रोमांचकारी असे पर्व होते. यामध्ये जनतेला सावध करण्याचे काम महाराष्ट्रातील नेते, पत्रकार व शाहीर यांनी केले. या लढ्याचा कालखंड १९४८ते १९६०असा बारा वर्षांचा ठरला. शाहिरांनी आपले डफ सज्ज केले. ह्या लढ्यात शाहीर गव्हाणकर, शाहीर अमर शेख, शाहीर आत्माराम पाटील, शाहीर अण्णा भाऊ साठे, चंदू भरडकर, सिकंदर शेख असे असंख्य शाहीर सामील झाले.

शाहीर अमर शेख, शाहीर अण्णा भाऊ साठे, शाहीर गव्हाणकर, या तिघांनी मिळून १९४२ ते ४४ साली लाल बावटा कलापथकाची स्थापना केली. या तिघांनीही लोकनाट्य या माध्यमातून साम्यवादी विचार जनमानसात पोहोचवला.

लाल बावटातील लावणी, पोवाड्यांचे संगीत नुसते प्रसारित झाले नाही तर दत्ता गव्हाणकरांचे संगीत मराठी माणसाच्या कंठात पार रूतून बसले. यामुळे शाहिरीच्या विशिष्ट संगतीला व संगीताला एकाच वेळी विशेष बहर आला. अण्णा भाऊंच्या 'माझी मैना गावावर राहिली' या लावणीचे संगीत हे गव्हाणकरांचे होते. शाहीर गव्हाणकरांनी छक्कड प्रसिद्ध केली व ही लावणी मराठी मनात कायमची रूळवून टाकताना ती महाराष्ट्र लढ्याची एक 'धारच' बनवून टाकली होती.

संयुक्त महाराष्ट्राच्या चळवळीत शाहीर अण्णा भाऊ साठे यांनी लिहिलेले वग शाहीर गव्हाणकरांनीच बसवलेले होते. अण्णा भाऊंच्या गीतांना गव्हाणकरांनी अगदी सोप्या चाली लावल्या होत्या. लाल बावटा कला पथकाचे संघटन प्रामुख्याने गव्हाणकर यांनी केले होते, असे म्हटले जाते. यासंबंधात श्रीकांत लाड म्हणतात,

'शाहीर गव्हाणकर यांनी स्वतः शिकून अनेक

कलावंत शाहीर तयार केले. महाराष्ट्राच्या आजच्या अनेक कलापथकात त्यांचे कलावंत आढळतील.'

शाहिरी परंपरा गव्हाणकरांनी पुढे नेली, असे असले तरी त्यांनी आपल्या स्वतःचा असा शाहिरी ढंग मुळातच वेगळा असा ठेवला होता. एक तर ते शिक्षित होते, त्यामुळे काव्यशास्त्राशी त्यांची चांगली जवळीक झाली होती. त्यामुळे त्या अभ्यासाचा व काव्य ध्यासाचा उपयोग त्यांनी सादरीकरणासाठी चांगलाच केला. द. ना. गव्हाणकरांची जातकुळी ही माडगूळकरांशी आपलं नाते सांगते. लावणी, पोवाडा, संत काव्य यांचा चांगला अभ्यास असल्याने गव्हाणकरांनी आपल्या लोकनाट्यातून प्रासादिक अशा गीतांची, कवितांची रेलचेल केली आहे. कटाव, पोवाडा, लावणी हे सर्व शाहिरी प्रकार त्यांनी लोक भावनेच्या जागृतीसाठी चांगलेच उपयोगात आणले. मुख्यत: प्रवाहितता ही त्यांच्या सर्वच कवितांत एकवटून गेली आहे. गद्यापेक्षा पद्यात सांगणे गव्हाणकरांना अधिक सोपे वाटत होते. याची साक्ष त्यांची लोकनाट्ये देतात. पोवाडा नावाच्या कलाकृतीत तर त्यांनी काव्याची नुसती रेलचेल करून सोडली आहे. कमी शब्दांत अधिक आशय सांगणाऱ्या त्यांच्या कविता, गीतातील शब्द जन सामान्यांचा ठाव घेतात. प्रासादिकता, शब्द मोहकता आणि रचनेतील सुबकता या त्रिवेणी संगमावरच त्यांच्या काव्याचा सगळा डोलारा झुलत होता. त्यांचे काव्य जनमताची पकड घेणारे आणि प्रभावी होते. बंड्या दिवाण, मुंबईचा कामगार, शेतकऱ्यांची पंढरी, स्वर्ग लोकीचा बातमीदार, काई चालना गा, महाराजा ग्रामसिंह, ही सर्व लोकनाट्य आणि महाराष्ट्र वळुनी बघ जरा, अजरामर लेनिन, हुतात्म्यांना आवाहन, मोटकरी दादा, गड्या हे सवराज असलं रं कसलं, धरतीची लेकरं असे अनेक पोवाडे, गीतं गव्हाणकरांच्या प्रतिभेची साक्ष देणारी ठरतात.

महाराष्ट्र ही वीरांची भूमी आहे. छत्रपती शिवबांची भूमी आहे. म्हणजेच महाराष्ट्राला एक वेगळी अशी शौर्याची परंपरा आहे. याविषयी गव्हाणकर आपल्या लेखणीतून लिहितात.

शौर्याची तव परंपरा महाराष्ट्रा वळुनी बघा जरा,<br>
शिवबाच्या कीर्तीचे झडती चौघडे गड-किल्ले<br>
अजुनीही गाती पवाडे<br>
दरी खोरे वीरकथा सांगे पठारा १

तसेच,

वाजत-गाजत आलं जय जय गर्जत आलं<br>
आम्हा गरिबांच्या बोकांडी बसलं<br>
गड्या हे सवराज असलं रे कसलं

पारतंत्र्यात जखडलेली जनता थोडीशी मुक्त झाली, असं वाटलं तरी अजूनही बेडी काही सुटली नव्हती. उलट स्वराज्यात जीवन जगणंही कठीण झालं होतं. आपल्या काव्यातून गव्हाणकरांनी घेतलेला आढावा. यामध्ये सामान्य जनतेची केलेली फसवणूक चव्हाट्यावर मांडलेली दिसून येते. खरंतर गव्हाणकर यांनी अगदी मोजकेच साहित्य लिहिले आहे; पण ते साहित्य चिरंतन स्वरूपाचे आहे.

काई चालंना गा या वगनाट्यात शाहीर गव्हाणकर यांनी खेड्यातल्या शेतकऱ्यांचे दुःख मांडले होते. पोटासाठी शेतात राबणारा शेतकरी कसा, सावकार आणि सरकारकडून पिळला जातोय याचे ते कथानक होते. शाहीर गव्हाणकरांनी आपली सारी जीवननिष्ठा कष्टकऱ्यांप्रति वाहिली म्हणूनच काई चालना गा हे लोकनाट्य या दृष्टीने खूपच बोलके ठरले आहे. त्यांचे 'स्वर्गलोकचा बातमीदार' हे पोवाड्याचे पुस्तक ऑक्टोबर १९५० मध्ये प्रकाशित झाले. या पोवाड्याच्या माध्यमातून एका नारदाच्या भूमिकेतून भारताला स्वातंत्र्य मिळाल्यानंतरचा आढावा घेतला गेला आहे.

स्वर्गलोकावर अगाध घडती चमत्कार नाना<br>
एक त्यातला ऐकून घ्यावा विनंती सकलांना<br>
रंभा, किन्नर, यक्ष, मुनीवर सभेमधी होते<br>
स्वर्ग सुना भासला सुरेंद्रा, नारद मुनी नव्हते

शाहीर गव्हाणकर यांनी शेतकरी व कामगारांचे दुःख या पोवाड्यात मांडलेले आहे. शाहीर गव्हाणकर यांनी पौराणिक कथेचा आधार घेऊन नारद या पात्रामधून सामान्य जनतेची वेदना सांगितली आहे. आपल्या शाहिरी रचनांची मांडणी ते अगदी साधी, सोपी, सहजतेने आणि हृदयाला चटकन भिडेल अशीच करतात, हे त्यांचे वैशिष्ट्य आहे. शाहिरी परंपरेचे गाढे अभ्यासक डॉक्टर माधव पोतदार म्हणतात, 'शाहीर द.ना गव्हाणकर यांचा पोवाडा म्हणजे एका परीने त्यांनी भेदक नजरेने दाखवलेले खरेखुरे लोकनाट्य आहे.' लोकनाट्य का म्हणायचे? तर

लोकजीवनातला कारुण्यपूर्ण संघर्ष दाखवला आहे म्हणून; पण तो दाखवताना उपहासात्मक असे एक वेगळेच हत्यार वापरले आहे. लोकनाट्यात विनोदाला बराचसा वाव दिला जातो किंबहुना तो उत्स्फूर्त असतो. या पोवाडासदृश्य लोकनाट्यात गव्हाणकरांनी उपहासाचे मोठे हत्यार वापरले आहे. त्याचे नाते लोकनाट्याच्या प्रकृतीशी आहे; पण आधार मात्र बदलला आहे. तो घेतला आहे तोंडी लावण्यापुरता असा पुराणाचा.

पुढाऱ्यांची कवाली यामध्ये शाहीर गव्हाणकर त्या काळच्या महाराष्ट्रातील पुढाऱ्यांचे वास्तवच आपल्यासमोर ठेवतात.

वा, पुढारी महाराष्ट्राचे भले बहाद्दर, भलेभले
आम्हा लाभले बहुरूपी, बहुगुणी बहाद्दर, भलेभले
आणि शेवटी शाहीर गव्हाणकर म्हणतात,
विजयी करण्या द्विभाषिकाला
स्वार घोड्यावर झाले भले

तसेच शाहीर गव्हाणकर यांच्या शाहिरीचा ढंग हा मध्यमवर्गीय कामगार, शेतकरी यांच्या जीवनाचा वेध घेणारा आहे. धरतीची आम्ही लेकरं ही रचना त्यांची लोकप्रिय झाली. अगदी साध्या, सोप्या आणि सरळ भाषेमध्ये लिहिलेलं हे गीत. आम्ही सर्व धरतीची लेकरं असून, आम्ही कोणत्याही जाति-धर्माचे नसून, सर्व जण एकच आहोत.

धरतीची आम्ही लेकरं भाग्यवान
धरतीची आम्ही लेकरं
शेतावर जाऊया सांगाती गाऊया
रानीवनी गाती जशी रानपाखरं

अशा प्रकारे शाहीर गव्हाणकर रचनेतून एकतेचा, समानतेचा विचार मांडत होते. जातीवादाला दूर करत होते. त्यामध्ये जीवन परिवर्तनाची दृष्टी होती.

द. ना. गव्हाणकर हे आपल्या काव्यातून क्रांतीचा, बदलाचा, परिवर्तनाचा विचार पेरित होते. त्याचे कारण त्यांचे काव्य, त्यांचे गीत हे जननिष्ठेतून आकाराला येत होते, व जनतेला चेतवीत होते. धरतीच्या लेकरांना कवितेतून जी हाक दिली होती ती ऐक्यासाठी, एकजुटीसाठी, काळाचे आव्हान झेलण्याची ताकद लोकांत निर्माण करण्यासाठी. लोकमन बदलावे ही कवि मनाला लागलेली आच आर्ततेने, कणवेतून बाहेर येत होती. शाहीर गव्हाणकरांच्या अशा या रचना खऱ्या अर्थाने समाजाच्या बांधिलकीतून साकारलेल्या दिसतात. शाहीर द.ना गव्हाणकर यांनी ४० वर्षे आपले आयुष्य शाहिरीसाठी देऊनही, या उच्चशिक्षित शाहिराच्या साहित्याची आणि कर्तृत्वाची म्हणावी तशी दखल घेतली गेली नाही. खरतर शाहीर गव्हाणकर हे प्रयोगशील शाहीर होते. अनेक शाहिरी प्रकार त्यांनी हाताळले होते. शाहिरी परंपरेचे उत्तम ज्ञान, प्रभावी आवाज, तसेच प्रभावी सादरीकरण हे शाहीर गव्हाणकर यांचे वैशिष्ट्य होते. गव्हाणकर यांची शाहिरी केवळ रंजन करताना वर्णनात्मक किंवा विडंबनात्मक न राहता ती संघर्षशक्तीला जागृत करणारी होती. हे असे त्यांचे मौलिक स्वरूपाचे योगदान म्हणावे लागेल.

संदर्भ :-


१. लोकशाहीर द. ना. गव्हाणकर - डॉ. माधव पोतदार
२. संयुक्त महाराष्ट्राच्या लढ्यात शाहिरांचे योगदान - डॉ. माधव पोतदार
३ युगांतर - रणजित देसाई (न उलगडणारं कोडं)
४. हस्तलिखित - प्रतिमा नेवाळकर
५. शाहीर अमर अण्णा - डॉ. माधव पोतदार
६. श्रीमान योगी - रणजित देसाई
७. मुंबईसह संयुक्त महाराष्ट्राचा लढा - प्र. के. अत्रे
८. अमर अण्णा गव्हाणकर यांचे नवे पर्व - डॉ. माधव पोतदार
९. अखेरचा हा तुला दंडवत - गौड ब्राह्मण (एप्रिल १९७१)
१०. अण्णा भाऊ विशेषांक - शाहीर आत्माराम पाटील - सुगावा अंक
११. समाजवादाचे शाहीर कै. द.ना. गव्हाणकर (लोकसत्ता ३० मार्च १९७१) - श्रीकांत लाड



**सौ. पूजा पराग सामंत**
सिंध सोसायटी, औंध, पुणे.
चलभाष : ९८८१४६२१८२
poojasamant@yahoo.com

















# पटेली-
# तथात्वभावाचा शोध

भास्कर ढोके

**मराठी कादंबरीविश्वात वेगळ्या धाटणीची कादंबरी म्हणून 'पटेली'ची चर्चा होत आहे. अविनाश उषा वसंत यांच्या 'पटेली' या कादंबरीची रूप-वैशिष्ट्ये विशद करणारा लेख.**

कादंबरी हा साहित्यप्रकार 'ऑक्टोपस' या प्राण्यासारखा आहे किंवा लीळाचरित्रातील हत्ती आणि आधळ्यांच्या कथेसारखा. तिचे एकच रूप सांगता येत नाही. ती काळाला कवेत घेत बदलत राहते. नवनवे वळण घेत राहते. तिचा घाट आणि रूप बाहेरून लादता येत नाही. पुरामध्ये नदी जसे स्वतःचे वळण घेत वाहते त्याचप्रमाणे कादंबरी स्वतःच्या प्रवाहाच्या रेट्यात वाहते म्हणूनच कादंबरीचा रूपशोध ही अवघड गोष्ट असते. पटेली ही अविनाश उषा वसंत यांची अशीच स्वच्छंद वळण घेत वाहणारी कलाकृती आहे.

पटेली ही वास्तववादी कादंबरी आहे की, अस्तित्ववादी? अतिवास्तववादी आहे की, संज्ञाप्रवाही? असे अनेक प्रश्न ती उभे करते. वेगवेगळ्या अंगांनी तिचे विश्लेषण करूनही ती चिमटीत सापडत नाही, याचे कारण ती पठडीबाज कादंबरी नाही, तर कादंबरीचे एक नवेच आविष्कार रूप आहे. ती आविष्काराच्या, आशयाच्या नव्या शक्यता शोधते. ती नव्या, तंत्रज्ञानस्नेही पिढीची मनमानी आहे; पण ही मनमानी दखलपात्र आहे. समुद्र हा मुंबईतील गिरणी कामगाराचा चाळीत राहणारा, अभियांत्रिकीचे शिक्षण घेतलेला तरुण हा या कादंबरीचा नायक. खरेतर नायक ही संज्ञा समुद्र या पात्राचे वर्णन करण्यासाठी पुरेशी नाही. तो नायकही नाही आणि न नायकही नाही. त्याला संज्ञेत पकडण्यापेक्षा मुळातून समजून घेणे महत्त्वाचे कारण तो प्रतिनिधी आहे समकालाचा. समुद्र मुंबईकर असला, चाळीत राहत असला तरी तो केवळ महानगराचा प्रतिनिधी नाही कारण त्याचे मूळ खेड्यात रुजलेले आहे. अध्यात्मात जसे शरीराचे भोग अवताराला भोगावे लागतात तसे समुद्रच्या महानगरीय अवताराला शरीराला त्याचे भोग भोगावे लागतात. एकटेपण हे या भोगाचे सगळ्यात भयानक रूप असते. त्याला समुद्रही अपवाद नाही.

निवेदनाचे वेगळेपण हे या कादंबरीचे एक महत्त्वाचे वैशिष्ट्य आहे. या कादंबरीचा नायक हा नव्या माहितीच्या महास्फोटात जन्माला आलेला आहे. माहिती आणि तंत्रज्ञानाच्या युगाचा वेग हा त्याच्या जगण्याचा अपरिहार्य घटक आहे. समाजाशी आभासी माध्यमातून जोडल्या जाणाऱ्या पिढीची तांत्रिक, व्यामिश्र भाषा ही त्याचीही भाषा आहे. माणूस काळाच्या ओघात आविष्काराची वेगवेगळी साधनं शोधून काढतो त्या त्या काळात ती आविष्कार माध्यमं प्रचलित असतात. चित्रपट हे आविष्काराचे तांत्रिक माध्यम. या माध्यमाचा भारतीय जनमानसावर मोठा प्रभाव आहे. त्यात आता आंतरजालाच्या तंत्राने क्रांतीच केली आहे. समाजमाध्यमे ही या क्रांतीची अपत्ये आहेत. माध्यम बदलले की, त्याचा

आविष्काराची शैलीही बदलते त्याप्रमाणे ऑर्कुट, फेसबुक, इत्यादी माध्यमांतून व्यक्त होणाऱ्या पिढीचीही एक नवी आविष्कार शैली निर्माण झाली आहे किंवा ती उत्क्रांत होत आहे असेही म्हणता येऊ शकते. तर ही उत्क्रांत होत असलेली भाषा ही या कादंबरीची भाषा आहे.

चित्रपट या माध्यमाचा आणि त्याच्या सादरी करणाच्या तंत्राचा प्रभाव हे या निवेदनाचे दुसरे वैशिष्ट्य. चित्रपट ज्याप्रमाणे दृश्य आणि चौकटीमध्ये (फ्रेम) बसवलेला असतो तशी ही कादंबरी ६२ चौकटींमध्ये आपल्यासमोर सादर होते. त्यातली प्रत्येक फ्रेम किवा चौकट समाजाविषयीचे चिंतन व्यक्त करते आणि प्रश्नही उपस्थित करते. मूलभूत प्रश्न उपस्थित करणे हे या कादंबरीचे आणखी महत्त्वाचे वैशिष्ट्य आहे.

चित्रपट हे प्रामुख्याने करमणूकप्रधान माध्यम असले तरीही त्यातून आपल्या समाजाचे दर्शन होतच असते. पटेलीच्या निवेदनात या माध्यम तंत्राचा प्रभाव जसा दिसतो तसा तो विचार करण्याच्या पद्धतीतही दिसतो. कादंबरी चित्रपटातील तुकड्याप्रमाणे पुढे जाते तशी त्याची विचार प्रक्रियाही. समुद्र सतत सभोवती घडणाऱ्या घटितांना, स्वतःला चित्रपटाच्या आभासी जगाशी जोडण्याचा प्रयत्न करतो. त्याच वेळेस तो समाजाचे मूल्यमापन करतो आणि जीवनविषयक भाष्यही करतो.

समुद्रच्या जीवनविषयक चिंतनाला आणि भाष्याला विविध कंगोरे आहेत. ही कादंबरी मुंबईच्या पार्श्वभूमीवरची असली तरी ती केवळ मुंबईची किंवा महानगराची कादंबरी नाही. तिच्यात समुद्र आहे, चाळी आहेत, लोकल आहे आणि तरीही ती महानगरीय कादंबरी आहे असे म्हणता येत नाही कारण तिचा अवकाश व्यापक आहे. ती केवळ एका शहराच्या चौकटीत बसत नाही. डोळे झाकले की, त्याला गाव दिसते. 'गावाचा हिरवागार वाटणा दिसला. बाप शेतात काम करतोय. माय शेर्डीचं दूध काढतेय. खिल्लारी भगाण्या दिसला. म्हाताऱ्याचं सपर दिसलं.' (पृ.१४) हे असं अस्सल ग्रामीण चित्र दिसणं हे त्याच्या दोलायमान वृत्तीचे प्रतीक आहे. तो शहरात राहतो; पण शहरी नाहीय. महानगरात असूनही महानगरी नाही. तो समाजमाध्यमांवर व्यक्त होतो; पण त्याचे व्यक्त होणे हे चमको किंवा उथळ नाही. त्याच्या व्यक्त होण्यात केवळ प्रासंगिकता नाही तर त्यात एक सातत्य आहे. तो सतत तार्किक आणि भावनिक यांच्या बेचक्यात सापडलेला असतो. फेसबुकचा अल्गोरिथम आत्मकेंद्री आहे असे त्याला वाटते. तो म्हणतो 'इथला प्रत्येक जण लाईकच्या हव्यासापोटी डोपामाईनशी खेळत राहतो; पण तिच्या बक्षिसांच्या फोटोपेक्षा तिच्या स्विमिंग कॉस्च्युमच्या फोटोंना जास्त गर्दी होती.' (पृ.२३) इथे तो मानसशास्त्रीय संकल्पना वापरून पिढी कशी क्षुद्र गोष्टीत आनंद शोधते हे दाखवतो, आणि समूहाच्या लीबिडोकडेही लक्ष वेधतो.

निवेदनाच्या ओघात सतत काही ना काही भाष्य करत राहणे हे या कादंबरीचे अत्यंत महत्त्वाचे वैशिष्ट्य आहे. चित्रपट, नाटक, समाज, शिक्षण, मध्यमवर्ग, गिरणी कामगार, चाळसंस्कृती, साहित्य आणि समाज असे अनेक विषय हे त्याच्या चर्चेचे आणि चिंतनाचे विषय आहेत. या विषयांवरील त्याचे भाष्य हे निवेदनाच्या ओघात आलेले असले तरी त्यातील चिंतन आणि ठामपण जाणवत राहते.

**समुद्र हा गिरणी संपात बेरोजगार होऊन गावाकडे शेती करायला गेलेल्या गिरणी कामगाराचा मुलगा आहे. त्याने डोळ्यादेखत उद्ध्वस्त झालेल्या गिरणी कामगारांचे संसार पाहिलेले आहेत. या कादंबरीत पार्श्वभूमीवर सतत गिरणी कामगार, चाळीत राहणारा मध्यमवर्ग, त्यांचे प्रश्न यांची चर्चा येते; पण ती केवळ वरवरची नाही, समुद्र या सगळ्याच्या मागची पार्श्वभूमी तपासण्याचा प्रयत्न करतो. वाताहतीच्या कारणांचा शोध घेऊन त्याची मीमांसा करतो. गिरणी कामगार – संप या सगळ्या घटकांकडे पाहण्याची त्याची दृष्टी एकतर्फी किंवा आवाजी नाही. तो चिकित्सा करतो. कोकणी माणूस आणि शिवसेनेचा परस्पर संबंध, डाव्या कामगार संघटनांची झालेली पीछेहाट, कामगारांचे प्रदेशनिहाय झालेले स्थलांतर याच्यावर सूचक भाष्य करतो.**

जातिव्यवस्था हे भारतीय समाजाचे खास असे वैशिष्ट्य. कादंबरीसारखा साहित्यप्रकार हाताळताना जातिव्यवस्था कळली नाही, तर इथले समाजमन समजणे जवळजवळ अशक्य असते. जातसंस्थेवर ही कादंबरी करत असलेले भाष्य फार महत्त्वाचे आहे. महाराष्ट्रात आणि मराठी साहित्यात ब्राह्मण आणि ब्राह्मणेतर संघर्ष तसा जुनाच आहे, त्याला महात्मा फुलेंपासून एक इतिहास आहे. अलीकडे तर त्या संघर्षाला राजकीय किनारही लाभू लागली आहे. सगळ्याच जातींच्या अस्मिता टोकदार होत आहेत. त्यामुळे साहित्यातून जातीवर भाष्य करणे जोखमीचे झाले आहे. असे असले तरी लेखकाने वास्तवाला भिडायला हवे. चिकित्सा करायला हवी ही अपेक्षा काही अंशी का होईना हा लेखक पूर्ण करतो. उदा. देशस्थ ब्राह्मणांवर भाष्य करताना तो म्हणतो, 'ब्राह्मणांनी महाराष्ट्राची कौटुंबिक स्थिती पार कॉम्प्लीकेटेड करून टाकलीय. मराठे, माळी, धनगर, वंजारी महाराष्ट्रातील डॉमिनेटेड पण सहसा एकमेकांशी रोटी-बेटी करत नाही. ब्राह्मणानी सगळ्यांशी केले. तरी ब्राह्मणच वाईट; पण कॉम्प्लीकेशन वाढवले, संस्कृती कॉम्प्लीकेशन, पुरोगामी म्हणवून घेतले; पण जात सोडली नाही. (पृ.९५) महाराष्ट्रातील सगळ्याच ब्राह्मणेतर जाती आणि पुरोगामी एकीकडे ब्राह्मणांना शिव्या देत असतात; पण त्यांची जात मात्र सुटत नाही. बेटी व्यवहाराच्या वेळेस त्यांच्यातील जातभान जोरदार उसळी मारून येते, या कटू वस्तुस्थितीवर नेमके बोट ठेवले जाते. महाराष्ट्रातील ब्राह्मणांची चर्चा करताना गांधी हत्येचा संदर्भही विचारात घ्यावाच लागतो. इथे लेखकाने थेट गांधी हत्या आणि त्यानंतर झालेल्या ब्राह्मणांवरील हत्येची चर्चा केलेली नसली तरी त्यावर सूचक भाष्य करत ब्राह्मण समाजातील आंतरिक उतरंडीकडे लक्ष वेधले आहे. तो म्हणतो, 'देशस्थ ब्राह्मणांचा एक वेगळा आयडेंटिटी क्रायसिस आहे. ते कधी होते एवढे सनातनी. त्यांना गांधी हत्येनंतर ब्राह्मण म्हणून आयडेंटिटी मिळवायची असेल, तर चित्पावनाइतके सनातनी व्हावे लागेल.'(पृ.१३६)

समुद्र हा गिरणी संपात बेरोजगार होऊन गावाकडे शेती करायला गेलेल्या गिरणी कामगाराचा मुलगा आहे. त्याने डोळ्यादेखत उद्ध्वस्त झालेल्या गिरणी कामगारांचे संसार पाहिलेले आहेत. या कादंबरीत पार्श्वभूमीवर सतत गिरणी कामगार, चाळीत राहणारा मध्यमवर्ग, त्यांचे प्रश्न यांची चर्चा येते; पण ती केवळ वरवरची नाही, समुद्र या सगळ्याच्या मागची पार्श्वभूमी तपासण्याचा प्रयत्न करतो. वाताहतीच्या कारणांचा शोध घेऊन त्याची मीमांसा करतो. गिरणी कामगार – संप या सगळ्या घटकांकडे पाहण्याची त्याची दृष्टी एकतर्फी किंवा आवाजी नाही. तो चिकित्सा करतो. कोकणी माणूस आणि शिवसेनेचा परस्पर संबंध, डाव्या कामगार संघटनांची झालेली पीछेहाट, कामगारांचे प्रदेशनिहाय झालेले स्थलांतर याच्यावर सूचक भाष्य करतो. ते असे 'मी चुत्या आहे; पण बाप चोवीस तास राबतोय. पाच वावर, त्यात उरकत नाही. ढीगभर कर्ज आहेत. पोट त्याला महत्त्वाचे वाटते. शिकू नको बोलतो. मिलमध्ये होता. प. महाराष्ट्रातले गावाला गेले. जमिनी होत्या. कोकणातले इथेच राहिले. ज्यांना नव्हत्या जमिनी त्यांनी वडापाव टाकले. पोरे भाईगिरी करत होते वा शंभूसेनेत दिवस काढत होते. त्यावेळच्या पक्षांनी बरोबर टार्गेट केले ह्या कोकणी लोकांना. स्थानिक पक्षांचा आवाका शहरांच्या पलीकडे जात नाही. शहरांच्या मध्यमवर्गीय अस्मितेच्या वर चालतात ही फक्त, मुंबईच्या कोकणी लोकांमुळे कोकण, बाकी त्यांना कोण विचारते? नामांतरावेळी मराठवाड्यात स्पेस तयार केली; पण सब मिलीभगत आहे... ह्या देशात जातीवर चालते राजकारण. (पृ.२८) मुंबईतल्या मध्यमवर्गीयांना चुचकारण्यासाठी चाळींचे रीडेव्हलपमेंट हा राजकारण्यांचा आणि उद्योगपतींचा नवा खेळ झालेला, चित्रपटाने चाळीचे उदात्तीकरण केलेले. चाळीत राहतो बोलणारे भाई असतात, त्यांच्याकडे हॉकी स्टिक असते... गणपती व सत्यनारायण वर्गणी पॉवर हाऊस झाला. सेनेला बरोबर कळाला. साई भंडाऱ्याने कुळांग्र पेटवले. सगळे भाई सबका मलिक एक झाले. शिर्डीला रामनवमी तेजीत आली हे संपानंतरच. डावे नेहमी दोष देतील इतर पक्षांना पण बहुजन नेतृत्व देऊ शकले ना त्यांच्या डोक्यात हवा भरू शकले. मिल कामगारांच्या ताब्यात हव्या ह्या हुच्च स्वप्नात पिढी संपली, मिला जळाल्या, भांडवलशाही अमर झाली.(पृ.१८१) हे भाष्य आतापर्यंत आलेल्या महानगरीय कादंबऱ्यांतील विश्लेषणापेक्षा वेगळे आणि वास्तवाच्या जवळ जाणारे. भांडवलशाहीचे नवे रूप, शोषणाचे नवे मॉडेल, मध्यमवर्गीय मुंबईचे सामाजिक

आणि सांस्कृतिक दर्शन, चाळींची कारकुनी, कष्टकरी अशी विगतवारी मराठी कादंबरीत अपवादात्मक आहे.

मुंबईत राहणारा बहुतांश मराठी माणूस मध्यमवर्गीय किंवा कामगारच आहे. समुद्र हा याच मध्यमवर्गाचा प्रतिनिधी आहे आणि तोही मध्यमवर्गीय मनोवृत्तीचाच असल्याने त्याला उच्चवर्गाचे वाटणारे आकर्षण आहे कौतुक आणि असूयाही आहे. नर्मदेच्या पलीकडचा आणि कावेरीच्या अलीकडचा न धड आर्य आणि न धड द्रविड म्हणून येणारा न्यूनगंड आय.टी.सारख्या क्षेत्रात काम करणाऱ्या मराठी माणसात कसा घुसलेला आहे हे दाखवतानाच तो मराठी माणसाच्या वांशिक आणि सांस्कृतिक न्यूनगंडाकडे लक्ष वेधतो. रंग दे बसती या चित्रपटाच्या निमित्ताने त्याने भारतातील वर्गव्यवस्थेची केलेली चिरफाड तर अत्यंत वेधक आहे. गरिबाची पोरं मिल्ट्रीत जातात... श्रीमंतांचं देशप्रेम एअर फोर्समध्ये असे. पोट भरलेले मधले होतात. पोट न भरलेले मूलतत्त्ववादी होतात. (पृ.२८) पुरोगामी हा शब्द एलिट लोकानी एलिटांची बाजू मांडण्यासाठी तयार केला आहे, असे तो म्हणतो.

हेमा, गझल आणि ऊर्जा ह्या पटेलीतील तीन महत्त्वाच्या स्त्रिया. हेमा ही गझलची आई. घटस्फोटीत किंवा नवऱ्यापासून विभक्त झालेली स्वावलंबी. ऊर्जा ब्राह्मण कुटुंबातील समुद्रच्या प्रेमात पडून त्याच्याशी लग्न केलेली; पण स्वतंत्र विचारांची करिअरिस्ट. यात प्रेमाचा त्रिकोण आहे . तो भावनिक कमी आणि बौद्धिकच जास्त आहे. या निमित्ताने येणारी स्त्रीपुरुष संबंध, स्त्रीवाद, गौरी देशपांडे यांच्या साहित्यातून दिसणारा स्त्रीवाद, त्यांच्या साहित्यातील स्त्रिया अशी साहित्यिक आणि सामाजिक चर्चाही येते. समुद्रबरोबर लग्न करून चाळीत राहायला आलेली ऊर्जा 'माझे बाळ शंभर फुटामध्ये जन्माला येणार नाही' असे म्हणते तेव्हा अरविंद गोखले यांच्या मंजुळाची आठवण झाल्याशिवाय राहत नाही. या कादंबरीतील स्त्रिया हा एक स्वतंत्र चर्चेचा विषय आहे. समुद्रची श्रीयाकडे पाहण्याची एक दृष्टी आहे, आणि ती पुरुषी नाही. 'बाईने दुःख सोडू नये. ती नेहमी मुक्त असते. केवळ बाईच मुक्त होऊ शकते. दुःख सोडवण्याच्या नादात त्या मुक्त व्हायच्या विसरून जातात.' (पृ.१२७) हे भाष्य एकदम तत्त्वचिंतनाच्या पातळीवर जाते. तत्त्वचिंतन, शाश्वताचा शोध आणि सभोवतालच्या परिस्थितीवर थेट भाष्य हे पटेलीचे वैशिष्ट्य आहे. उदा. शेतकऱ्याच्या मानसिकतेवर भाष्य करताना तो म्हणतो की, 'ह्या गावगाड्यातल्यांना शेजारचा तुकडा घ्यायलाच पाहिजे म्हणजे सर्वशक्तिमान असल्याचा फील येतो. ते विकायला काढले, तर ते घेण्यासाठी घरातले चमचा वाटी सर्व विकतील; पण बांधावरचा तुकडा घेतल्याशिवाय राहणार नाही... तुकडा घेणे हे त्यांचे आदिम स्वप्न असते. ते गुंठ्याचे का असेना.' (पृ.१०८), 'चांगल्या घराच्या नावाखाली मध्यमवर्गीयांचे जेवढे शोषण केलंय तेवढे कशानेच केले नाही.' (पृ.११०), 'संरक्षणाच्या एक टक्के खर्चात म्यान्युअल स्कॅवेंजिंग बंद होईल.'(पृ.१५३), 'स्वच्छ भारताची सुरुवात वाल्मिकी नगरातून होते; पण सेल्फीसाठी रस्ते झाडणारे संडास धुतांना कधी दिसले नाहीत. कॉमन संडासातले त्यांचे सेल्फीही चालले असते.' (पृ.१५५), किंवा 'भेंचो तुम्ही गांधीबाबा, सानेगुरुजी साला आम्ही म्हणजे गवळी भाई.'(पृ.८१)

चित्रपट, समाजमाध्यमे, राजकीय, सामाजिक, महानगरी, सांस्कृतिक भाष्य करत असतानाच पटेली साहित्यावरही भाष्य, शेरेबाजी करते. केवळ माहितीच्या जीवावर मराठीत लेखक म्हणून मिरवता येते किंवा किस्सेही लेखकराव बनवते. ही त्याची काही उदाहरणे. ही कादंबरी वाचत असताना अनेक ठिकाणी किरण नगरकर यांच्या सात सक्क त्रेचाळीसची, चिं.त्र्यं. खानोलकर, अरविंद गोखले यांच्या कथांची, नेमाडेंच्या कोसलाची आठवण आल्याशिवाय राहत नाही.

पटेली नेमाडे, ढसाळ, बागुल, मुक्तिबोध, तुकाराम यांचा मागोवा घेत काही भाष्य करण्याचा, स्वतःचा जगाचा शोध घेण्याचा प्रयत्न करते. तत्त्वज्ञानाच्या भाषेत तथात्वभावाचा शोध घेण्याचा प्रयत्न करते.

**भास्कर ढोके**
१-परफेक्ट पार्क, आयटीआय-कमरवाले लिंकरोड,
हॉटेल योगेशच्या मागे, खुरवडनगर, नाशिक-४२२०९८
चलभाष:९४२३०८१०४६
bhaskar112@gmail.com

◈◈



कातकारी समाजजीवनावरील रामचंद्र नलावडे लिखित 'लाडी' या कादंबरीची समीक्षा करणारा लेख.

# लाडीः कातकरी समाजजीवनाचे वास्तव चित्रण करणारी कादंबरी

प्रा. मिथुन शेळके

भटक्या-विमुक्तांच्या साहित्यामध्ये रामचंद्र नलावडे यांचे साहित्य महत्त्वपूर्ण मानले जाते. भटक्या समाजातील विविध प्रश्नांबरोबरच प्रस्थापित समाजातील विविध प्रश्न त्यांनी कथा, कादंबरी, आत्मकथन, अनुभव कथन, व्यक्तिचित्र, संशोधनपर ग्रंथ यांसारख्या विविध साहित्य प्रकारांतून मांडलेले आहेत. रामचंद्र नलावडे यांची आजपर्यंत २९ एकूण पुस्तके प्रकाशित झालेली असून 'रास' ही कादंबरी प्रकाशित होण्याच्या मार्गावर आहे. रामचंद्र नलावडे यांची 'लाडी' ही कादंबरी सुविद्या प्रकाशनाने २६ जानेवारी २००७ साली प्रकाशित केली असून ही कादंबरी एकूण २२५ पृष्ठांची आहे. लाडी या कादबरीत कातकरी समाजाचे जीवन वास्तव स्पष्ट होते.

लाडी ही कादंबरी लाडी, चंद्र्या, शंकऱ्या, जाल्या, झिल्या, रघू कोतवाल, नाम्या, धर्म्या, सावळ्या, शिरप्या, परशा, नेवऱ्या, काळू, दगडू, दळवी साहेब, पांडू गुरव, जाणू, सजनू, सदू पिंपळकर, लक्ष्मण, विठू माळी, कांबळे बाई, मैनाबाई, शिरपा, गोंद्या यांसारख्या विविध व्यक्तिरेखांमधून साकारते. लाडी ही या कादंबरीमधील मुख्य व्यक्तिरेखा आहे. कातकरी समाजात जन्म घेतलेल्या लाडीच्या वाट्याला अगदी लहानपणापासूनच कष्टमय जीवन वाट्याला येते. लाडीची आपल्या वडिलांवर असलेली माया, वडिलांनी दारू पिऊ नये म्हणून लाडीचा असलेला प्रयत्न या कादंबरीत पाहायला मिळतो. कातकरी समाजातील तरुण मुलींना फसवून त्यांचे शारीरिक शोषण करणाऱ्या तुळशा कंत्राटदाराचा ती नेहमी तिरस्कार करत असे. लग्न झाल्यानंतरही लाडीच्या जीवनातील कष्टमय प्रवास संपलेला नसतो. नवरा दारुड्या असल्यामुळे तिला कुटुंब चालवण्यासाठी स्वतः काम करण्याची वेळ येते. लाडीची आपल्या वडिलांप्रमाणेच सासऱ्यावरदेखील खूप माया होती. सासरा आजारी पडल्यानंतर त्याला आजारातून बरे करण्यासाठी लाडीने अनेक प्रयत्न व उपाय केलेले असतात. मात्र तिला यामध्ये यश मिळत नाही. सासऱ्याच्या निधनानंतर लाडीला खूप दुःख होते. लाडीच्या सौंदर्य, रूपाचे वर्णनदेखील या कादंबरीत येते. एकूणच ही कादंबरी कातकरी समाजातील लाडीच्या धाडसी स्वभावाचे, कष्टाचे, संघर्षाचे वर्णन करते.

लाडी ही लाडी या कादंबरीतील मुख्य व्यक्तिरेखा असली तरी लाडी या व्यक्तिरेखेबरोबरच कातकरी समाजाचे जीवन अधिक प्रभावीपणे या कादंबरीत चित्रित होते. सरकारी नियमांचा; कातकरी समाजाला सहन करावा लागत असलेला; परिणाम लाडी या कादंबरीत व्यक्त होतो. प्राणी मारण्यासाठी सरकारने बंदी घातल्यानंतर फॉरेस्ट अधिकारी कातकरी समाजाला जंगलात फिरण्यास मनाई करतात. तेव्हा आपल्या मनातील खंत व्यक्त




करताना शंकऱ्या कातकरी झिल्या कातकऱ्याला म्हणतो, "म्हाताऱ्या आता आपुलं कसं रं व्हायचं? आज्या-पंज्यापासनं ह्या जंगलानं आपल्याला ल्हानाचं मोठं केलं. झाडा-झुडुपांनी आपल्यावर मायेची सावली धरली. कड्या-कपाऱ्यातील किडा-मुंगी, जन-जनावरांन ही काया वाढवली आन आता ह्यो खाकी कपड्यातला साहीब म्हणतुया की उंद्यापास्नं जंगलात दिसला तर एकेकांम्री गोळ्या घालीन. काजऱ्याच्या बिया खाऊन मरायची पाळी आली आता." पृ.क्र-१९

कातकरी समाजातील स्त्रियांची असुरक्षितता लाडी या कादंबरीत स्पष्ट होते. सावळ्या कातकऱ्याची सून लाकडं गोळा करण्यासाठी जंगलात जाते तेव्हा फॉरेस्ट अधिकारी तिच्यावर बलात्कार करून कातकरी समाजाला बंदुकीचा धाक दाखवून त्या ठिकाणाहून निघून जातात. तसेच सजनु कातकऱ्याची मुलगी गावातील सरपंचाच्या घरी गुरे राखण्याचे काम करत असते. एक दिवस सरपंच तिच्या मजबुरीचा फायदा घेऊन तिच्यावर बलात्कार करतो. पोलिसांना सांगितले, तर तुमच्या झोपड्या पेटवून देईन अशी धमकी तो कातकरी समाजाला देतो. यांसारख्या कातकरी समाजातील स्त्री व्यक्तिरेखांमधून कातकरी समाजातील स्त्रियांची सुरक्षितता लाडी या कादंबरीत स्पष्ट होते. त्याचप्रमाणे कातकरी समाजातील स्त्रियांचे कष्ट, त्यांना सहन करावा लागणारा अन्याय, अपमान, त्रास याचेही चित्रण लाडी कादंबरीत होते.

कातकरी समाजात असलेली माणुसकी लाडी या कादंबरीत स्पष्ट होते. गावातील सरपंचाने कातकरी समाजाला अनेक वेळा त्रास दिलेला असतो. त्यांचा अपमान केलेला असतो. मात्र जेव्हा गावातील यात्रेच्या वेळी डुक्कर सरपंचाला मारून त्याच्या शरीराचे धड जंगलात घेऊन गेलेले असते, तेव्हा ते शोधण्यासाठी आलेल्या गावातील नाऱ्या सुताराला व इतर लोकांना कातकरी समाज सरपंचाविषयीचा आपला राग विसरून मदत करण्याचे ठरवतात. तेव्हा झिल्या कातकरी आपल्या सहकाऱ्यांना म्हणतो, "आपल्या गावच्या सरपंचाला देवानं दरबारात बलवून घेटलंय. लई वंगाळ झालं. त्याचं धड डुकरान जंगलात आनुन टाकलंय. आपुन ते हुडकून देवू चला. झालं गेलं मागचं काय मनात ठिवायचं न्हाय. आपण गावकऱ्यांना मदत करूया." पृ.क्र. ६७ -तसेच कातकरी समाज गावच्या सांगण्याप्रमाणे वागत नसेल, तर त्याला अनेक वाईट अनुभव व परिणामांना सामोरे जावे लागते याचा प्रत्यय लाडी या कादंबरीत येतो. कातकरी समाज गावाने ठरवलेल्या मिटिंगला उपस्थित राहिला नाही म्हणून गावातील लोक त्यांच्या झोपड्या जाळतात. यावेळी झोपड्यामधील असलेली म्हातारी माणसे व मुलं याना बेदम मारतात. यांसारखे कातकरी समाजातील अनेक वाईट अनुभव व प्रसंग लाडी कादंबरीत अनुभवण्यास येतात.

कातकरी समाजात असलेली व्यसनाधीनता लाडी या कादंबरीत चित्रित होते. कातकरी समाज सुख-दुःखाच्या क्षणी दारूच्या आहारी जातो, तर कधी कामाचा थकवा कमी करण्यासाठी कातकरी समाज दारूच्या आहारी गेलेला असतो. कातकरी समाजात असलेल्या या व्यसनाधीनतेचा परिणाम त्याच्या कुटुंबालादेखील सहन करावा लागतो. आपल्या मनातील व्यथा व्यक्त करताना काळू कातकऱ्याची बायको चंद्र्याला म्हणते, "काय सांगू तुला चंद्र्या, आमच्या कर्मांची फळं भोगतो आमी. सरकारनं आपल्याला घरं बांधून दिली, पर आपली लोक त्याला मोडून इकून खायला निगालीय. ह्यो माझा न्हवरा दारूसाठनं रोज एक कवाल दारूवाल्याला देवून दारू ढोसून येतो. समदी कौलं ह्यानं त्या दारूवाल्याच्या



अनुक्रमणिका

**कातकरी समाजाची संस्कृती व या समाजात असलेली अंधश्रद्धा लाडी या कादंबरीत व्यक्त होते. कातकरी समाजात जर कोणाचा मृत्यू झाला, तर सर्व कातकरी समाजाला दारू व मटण द्यावे लागते. वेळप्रसंगी कातकरी समाज कर्ज काढून ही परंपरा पूर्ण करतो कारण त्याशिवाय मेलेल्या माणसाला शांती मिळणार नाही, असा समज कातकरी समाजात आहे. त्याचप्रमाणे अनेक उत्सव या समाजात साजरे होतात, याचेही चित्रण लाडी या कादंबरीत येते. कातकरी समाजाला प्रस्थापित समाजातील जातीयतेचा सहन करावा लागणारा वाईट परिणाम चंद्र्या कातकऱ्यातून अनुभवयास येतो. तसेच कामाच्या ठिकाणी कातकरी समाजाला योग्य तो मोबदला मिळत नसल्यामुळे या समाजाला काम करूनही उपासमारी सहन करावी लागते, याचेही चित्रण लाडी या कादंबरीत येते.**

मळ्यावर न्हेवून चेपलीत. आमच्या नशिबाचा भोग म्हणायचा. पोरा-बाळाचा इचार दिकून ह्यो करत न्हाय. गळ्यात धोंडा बांधून डूबी नदीत जीव द्यायची पाळी आलीया.'' पृ.क्र -२१४-२१५

कातकरी समाजाची संस्कृती व या समाजात असलेली अंधश्रद्धा लाडी या कादंबरीत व्यक्त होते. कातकरी समाजात जर कोणाचा मृत्यू झाला, तर सर्व कातकरी समाजाला दारू व मटण द्यावे लागते. वेळप्रसंगी कातकरी समाज कर्ज काढून ही परंपरा पूर्ण करतो कारण त्याशिवाय मेलेल्या माणसाला शांती मिळणार नाही, असा समज कातकरी समाजात आहे. त्याचप्रमाणे अनेक उत्सव या समाजात साजरे होतात, याचेही चित्रण लाडी या कादंबरीत येते. कातकरी समाजाला प्रस्थापित समाजातील जातीयतेचा सहन करावा लागणारा वाईट परिणाम चंद्र्या कातकऱ्यातून अनुभवयास येतो. तसेच कामाच्या ठिकाणी कातकरी समाजाला योग्य तो मोबदला मिळत नसल्यामुळे या समाजाला काम करूनही उपासमारी सहन करावी लागते, याचेही चित्रण लाडी या कादंबरीत येते. कातकरी समाज तुळशा कंत्राटदाराकडे काम करत असतो. मात्र तुळशा कंत्राटदार त्याच्याकडे काम करणाऱ्या कातकरी समाजाला कधी कामाचा योग्य मोबदला देत नसे. त्यामुळे कातकरी समाजाला उपासमारीचा सामना करावा लागत असे, तर कधी उपाशीपोटी कामदेखील करावे लागत असे. मात्र तुळशा कंत्राटदाराला कातकरी समाजाकडून फक्त काम करून घेणे हेच माहीत असते.

अलीकडील काळात कातकरी समाजात अनेक सरकारी योजना पोहोचत आहेत आणि सरकारी पातळीवर देखील कातकरी समाजाचा विकास करण्यासाठी प्रयत्न केले जात आहेत. मात्र कातकरी समाजातील भटकंती, व्यसनाधीनता, निरक्षरता यांसारख्या अनेक कारणांमुळे कातकरी समाजाचा पाहिजे तेवढ्या प्रमाणात विकास घडून येत नाही. कातकरी समाजात शिक्षणाचा प्रसार होत आहे. मात्र कातकरी समाजाला भटकंतीमय जीवनामुळे शिक्षणाचे फारसे महत्त्व न समजल्यामुळे या समाजातील अनेक मुलं शिक्षणापासून वंचित राहत आहेत. त्याचप्रमाणे कातकरी समाजातील व्यथा-वेदना, विश्वासूपणा, प्रामाणिकपणा, जिद्द, आनंद, कष्ट, संघर्ष याचेही चित्रण लाडी कादंबरीत येते. रानात शिकार करणे, मासे पकडणे, खेकडे पकडणे, शिकार मिळाल्यानंतर त्याचे समान वाटप करणे व दारू पिऊन नाच करणे हे कातकरी समाजातील विविध प्रसंग लाडी कादंबरीत व्यक्त होतात. कातकरी समाजातील म्हणी, वाक्प्रचार, शिव्या, कातकरी समाजातील बोलीभाषा यांचाही लाडी कादंबरीत वापर करण्यात आलेला आहे.

एकूणच साध्या-सरळ भाषेतून, प्रभावी व्यक्तिचित्रणातून, प्रभावी प्रसंगनिर्मितीतून, चित्रमय भाषाशैलीतून कातकरी समाजाचे जीवन वास्तव लाडी या कादंबरीत चित्रित होते.

प्रा. मिथुन शेळके
चलभाष- ८८०६९२१६४९
mithunshelke90@gmail.com





संत एकनाथांच्या भागवतातील चित्रित झालेल्या कृषीजीवन आणि पर्यावरणाची मांडणी

# एकनाथी भागवतातील शेती

डॉ. हंसराज जाधव

संत एकनाथांची भूमिका लोकशिक्षकाची होती. लोकांना जागृत करण्यासाठी लोकांच्या भाषेबरोबरच त्यांच्या दैनंदिन व्यवहारातील प्रतिमा, प्रतीकांचा वापर करणे ओघाने आलेच. नाथांच्या अवतीभवती असणारा तत्कालीन समाज अशिक्षित, अडाणी, कष्टकरी, शेतकरी होता. भागवतातील श्रीकृष्ण- उद्धव यांच्यातील तात्त्विक चर्चेचा थोडासा बोजड आणि क्लिष्ट वाटणारा विषय सुलभ करून सांगताना नाथांनी शेती आणि शेतीशी निगडित असणाऱ्या गोष्टींचा उपयोग लीलया केला आहे.

**संसाररूपी शेतात ईश्वर हा शेतकरी :** ज्या पद्धतीने शेतात कोणतेही काम करताना शेतकरी हाच त्याचं संपूर्ण नियंत्रण करतो. त्याच पद्धतीनं ईश्वर हाच संसाररूपी शेतातील संपूर्ण घटनांचं नियंत्रण करित असतो.

'ब्रह्मादि शरीरधारी। तूज आधीन गा श्रीहरी। ६-१६९
जैसे नाथिले बैल नांगरीं। कृषीवळू धरी स्वामीत्वें।।
।। तेथे जो राहे मागे पुढें। तोच झोडीजे आसुडें।
तुझे आज्ञेवरी रोकडे। वर्तती गाढे कळिकाळादिक।। ६-१७०।। संसार लक्षण शेतासी। अधिकारीं जुंपोनि सर्वांसी। निजकर्मेक्षेत्रासी। तूं वाहविसी निजाज्ञा।।६-१७१।।'

ज्याप्रमाणे वेसण घातलेल्या बैलांना नांगराला जुंपून शेतकरी त्यांना हवं तसं वळवून घेतो, जो बैल मागे राहतो त्यास चाबकाने झोडून हवे तसे काम करून घेतो त्याप्रमाणे तू (ईश्वर) संसाररूपी शेतांत सर्वांना अधिकारावर जुंपून त्यांच्याकडून हवे तसे काम करून घेतोस.

**भागवत हेच मोठे शेत :** एकनाथी भागवताच्या शेवटच्या अध्यायात (एकतिसावा) भागवतासाठी शेताचे सुंदर रूपक योजून प्रत्येक अध्यायाचा आढावा एकनाथांनी घेतला आहे. भागवतात वर्णिलेले श्रीकृष्णचरित्र एकतीस अध्यायांतून वर्णन करताना कोणत्या अध्यायात काय वर्णिले हे सांगण्यासाठी शेतकऱ्याला ज्या पद्धतीने जमीन निवडीपासून ते धान्य घरात येऊन पडेपर्यंत, त्याचे अन्न (स्वयंपाक) होईपर्यंत जशी वेगवेगळ्या टप्प्यांवर विशेष काळजी घ्यावी लागते त्याप्रमाणे भागवतातील कथाही अध्यायगणिक विकसित झाली आहे. जमीन निवडीपासून सुरू झालेले कृषिकर्म जमिनीतील पालव्या तोडून, काशा काढून जमीन मशागत करण्यासाठी नांगरणी करून शेत तयार करणे, पावसाने शेत भिजून वाफ झाली, की प्रत्यक्ष पेरणी करणे; पिकावर येणाऱ्या चुकार गुराढोरांची आणि भोरड्या,पाखरांची काळजी घेणे; टोळधाड, चोरांपासून पिकाला सांभाळणे; पिकाची कापणी करून धान्य घरी आणणे आणि शेवटी त्या धान्यापासून रुचकर भोजन बनवणे झाल्यानंतरच खऱ्या अर्थाने पूर्ण होते. भागवतातल्या अध्यायातून आलेल्या विषयाचे वर्णन नाथांनी याच टप्प्यातून पुढीलप्रमाणे केले आहे.



अनुक्रमणिका








'प्रथमाध्यायीं वैराग्य पूर्ण। मुख्य अधिकाराचें लक्षण। नारदवसुदेवसंवाद जाण। भूमिशोधन साधका ।।३९० ।। इत्यादि विदेहाचे नव प्रश्न । नवांचीं नवही उत्तरें पूर्ण। तेचि नव नांगरण। क्षेत्रकर्षण अतिशुद्ध।।३९२ ।। हें उद्धवें जाणोनि आपण। निर्वेद केला जो संपूर्ण। तेचि कल्पनाकाशाचें निर्दळण । पालव्या छेदन विकल्पांच्या।।३९४।। कामलोभांचे गुप्त खुंट । आडवू लागले उद्धट।ते समुळ केले सपाट।अतितिखट अनुतापें।।३९५।।क्रोधाचिया अतिजाडी । समूळ उपडिल्या महापेडी। शांती निवडक चोखडी । समुळ उपडी मूळेंसीं।।३९६।। उद्धवचातकआर्तीहरण।वोळला श्रीकृष्ण कृपाघन। क्षेत्र वोल्हावलें सबाह्य पूर्ण । लागली संपूर्ण निजबोधवाफ।। ३९७।। तेथें पुर्णब्रह्म निजबीज। चाडें तंतु सर्व परित्यज्य। श्रवणनळें अधोक्षज । पेरिलेंचि सहज स्वयें पेरी।।३९८।। यदुअवधूतसंवादस्थिती । चोविसां गुरुंची उपपत्ती। आगडु खणविला क्षेत्राप्रती। वोढाळ पुढती रिघों न शके।।३९९।। चिकभरित जाहल्या पिकातें । भोरड्या ओरबडिती तेथें। ते दशमाध्यायीं श्रीअनंते। उडविलीं मतें भजनगोफणा।।४००।। अकरावे अध्यायी जाणा। हुरडा ओंव्या आणि घोळाणा। निळगुळेंसीं चाखविले सुजाणां। मक्तलक्षणांचे हाते।। ४०१ ।। एवं तेराव्या अध्यायाप्रती। जाहली पिकाची पूर्ण निष्पत्ती। तेचि हंसगीतउपपत्ती। समाधि श्रीपती सांगोनि गेला।।४०४।।पीक चढतचढतां हातीं । माझारीं रिद्धीसिद्धी झडपोनि नेती । ते सिद्धीत्यागाची उपपत्ती। पंधराव्याप्रती दाविली।। ६।।क्षेत्र अधिकारी एथें जाण। चारी आश्रम चारी वर्ण। सतरावा अठरावा निरुपण । वांटे संपूर्ण विभागिले।।८।। एकुणिसाव्या अध्यायीं जाण । करुनि पिकाची सवंगण। जेणें कोंडेनि वाढले कण। तो कोंडा सांडूनि जाण कण घ्यावे।।०९।। जे भागा आले शुद्ध कण । ते राखावे आपले आपण। गुणदोषांचे चोरटे जाण । खळें फोडून कण नेती।। ११।। चोर कोण मार्गे येती।पिकलें पीक ज्या वाटां नेती। तो मार्ग बुजावया निश्चितीं। तत्त्वसंख्या उपपत्ती बाविसावा।। ४१९।। मुख्य चोरांचे चोरटेपण।मनापाशीं असे जाण। ते मनोजयाचे लक्षण। भिक्षुगीतनिरुपण तेविसावा।।२१।। मोकळे पीक असतां शेतीं। पशु पक्षी चोर रिघों न शकती। ते सहज संरक्षण उपपत्ती। निर्गुणोक्ती पंचविसावा।।२४।। स्त्री कामाची धाडी जाण। सकळ पिकासी नागवण। पुरुरवा नागवला आपण।इतरांचा कोण पडिपाडू।।२५।। निर्कोप पिक लागल्या हातीं।त्याची करावया निष्पत्ती । क्रियायोगाची निजस्थिती। सत्ताविसाव्याप्रती प्रकाशिली।।२७।। सकळ भोजनां मंडण। तांबूल आणि चंदन। तो तिसावा एकतिसावा जाण। श्रीकृष्णनिर्याण निजबोधु।। ४३९।।

**शेत पिकवण्याची जबाबदारी कोणावर?:** शेताचा मालक हा मुख्य शेतकरी असला तरी शेत पिकवण्यात अनेकांनी भूमिका बजावलेली असते. कष्ट केलेले असतात. भागवतरूपी शेत पिकवण्यात अनेकांनी भूमिका निभावली, त्यांचा उल्लेखही एकनाथांनी केला आहे. 'श्रीभागवत महाक्षेत्र । तेथें ब्रह्मा मुख्य बीजधर । नारद तेथें मिरासीकर । पेरणी विचित्र तेणें केली।।४४२।। तेथें श्रीव्यासें अतिशुद्ध। बांधारे घातले दशविध। पीक पिकले अगाध। स्वानंदबोध निडारे।।४३।। तेथें शुक बैसला सोंकारा। तेणें फोडिला हरिकथापागोरा । पापपक्ष्यांचा थारा। उडविला पुरा निःशेष ।।४४।। त्याची एकादशीं जाण। उद्धवें केली सवंगण। काढिले निडाराचे कण। अतिसघन कृष्णोक्ती।। ४४५।।'

भागवतरूपी शेत पिकवण्यात ब्रह्मा हा मुख्य बीजधर म्हणजे पेरणी करणारा असला तरी त्यात नारद हा वतनदार असून त्याने ही विलक्षण पेरणी केली. त्यात व्यासाने दहा प्रकारचे शुद्ध बांधारे घातल्यामुळे पीक चांगले पिकले.



अनुक्रमणिका

शुकाने राखणदाराची भूमिका स्वीकारत पिकांवर येणाऱ्या भोरड्यांना गोफणीने परतवून लावले. शेवटी उद्धवाने एकादशस्कंधामध्ये पिकाची कापणी करून कृष्णोक्तीचे पाखडलेले भरीव दाणे गोळा केले.

**शेतीचे प्रकार :** संत एकनाथांनी विवेचनाच्या ओघात शेतीचे प्रकार सांगितले आहेत. 'कोणे एके पृथ्वीतळीं मेघ न वर्षता जळीं । पेरिलीं धान्यें सदा निळीं । वसुधा जिव्हाळी ते म्हणती।।२१-८१।। तेंचि पाहतां पृथ्वीवरी । एके भागीं गा उखरी। मेघ वर्षतां शरधारीं । अंकुरेना डिरी उखरत्वें ।। २१-।।८२'

'पानथळ' जमीन पाऊस न पडताही पिकते आणि 'खडकाळ' जमीन कितीही पाऊस पडून पिकत नाही. 'जैसे खळाळ कल्लोळ चंचळ । भासे परी तें केवळ जळ। काळी भरडी पांढरी चोळ। परी ते केवळ वसुधाचि ।।४-२६०।।'

जमिनीच्या काळी, पांढरी, भरडी या प्रकारच्या मातीवरून पडणाऱ्या जमिनीच्या प्रतवारीचा उल्लेख नाथांनी केला आहे.

**मोटंवरची शेती आणि पाटावरची शेती :** परमेश्वर प्राप्तीसाठी ज्ञानमार्ग, भक्तिमार्ग यांचे विवेचन संत साहित्यातून अनेकदा आलेले आहे. ज्ञानमार्ग सोपा की भक्तिमार्ग सोपा? ज्ञानमार्ग उत्तम की भक्तिमार्ग उत्तम? अशा प्रकारचे वाद-प्रतिवादही झालेले आढळतात. ज्ञानमार्गापेक्षा भक्तिमार्ग कसा सोपा आहे हे स्पष्ट करताना एकनाथांनी 'मोटंवरची शेती' आणि 'पाटावरची शेती' यांचे सुंदर रूपक योजिले आहे. 'मळा शिंपावयालागुनी। मोट पाट उपाय दोन्ही। मोटां काढिजे विहीरवणी।बहुत कष्टोनी अतिअल्प।।११-१५३१।। मोट नाडा बैलजोडी। अखंड झोडितां आसुडीं। येतां जातां वोढावोढी। भोय भिजे थोडी भाग एक।।१५३२।। तेथही मोट फुटे कां नाडा तुटे। वोडव पडे बैल अवचटे।तरी हातां येतां पीक आटे। वोल तुटे तत्काळ।।१५३३।। तैसा नव्हे सरितेचा पाट। एक वेळ केल्या वाट। अहर्निशीं घडघडाट । चालती लोट जीवनाचे।।१५३४।। मोटेचें पाणी तैसें ज्ञान। करूनी वेदशास्त्रपठण। नित्यानित्य विवेकासी जाण । पंडित विचक्षण बैसती।।१५३५।।' पाटाची शेती सोपी. तिचे पाणी सदा खळखळ वाहणारे. कमी कष्टात मिळणारे. तसा भक्तिमार्ग सोपा; परंतु शेतीला मोटंचं पाणी

**शेत पिकवण्याची जबाबदारी कोणावर?: शेताचा मालक हा मुख्य शेतकरी असला तरी शेत पिकवण्यात अनेकांनी भूमिका बजावलेली असते. कष्ट केलेले असतात. भागवतरूपी शेत पिकवण्यात अनेकांनी भूमिका निभावली, त्यांचा उल्लेखही एकनाथांनी केला आहे. 'श्रीभागवत महाक्षेत्र । तेथें ब्रह्मा मुख्य बीजधर । नारद तेथे मिरासीकर । पेरणी विचित्र तेणें केली।।४४२।। तेथें श्रीव्यासें अतिशुद्ध। वांधारे घातले दशविध। पीक पिकले अगाध। स्वानंदबोध निडारे।।४३।। तेथें शुक बैसला सोंकारा। तेणें फोडिला हरिकथापागोरा । पापपक्ष्यांचा थारा। उडविला पुरा नि:शेष ।।४४।। त्याची एकादशीं जाण। उद्धवें केली सवंगण। काढिले निडाराचे कण। अतिसघन कृष्णोक्ती।। ४४५।।'**

मिळवण्यासाठी अनंत अडचणी येतात आणि त्यातही जमीन थोडीच भिजते. ज्ञानमार्गही तसाच अवघड आहे.

**दैनंदिन कृषिकर्माचे सूक्ष्म निरीक्षण :** शेतकऱ्यावरील अस्मानी सुलतानी संकट, बाजारपेठ, मालाला मिळणारा कमी भाव, व्यापाऱ्यांची दलाली ह्या मोठ्या संकटांची जंत्री मोठी असली तरी दररोजच्या शेतीकर्मातही शेतकऱ्याला अनेक अडचणींचा सामना करावा लागतो. मोटंच्या पाण्यावर शेती करताना मोट, नाडा, बैलजोडी ह्या गोष्टी लागतात. त्यात ओढाओढ करून बैलांना आसुडाने झोडावे लागते. तेवढे करूनही थोडीशीच जमीन भिजते. त्यात मोट फुटली, नाडा तुटला, बैल आजारी पडला किंवा मेला तर पाणी मिळत नाही. परिणामी जमिनीची ओल संपते आणि हातातोंडाला आलेलं पीक करपून जातं. एकनाथांनी या ओव्यांतून मोट हाकणाऱ्या आणि त्यातील अडचणीने वैतागून गेलेल्या शेतकऱ्याचं हुबेहूब चित्रच जणू वाचकांच्या डोळ्यापुढे उभं केलं आहे. शेतीकर्मातील नाथांचे सूक्ष्म निरीक्षण यातून पहावयास मिळते.

**उत्तम शेती आपोआप पिकते :** जी जमीन उत्तम प्रतीची



अनुक्रमणिका

असते ती फार काही कष्ट न करता, न मशागत करताही चांगली पिकते हा शेतीतला अनुभव एकनाथांनी ईश्वरकृपा दृष्टीने सृष्टी कशी भरून येते हे सांगण्यासाठी वापरला आहे. 'वैराग्यराबें शुद्ध केली। पृथ्वी निजवोला वोळली। कठीणत्वेंवीण मार्दवा आली। नाही अंकुरली बहूबीजें।।११-९।। अखंड वर्षतां जळमेळीं । वासनेची। ढेपें विरालीं। सद्भावाची वोल जाहली। वाफ लागली बोधाची।।११-१०।। तेथें न पेरितांचि जाण । सहज निजबीजें परिपूर्ण । अंकुरलीं आपणिया आपण । सिद्ध संपूर्ण स्वभावें ।।११-११।।' वैराग्याच्या राबाने शुद्ध केलेली जमीन ईश्वरकृपेचा एक शिडकावा पडला, की वासनेची डिखळें विरून जातात आत्मबीज न पेरताच परिपूर्ण अंकुर फुटून शेती जोमाने पिकते.

**ब्राह्मणाला उत्तम शेतीची उपमा :** 'पात्र पाहून दान करावे' हा सिद्धांत सांगताना एकनाथांनी ब्राह्मण मुखाला उत्तम शेतीची उपमा दिली आहे. ज्याप्रमाणे शेतकरी उत्तम शेतीत परोपरीची पेरणी करून पिके घेतो, त्यांची काळजी घेतो त्याप्रमाणे ब्राह्मण मुख हे सर्वोत्तम असल्यामुळे तिथेच दान केले पाहिजे. ही गोष्ट स्पष्ट करताना एकनाथांनी 'श्रद्धेचेनि नेटेंपाटें। पाहूनि दानपात्रें चोखटें। दान द्यावे गोमटें। भूमी वोलटे जेवीं बीज।।६-३०४।। ब्राह्मणाचें मुख तें क्षेत्र। पालवियेपेठीवीण पवित्र। ऐसें पाहूनि सुक्षेत्र। दानें विचित्र पेरावीं।।६-३०५।। विनीततेची सेल वोल। श्रद्धेचें चाडें निर्मळ । शमदमादि बैल सबळ। ते तात्काळ जुंपोनी ।।६-३०६।। ऐशिया वोजा परी। बीज पेरिलिया क्षेत्रीं। पीक पिकेल घुमरीं। पुरुषार्थ चारी लगटोनी ।।६-३०७।।' असे वर्णन केले आहे.

**जमिनीचे(पृथ्वीचे)उपकार :** जमिनीचे (पृथ्वीचे) माणसांवर अनंत उपकार आहेत. जमिनीत नांगर घालून पेरणी करणारा मनुष्य एकप्रकारे तिचे हृदयच फाडत असतो, म्हणजे तो पृथ्वीला त्रासच देत असतो; परंतु जमीन मात्र या अपकारकर्त्यावर रोष न धरता उलट उपकारच करित असते. ही गोष्ट सुंदरपणे एकनाथांनी वर्णिली आहे. 'पृथ्वी दुःखी करिती नांगरी।ते पिकोनि त्यांते सुखी करी।तेवीं अपकाऱ्यां जो उपकारी। तो मोक्षाच्या शिरीं मुगुटु।।४-४४१।।'

**शेती – बी यांच्यातील अद्वैत :** काम आणि क्रोध एकमेकांच्या संयोगानेच वाढतात ही बाब स्पष्ट करण्यासाठी एकनाथांनी शेती आणि बी यांच्यातील अद्वैत सांगितले आहे.

'जरी बीज जाहलें गोमटें। तरी भूमीविण अंकुर न फुटे। तैसें कामावांचूनि कोठें। क्रोध उद्भट न वाढे।।१७-२४६।।'

बी कितीही उच्च प्रतीचे असले तरी जमिनीशिवाय त्याचा काहीच उपयोग नाही.

**जसे बी तसे फळ :** कर्माप्रमाणे सुखदुःख भोगावे लागतात हे तत्त्व स्पष्ट करण्यासाठी एकनाथांनी 'मेघ वर्षे निर्मळ जळ। परी जैसें बीज तैसें फळ। एका भांगी पिके सबळ। एका प्रबळ साळी केळे।।२१-४०।।' मेघवृष्टी सारखीच होऊनसुद्धा एका शेतात भांग पिकते, तर दुसऱ्या ठिकाणी साळी केळी चांगली पिकते कारण जसे बीज तसे फळ येते.

**जास्त बी पेरल्याने शेतकरी खुश :** उद्धवाला भक्तीचा महिमा सांगताना श्रीकृष्णाने शेतकऱ्याच्या खुशीचे रहस्य एका ओवीत सांगितले आहे. 'बीज अधिकाधिक पेरिता।उल्हास कृषीवळाचे चित्ता। तेवी सर्वस्व मज अर्पितां। तैशी उल्हासता जै होये।।१४-२४७।।' शेतात अधिकाधिक बी पेरले असता शेतकऱ्याला जसा उल्हास येतो तसा उल्हास मला(ईश्वराला) सर्वस्व अर्पण करताना ज्याला होतो त्याचेच नाव खरे भक्ती होय.

**पेरणीसाठी अस्सल शेतकरी आवश्यक :** दहाव्या अध्यायात एकनाथांनी आत्मज्ञान प्राप्त होण्यासाठी माणसाला सद्गुरूची आवश्यकता आहे हे तत्त्व प्रतिपादन करताना पेरणीसाठी अस्सल, तज्ज्ञ शेतकरीच उपयोगी असतो असा दाखला दिला आहे. 'पर्जन्यें भूमी मार्दवा आली। बीजें कणिंग असे भरली। परि ज्ञातेन पेरणी नाहीं केली। तंव पिकाची बोली पोंचट।।१०-११०।।' खेड्यात घरातील बहुतेकांचा मुख्य व्यवसाय शेतीत काम करणे हाच असला तरी 'पेरणी' सारखे कौशल्याचे काम करणारा घरात एखादाच असायचा. कदाचित गावातून चारदोन शेतकरीच पेरणी करण्यात पटाईत असायचे. त्यांच्या हातून पेरणी करण्यात अनेक जण धन्यता मानत. एकनाथांनी पेरणीचे नेमके मर्म मांडले आहे.

**पेरणीसाठी तीन गोष्टींची आवश्यकता :** उपरोक्त ओवीत नाथांनी पेरणीसाठी आवश्यक असणाऱ्या किमान तीन गोष्टींची आवश्यकता स्पष्ट केली आहे. पाऊस, चांगले बी आणि पेरणारा तज्ज्ञ शेतकरी ह्या तीन गोष्टींच्या संयोगातूनच शेती चांगली पिकते.

**पेरणीतले कौशल्य :** डांगोरा न पिटता दान केले, अभिमान न बाळगता दान दिले तरच त्याचा फायदा होतो. दान दिल्याची कधीही वाच्यता करू नये हे तत्त्व समजून सांगताना एकनाथांनी पेरणी करतानाचे शेतकऱ्याचे कौशल्य विदित केले आहे. पेरणी केल्यानंतर ते बी शेतकरी मातीखाली झाकून टाकतो. 'कृषीवळू पेरूनियां धान्य। सवेंचि आच्छादी आपण। तैं पीक लगडूनि ये जाण। तैसे सफळ दान न बोलतां।।११-१३०७।।' बी मातीखाली झाकून टाकल्यानेच पीक जोमाने येते. त्याप्रमाणे दान हे न बोलले तरच फलदायी ठरते.

**पिकांचा तात्पुरता फायदा घेऊ नये :** स्वकर्माने अनेक फळे प्राप्त होतात; परंतु स्वर्गादिकासारख्या छोट्या फळाच्या नादी लागणारा माझ्या(ईश्वराच्या) फळाला मुकतो. हा सिद्धांत स्पष्ट करताना एकनाथांनी चणा, जोंधळा आणि गहू या पिकाचे उदाहरण दिले आहे. 'कष्टोनि शेतीं पेरिले चणे। त्यांची उपडोनि भाजी करणें।तो लाभ कीं तेणे नाडणें। तैसे फळ भोगणें सकामीं।।२१-२६७।। वोलीं जोंधळियाचीं करबाडें। खातां अत्यंत लागती गोडें। त्यालागीं शेत जैं उपडे। तै लाभु कीं नाडे निजस्वार्था।।२१-२६८।।' गव्हांचा जो प्रथम मोड।तोंडीं घालितां लागे गोड। परी जो जाणे पिकाचा निवाड। तो मोड जाण उपडीना।।२१-३४५।।' शेतात चांगला पिकलेला चणा केवळ भाजीकरिता उपटून खाणे, जोंधळ्याची कोवळी करबाडे गोड लागतात म्हणून सगळी उपटून खाणे किंवा गव्हाचा कोवळा कोंब गोड लागतो म्हणून उपटून खाणे मूर्खपणाचे ठरेल. शेतातल्या पिकांचा तात्पुरता फायदा न घेता शेतकऱ्याने त्यापासून मिळणाऱ्या मुख्य फायद्याचा लाभ घेतला पाहिजे. हा लाभ नसून खऱ्या लाभाला नाडणेच होय.

**'खळं'आणि खळ्यातील धान्य चोरीचा उल्लेख :** माणसाच्या अंगी येणारे गुणदोष, विषयव्यवस्था हे त्याच्या ठिकाणचा चांगुलपणा घालवतात, हा मुद्दा स्पष्ट करताना एकनाथांनी शेतातील पिकाचं 'खळं' आणि खळ्यातील धान्याची होणारी चोरी याचा उल्लेख केला आहे. 'एकूणिसाव्या अध्यायीं जाण। करुनी पिकाची सवंगण। जेणें कोंडेनि वाढले कण। तो कोंडा सांडूनि जाण कण घ्यावे।।३१-४०९।। ऐसे निवडीले जे शुद्ध कण। तेथें प्राप्ताप्राप्तीचें लक्षण। त्रिविधविभागनिरुपण। विसावा जाण निरुपिला।।४१०।। जे भागा आले शुद्ध कण। ते राखावे आपले आपण। गुणदोषांचे चोरटे जाण। खळें फोडून कण नेती।।३१-४११।।'

जुन्या काळात शेतातील पिकाची, धान्याची चोरी होण्याचे प्रकार व्हायचे. उभ्या पिकाची कणसं कापून नेणे, खळ्यातले धान्य भरून नेणे, कापूस वेचून नेणे अशा चोरीच्या घटना घडायच्या. त्याचा योग्य संदर्भ नाथांनी दिला आहे.

**शेतसारा आणि ग्रामकंटक :** मध्ययुगीन काळात शेतकऱ्यांना आपण शेतात पिकवलेल्या धान्यातून काही ठराविक हिस्सा द्रव्य रूपाने शासनकर्त्या राजाला द्यावा लागायचा. त्यालाच शेतसारा म्हटले जायचे. त्या बदल्यात शेतकऱ्याच्या संरक्षणाची जबाबदारी त्या राजावर असायची. हा शेतसारा एकदा का दिला, की मग शेतकऱ्यांना गावगुंडांना (ग्रामकंटक) घाबरायची गरज नसायची. याचा अर्थ असा, की गावगुंडांचा त्रास शेतकऱ्यांना नेहमी असायचा. राजाचा मात्र त्यांना आधार मिळायचा; पण तोही शेतसाऱ्याच्या बदल्यात. 'कृषीवळु करी शेतासी। यथार्थ द्रव्य दे राजयासी। तो न भी ग्रामकंटकांसी। तेवीं कृष्णार्पणेंसीं होतसे ।।९६।।' आपले कर्म कृष्णाला अर्पण केले, की मग गावकुटाळांना घाबरायचं कारण नाही हे तत्त्व एकनाथांनी यातून सांगितले आहे.

**समारोप :**

संत एकनाथांनी भागवतातील एकादशस्कंदात वर्णिलेला विषय त्यांच्या भागवतात आणला आहे. श्रीकृष्णाने उद्धवला दिलेले ज्ञान ही एक गीताच आहे. सामान्यांसाठी थोडासा रुक्ष असणारा हा विषय प्रासादिक भाषेत स्पष्ट करून सांगताना एकनाथांनी मोठा आधार घेतला तो शेतीचा! शेती हा नाथांच्या पुढे असणाऱ्या सामान्यांचा मुख्य व्यवसाय. त्याच व्यवसायातील रूपकाचा योग्य वापर निरुपणासाठी केला, तर वर्ण्य विषय आणखी सोपा होईल हे सूत्र ओळखून नाथांनी शेतीतील पिके, पाणी, बीज, पेरणी, शेतीवरील संकटे ह्या सगळ्या बाबी उपयोगात आणल्या. एकनाथी भागवतामुळे शेती, शेतकरी आणि शेतीकर्म याचे चित्र वाचकांपुढे उभे राहते हे निश्चित!

**डॉ. हंसराज जाधव**

चलभाष:७५८८४२९२२८। hansvajirgonkar@gmail.com





तुकाराम धांडे यांच्या 'वळीव' या काव्यसंग्रहाची समीक्षा करणारा लेख.

# वळीव: आदिम समाजव्यवस्थेचे संस्कृतीनिष्ठ आकलन

प्रा. डॉ. कैलास सलादे



पुस्तकाचे नाव : वळीव
लेखक : तुकाराम धोंडे
प्रकाशक : राजहंस प्रकाशन
द्वितीय आवृत्ती : डिसेंबर
पृष्ठसंख्या: ८८ मूल्य : ७५/-

आदिम, आदिवासी, वनवासी या विशेषणांनी ओळखल्या जाणाऱ्या समाजाची भारतात तसेच महाराष्ट्रात संख्या जास्त आहे. आदिवासी या शब्दाचा अर्थच आदिम काळापासून ज्या मानव समूहाचा इथल्या भूमीवर अधिवास होता, तो मानवसमूह म्हणजे आदिवासी होय. आदिवासी ही या भूमीवरची राज्यकर्ती जमात होती. तिच्या राजवटीचे आणि दिव्य इतिहासाचे अनेक संदर्भ पुराणे, रामायण, महाभारतादी ग्रंथात सापडतात. राज्यसत्तेच्या केंद्रस्थानी असलेली ही राज्यकर्ती जमात आर्यांच्या आणि त्याचबरोबर इतर टोळ्यांच्या प्रगत आणि कुटील आक्रमणापुढे हतबल ठरली आणि प्रवाहापासून दूर गेली. विकासापासून किंवा प्रवाहापासून दूर राहिल्यामुळे या समाजाची अविकसित किंवा मागास, अज्ञानी, निरक्षर म्हणून संभावना केली जाते, मात्र ह्या संभावनेत तथ्य नाही. उलट आधुनिक समाज व्यवस्थेपेक्षा आदिवासी समाज आणि संस्कृती किती पुढारलेली होती हे लक्षात येते. हा समाज शिक्षण, सोयी सुविधा, विज्ञान, विकासापासून दूर राहिला असला तरी, हा समाज अज्ञानी वा दरिद्री नाही. धाडसी, लढाऊ, बुद्धिमान, स्वातंत्र्यप्रिय म्हणून त्यांची ओळख राहिली आहे. त्यांच्या बुद्धिमत्तेची अनेक उदाहरणे इतिहास आणि पुराणामध्ये सापडतात. निसर्गाशी समन्वय साधून सर्वांप्रति समभाव, सहानुभाव आणि

समूहभान जपणारी आदर्श संस्कृती या समाजाने आदिम काळापासून टिकवलेली दिसते. धर्म, दैवतव्यवस्था, मूल्यविचार, नृत्य, संगीत, वाद्य, लोककला, तत्त्वज्ञान, वाङ्मय याबाबत आदिवासी समाज संस्कृती आर्यसंस्कृतीपेक्षा कोणत्याही बाबतीत कमी नाही. उलट स्वातंत्र्यवादी, उदारमतवादी, पर्यावरणवादी, स्त्री स्वातंत्र्यवादी या गुणवैशिष्ट्यांमुळे ही संस्कृती आर्य संस्कृतीपेक्षा काही पावले पुढे असल्याचे दिसते.

या आदिवासी समाज संस्कृतीचे प्रतिबिंब भारतीय साहित्यातील आणि आदिवासी कवी साहित्यिकांच्या साहित्यातून उमटले आहे. मराठीमध्ये लोकवाङ्मय, लोकसंगीताच्या, लोककलेच्या रूपातून आदिवासी समाज संस्कृतीचे दर्शन झाले होतेच. मात्र मराठी आदिवासी कवी लेखकांनी हे संस्कृतीदर्शन प्रभावी आणि प्रामाणिकपणाने केलेले दिसते. इतर गद्य साहित्य प्रकारापेक्षा काव्य हा साहित्य प्रकार आदिवासी कवी लेखकांना अभिव्यक्तीसाठी जवळचा वाटला आहे. कदाचित कवितेतून त्यांना त्यांच्या दुःख वेदनांची अनुभूती करणे सोपे वाटले असावे म्हणून आदिवासी कवितेची संख्या जास्त आहे असे दिसते. मराठीत भुजंग मेश्राम, वाहरू सोनवणे, विनायक तुमराम, माधव सरकुंडे, गोविंद गारे, पुरुषोत्तम शेळमाके, कुसुम आत्राम. कृष्णकुमार चांदेकर, सुनील कुमरे, रेखा डगळे, बाबाराव मडावी, लक्ष्मण टोपले, पी.डी.आत्राम, शंकर बळी, कविता आत्राम यांसारख्या कवींनी कवितेच्या माध्यमातून आदिवासी जनसमूहाच्या दाबल्या, दडपलेल्या आवाजाला वाचा फोडण्याचे काम केले.

या काव्य परंपरेतील तुकाराम धांडे हे महत्त्वाचे कवी आहेत. त्याचा 'वळीव' हा काव्यसंग्रह राजहंस प्रकाशनाने २००७ मध्ये प्रसिद्ध केला आहे. या संग्रहाची दुसरी आवृत्ती प्रसिद्ध झाली आहे. नाशिक जिल्ह्यातील आदिवासींचे प्राबल्य असलेले इगतपुरी हे तुकाराम धांडे यांचे गाव आहे. आजूबाजूला पसरलेली सह्याद्रीची डोंगररांग, रान-जंगले, बहुसंख्य आदिवासी समाज, त्यांचे दुःखमय जगणे ही त्यांच्या कवितेची प्रेरणा राहिली आहे. आदिवासी समाज आणि संस्कृतीचे प्रामाणिक चित्रण तुकाराम धांडे यांनी आपल्या कवितेत केले आहे. डोंगर आणि निसर्गाच्या कुशीत कवीचे आयुष्य गेल्याने डोंगर आणि निसर्गच त्यांच्या कवितेतून वेगवेगळ्या प्रतिमा, प्रतीकांतून उभे राहिले आहेत. डोंगर आणि निसर्गच आदिवासी संस्कृतीची व आदिवासी समाज समूहाची मुख्य प्रेरणा आहे हे तुकारामांच्या कवितेचा अभ्यास करताना जाणवते. समूहभान हे आदिवासी संस्कृतीचे मुख्य वैशिष्ट्य आहे. आपण एकटे नाही तर आपल्याबरोबर इतरही मनुष्य प्राणी, पक्षी, किडा, मुंगी यांच्या अस्तित्वाला अर्थ आहे. याची जाणीव तुकारामांच्या कवितेतून व्यक्त होते.

मोटार अड्ड्यावर उतरून
मावळतीच्या जंगलाकडं पाहिलं की
सूर्य मावळतो त्याही पलीकडं एक डोंगर आहे
त्या डोंगराला वळसा घालून
लोंबणाऱ्या कड्या खालून
कपारीला बिलगत बिलगत पुढे गेलं की
दूरवर खडकाळ मैदानात
काही काळसर ठिपके दिसतात
तो झोपड्यांचा समूह आहे
तिथ काही लोक राहतात(वळीव,पृ.११)

ह्या समूहामध्ये फक्त माणसांचे अस्तित्व ग्राह्य धरले आहे असे नाही, तर माणसांसोबतच ससे, रानमांजरे, सायाळ, उंदीर, घुशी सरपटणारे प्राणी, धामीन, रान कोंबडी, कोल्हे, मुंगूस, घारी, कावळं, चितड्या या बरोबरच नदी, नाले, झाडे, निसर्ग, डोंगर या सर्वांच्या अस्तित्वातून आदिवासींचे नकाशावाचन करता येणे शक्य आहे याची जाणीव ही कविता देते. समूहप्रधानता हे या समाजाचे सांस्कृतिक वैशिष्ट्य आहे. तुकारामांच्या कवितेतून ही समूहप्रधानता पुढीलप्रमाणे व्यक्त होते.

पोरांनी मळई आणि गवारणी होऊन वहळाला जावं
बायकांनी रान भाज्या कंदमुळे काड्या कुड्यासाठी
बाहेर पडावं
म्हाताऱ्यांनी पोरांना सांभाळावे
संध्याकाळी ज्यांना जे काही मिळालं असेल
ते सर्वांनी आनंदाने वाटून तीटून खावं
(हे आणि ते,पृ.११)

किंवा

दोघांनी बरोबर निघून
एकाने एका वाटेनं
डोंगराच्या शिखरापर्यंत जावं

दुसऱ्याने दुसऱ्या वाटेनं खोल दरीच्या
तळापर्यंत जावं
आणि धुक्यात त्याला काहीच दिसेनासं व्हावं
मग आभाळाकडे तोंड करून त्याने
जोडीदाराला साद घालावी
तेव्हा केवळ जोडीदाराकडूनच नव्हे तर
झाड, वेली, पशू, पक्षी, कडे कपरींनेही
आश्वासक प्रतिसाद द्यावा (हे आणि ते, पृ.४७)

या कवितेतून आदिवासी संस्कृतीतील समूहभान व्यक्त होते. निसर्गाचे भयावह तांडव, पाऊस, पूर, वादळे, दुष्काळ यांसारख्या अस्मानी सुलतानी संकट परंपरेमध्ये एकमेकांच्या सहकार्याच्या गरजेतून आदिवासी जनसमूहामध्ये सामूहिकतेची गरज निर्माण होत गेली असावी. हे समूहभान आणि व्यापक सहानुभाव या संस्कृतीची वैशिष्ट्ये बनली आहेत. जंगलांनी व्याप्त दुर्गम प्रदेश, पावसाळ्यामध्ये अनेकदा जगाशी तुटणारा संपर्क, कष्टमय जीवन यामुळे एकमेकांच्या मदतीची नितांत गरज असल्याने प्रत्येकाच्या वागण्यात समूहावद्दल प्रेम व्यक्त होत असावे. आदिवासींमध्ये आपापसांत संघर्ष होतच नाही असे नव्हे. मात्र या संघर्षाची तीव्रता फारच टोकदार जाणवत नाही. मतभेद, वादविवाद, संघर्ष प्रत्येक संस्कृती मध्ये असतातच; पण स्वार्थी वृत्तीला आदिवासी समाज संस्कृतीमध्ये स्थान नसल्याने सामूहिकतेला महत्त्व दिले जाते. व्यक्तीपेक्षा समूह महत्त्वाचा आहे कारण सामूहिकता हाच आदिवासी संस्कृतीचा जीवन धर्म आहे. तुकारामांच्या कवितेत मीचा स्वर जाणवण्याइतका ठळक झालेला दिसत नाही. इथे मीपेक्षा आम्हीला महत्त्व आहे. हे समूहभान त्यांच्या वाटणी या कवितेतून व्यक्त झाले आहे. तसं वाटणी म्हटलं किंवा दोन विचारांची, गटांची, भागीदारांची, भावांची फाळणी असते. फाळणी म्हटलं, की संघर्ष आणि हिंसा या होतच असतात. मात्र या कवितेतील दोन भावांच्या वाटणीतही सामूहिकतेतला उदात्त मूल्यभाव व्यक्त झाला आहे. जुनं पाचखणी घर एकाला तर तीनखणी घर एकाला, आई वडिलांची वाटणी करणं बरं नाही याची जाणीवही कवीला आहे. मात्र अशी वाटणी करणं व्यावहारिक सोय किंवा आतल्यांच्या सोयीसाठी आहे. घर मात्र वाटणीनंतरही टिकलं पाहिजे म्हणून कवितेतला मोठा भाऊ लहान भावाला म्हणतो,

नाशिक जिल्ह्यातील आदिवासींचे प्राबल्य असलेले इगतपुरी हे तुकाराम धांडे यांचे गाव आहे. आजूबाजूला पसरलेली सह्याद्रीची डोंगररांग, रान-जंगले, बहुसंख्य आदिवासी समाज, त्यांचे दुःखमय जगणे ही त्यांच्या कवितेची प्रेरणा राहिली आहे. आदिवासी समाज आणि संस्कृतीचे प्रामाणिक चित्रण तुकाराम धांडे यांनी आपल्या कवितेत केले आहे. डोंगर आणि निसर्गाच्या कुशीत कवीचे आयुष्य गेल्याने डोंगर आणि निसर्गच त्यांच्या कवितेतून वेगवेगळ्या प्रतिमा, प्रतीकांतून उभे राहिले आहेत. डोंगर आणि निसर्गच आदिवासी संस्कृतीची व आदिवासी समाज समूहाची मुख्य प्रेरणा आहे हे तुकारामांच्या कवितेचा अभ्यास करताना जाणवते. समूहभान हे आदिवासी संस्कृतीचे मुख्य वैशिष्ट्य आहे. आपण एकटे नाही तर आपल्याबरोबर इतरही मनुष्य प्राणी, पक्षी, किडा, मुंगी यांच्या अस्तित्वाला अर्थ आहे.

आता अजून एक
आपण दोघं जिवंत असेपर्यंत
तू मला आणि मी तुला
तुझ्या दुखण्यात खुपण्यात माझी मांडी तुला
मी मोठा आहे अगोदर गेलो तर
तुझा खांदा मला (वाटणी, पृ.३८)

या कवितेतील सामूहिक मूल्यजाणीव महत्त्वाची आहे. आदिवासी समाजाची स्वतःची धर्मव्यवस्था आहे. धर्म ही त्यांच्या जगण्याची प्रेरणा आहे. स्वतंत्र दैवतव्यवस्था हे या संस्कृतीचे आणखी एक वैशिष्ट्य होय. ही दैवतव्यवस्था आर्य संस्कृतीच्या दैवतव्यवस्थेपेक्षा भिन्न आहे. निसर्गाचा विचार करणारे संवादी सूर या संस्कृतीतून उमटताना दिसतात. पर्यावरणाचा कमीत कमी विध्वंस याकडे या संस्कृतीचा कटाक्ष दिसतो. निसर्ग आणि पर्यावरण त्यांच्या

दैवतव्यवस्थेच्या केंद्रस्थानी असल्याचे दिसते. निसर्ग, डोंगर, प्राणी, नद्या, झाडे, हवा, अग्नी, जल सारख्या नैसर्गिक शक्तीच या संस्कृतीच्या दैवत बनल्या आहेत. या दैवतव्यवस्थेचे वर्णन तुकारामांच्या कवितेत संदर्भान्वये आले आहे. निसर्ग देव ह्या कवितेमध्ये अदिवासी संस्कृतीची दैवतव्यवस्था प्रकट झाली आहे.

बाप्पा! निसर्ग देवा
या रानावनातल्या आम्हा उघड्या बोडक्या झिपऱ्या
पोरांना रानदेवा वनदेवा डोंगरदेवा तुला काय काय
म्हणू (निसर्गदेव, पृ.८५)

या निसर्ग दैवतांसोबतच खंडोबा, बहिरोबा, वाघोबा, कळसूबाई, वर्सुबाय, वटमाय, धोरपडामाय, घाटनदेवी या सारख्या दैवतांचे संदर्भ पुढील कवितेत आले आहेत.

अन् तुच आई व्हऊन
डोंगराचं नाव धारण करुन
बसली हायेस सगळ्यात उंचावं कळसुबाई व्हऊन
माते निसर्ग देवते
तूच वर्सुबाय तू वटमाय
तुच धोरपडामाय, अन् घाटनदेवी
तू सादडाई धावडाई
तू खडकाई दगडाई
तू नटून थटून झालीस
जांभाळाई आंभाळाई
तू करवंदाई आवळाई
तू उंबराई तोरणाई
अन् तूच आंबाबाई
ह्या सगळी तुझीच रूपं (निसर्ग देव, पृ. ८५)

अशा व्यक्त झालेल्या दैवतव्यवस्थेत बा संबोधने लावून येणाऱ्या पुरुष दैवतापेक्षा आई संबोधने लावून येणारी स्त्री दैवते जास्त प्रमाणात आहेत. ही मातृसत्ताक संस्कृतीची वैशिष्ट्ये सांगणारी गोष्ट आहे. आदिवासी समाज संस्कृतीमध्ये पुरुषाप्रमाणेच स्त्रियांना बरोबरचे किंवा पुरुषांपेक्षा वरचे स्थान असल्याचे दिसते. मातृसत्ताक संस्कृतीच्या अस्पष्ट खुणा आजही आदिवासी समाज संस्कृतीमध्ये दिसतात. स्त्रीच्या जन्माचे स्वागत केले जाते. तिची घरात पंढरी नावाच्या कवितेत स्त्रीच्या किंवा मुलीच्या आगमनाचे स्वागत केले आहे. भ्रूणहत्येसारखा प्रश्न या समाज व्यवस्थेमध्ये नाही. स्त्रियांचे लिंग-गुणोत्तर प्रमाण या समाजात चांगले आहे कारण मुलीची गर्भातच हत्या न करता तिच्या जन्माचं स्वागत केले जाते.

तिची दारात पाऊले
घरा घरपण आले
तिचे हात फिरताच
अंगणाचे सोने झाले
तिच्या सोनपावलांनी
लक्ष्मीही घरा आली
अन दारात तुळस
कशी हिरवीगार झाली (तिची घरात पंढरी, पृ.७९)

स्त्रीच्या येण्यानं घराला येणारे घरपण महत्त्वाचे आहे. मुळात भटक्या पुरुष जातीला स्त्रीच्या असण्यानेच अस्तित्व प्राप्त झाले आहे. मुळातल्या भटक्या पुरुष जमातीला स्त्रीनेच स्थिरता मिळवून दिली आहे.

माझे आभाळाला हात
तिचे चित्त माझ्यावरी
जीव माझा वारकरी
तिची घरात पंढरी (तिची घरात पंढरी, पृ.७९)

वारकरी पुरुषाला घरपणाला लावणारी स्त्री अजूनही आदिवासी संस्कृतीत केंद्रस्थानी आहे. अशा मातृसत्ताक संदर्भाची जाणीव करून देणाऱ्या वळीव(पृ.२९), आई होती तेव्हा(पृ.९), तहान(पृ.४१), भूक(पृ.४३), ताई (पृ.५०), अर्पणपत्रिका(पृ.५३) यांसारख्या अनेक कविता या संग्रहात आल्या आहेत.

आदिवासी संस्कृतीवर धर्माचा काहीसा प्रभाव असला तरी ही संस्कृती इहवादाला महत्त्व देणारी आहे. चार्वाकाने सांगितलेल्या 'यावत्जीवं सुखं जिवेत् ऋणं कृत्वा घृतं पिबेत्!' तत्त्वाप्रमाणे आदिवासी समूह जगण्याचा खरा आनंद घेताना दिसतो. चार्वाकाच्या या विधानाचा अर्थ जीवन सुखी करण्यासाठी कर्ज काढून तूप खा असा संकुचित न घेता व्यापक अर्थाने या विधानाचा अर्थ घेतला पाहिजे. काल्पनिक स्वर्गसुखापेक्षा तुमच्या इहलोकीच्या जगण्याला या समाजामध्ये महत्त्वाचे स्थान असल्याचे दिसते. जल, वायू, आकाश, पृथ्वी, अग्नी या पंचतत्त्वांना आदिवासी संस्कृतीमध्ये महत्त्वाचे स्थान आहे.

ही आदिवासी माणसं
पंच महाभूतांशी लढाया करून
त्यांना मांडलिक बनवून



अनुक्रमणिका

त्यांच्याशी जमवून घेऊन
त्यांना सोयरा करून अन निसर्गाचे लाडके व्हऊन
जगात असतात शंभर वर्षापर्यंत....
(चंद्र आणि डोंगर, पृष्ठ.२०)

पंचतत्त्वांशी झगडत जगत असतात. स्वर्गप्राप्तीपेक्षा पंचतत्त्वात विलीन होण्यात या समूहाला मोठेपण प्राप्त होत असते. नृत्य, संगीत, गाणे या माध्यमांतून हा समाज जगण्यातील नैसर्गिक आनंद मिळवत असतो.

त्यांच्या सणासुदीला
रात्रीच्या टाईमाला
ढोलच्या तालावर
बेधुंद व्हऊन ही माणसं नाचू लागतात ना
तव्हा तुमचा चंद्र
हातात टेंभा धरून ताटकळत उभा राहतो
दिवस निघेपर्यंत. (चंद्र आणि डोंगर, पृष्ठ.२०)

आदिवासी संस्कृतीची स्वतःची मूल्यव्यवस्था आहे. हा मूल्यविचार त्याच्या अनुभवातून, जीवन जगण्याच्या चिंतनातून आला आहे. निसर्गाशी समन्वय साधणारी, सर्व प्राणिमात्रांच्या अस्तित्वाची दखल घेणारी, उदात्त, प्रामाणिक, श्रमनिष्ठ, श्रद्धाळू, पापभीरु, आणि गोड झऱ्यासारखी मातीतून पाझरून आलेली ही आदिम संस्कृती या जीवनमूल्यांवरच तरली आहे. ही जीवनमूल्येच त्यांच्या जगण्याची प्रेरणा आहे. मूल्यविचारांच्या भक्कम पायावर उभी असणारी ही समाजव्यवस्था वैशिष्ट्यपूर्ण आहे. प्रामाणिकपणा हा आदिवासींचा जीवनधर्म आहे. साहेब नावाच्या कवितेतून हेच तत्त्वज्ञान आले आहे, ते महत्त्वाचे आहे. पाईपातून, नळातून किंवा कशातूनही पाण्याची व्यवस्था करणारा कुणीही ह्या यड्या धड्या बाया बापड्यांचा देव होतो. राहिली मतांची गोष्ट, तर आदिवासी समाज प्रामाणिक असल्याने कवी म्हणतो,

राहता राहिली मतांची त्रात
त हा लक्ष्मीचा चारा हातात घेऊन सागतो साहेब
असं जर झालं ना !
न इठली उघडी नागडी पोरं सोरं
यड्या धड्या बाया बापड्या
डोईवर हात ठिऊन आभाळ न्याहाळणारी
म्हातारी कोतारी माणसं
इतकं नही त या डोंगराच्या अंगा खांद्यावर खेळणारी
मुकी जनावरं आणि रानपाखरं
या सगळेंची लाख लाख मतं
तुम्हालाच मिळतील साहेब तुम्हालाच मिळतील
(साहेब, पृ.१८)

याची ग्वाही तुकारामाची कविता देते. देणं हा ह्या संस्कृतीचा भाग आहे. कोणत्याही फळाची अपेक्षा न करता देत राहणं ही या समाजाची नैसर्गिक आदिम प्रवृत्ती आहे. भौतिक ऐश्वर्य नसलेल्या, गवताच्या आणि कारवीच्या कुडाच्या झोपड्यांमधील मनानं श्रीमंत माणसाबद्दल तुकारामाची कविता सांगते की,

गवताच्या अन् कारवीच्या कुडाच्या
झोपड्या दिसू लागतील
तीठं माणसं राहात्यात
त्यांना आवडीनं भाऊ म्हणून हाका मारा
ते तुम्हाला देव मानतील
घरात असलं नसलं ती नागलीची भाकर
अन् कुळथाचं पिठलं खाऊ घालतील
कुबेराच्या मोठ्या पणानं
कारण ते शबरीचे वंशज आहेत
(चंद्र आणि डोंगर,पृ.१९)

शबरीच्या मिथकातून आदिवासींची श्रद्धाळू आणि प्रेमळ, तशीच त्यागी वृत्ती व्यक्त झाली आहे. आदिवासी माणसं श्रद्धाळू आहेत तशी ती त्यागीसुद्धा आहेत. भूतदया त्यांच्या जीवनप्रवृत्तीचा भाग बनली आहे म्हणूनच घनदाट अरण्यात वाघाच्या जबड्यातून बकरीला खेचून काढणारी अन् तिला जीवनदान देणारी माणसं (हे आणि ते, पृ.४६) महत्त्वाची आहेत.

श्रमनिष्ठा हा या संस्कृतीचा जीवनधर्म आहे. फुकटचं, लांडीलबाडी करून मिळवलेली गोष्ट ह्या संस्कृतीत निषिद्ध मानली जाते. मुळात संचयन करणे या संस्कृतीला मान्य नाही. प्राण्यांसारखं, पक्ष्यांसारख्या हव्या तेवढ्याच गोष्टींचा उपभोग घ्यायचा ही या संस्कृतीची वृत्ती आहे. गरजेपेक्षा जास्त गोष्टींचा संचयन हा समाज करत नाही. हा निसर्गाच्या नीतीनियमांचे काटेकोर पालन करणारा आदर्श समाज आहे. श्रमाला या संस्कृतीत महत्त्व आहे.

काम भाकर, काम परमेश्वर
काम कुटुंबाचा आसरा
काम करून यावे घरा

तोच दिवाळी दसरा (श्रमप्रतिष्ठा, पृ.८१)

कामात राम शोधणारी श्रमनिष्ठ, कष्टवंताची ही संस्कृती म्हणूनच ऐतखाऊ, कामचोर संस्कृतीपेक्षा वेगळी ठरते. आदिवासी समाज संस्कृतीचे अनेक संस्कृतीनिष्ठ पैलू तुकाराम धांडे यांच्या कवितेतून व्यक्त झाले आहेत. आदिवासी संस्कृतीची स्वतःची स्वतंत्र वस्त्रसंस्कृती आहे. या वस्त्र संस्कृतीचे संदर्भ निसर्ग पुत्र कवितेत,

कमरेस वितभर धोतर डोईसही तितकेच बांधलेलं
घोंगडीच्या घडीने अर्ध काया झाकून घेतलेला
खांद्यावरी कुऱ्हाड (निसर्ग पुत्र, पृ. ४०)

अशा प्रकारे व्यक्त झाले आहेत. नाच, नृत्य आणि संगीत हा आदिवासी संस्कृतीचा जिव्हाळ्याचा आणि जीवाभावाचा विषय 'चंद्र आणि डोंगर' या कवितेत व्यक्त झाला आहे. निसर्गाचा भूगोल हा आदिवासी संस्कृतीच्या तोंडपाठच. ऋतू आणि निसर्गाची विविध विलसिते किंवा रूपे आदिवासींच्या परिचयाची. निसर्गाचं पुस्तक आणि निसर्ग हीच त्यांच्या चार भिंतीच्या पलीकडची शाळा. या शाळेतच निसर्ग वाचता येतो. निसर्गच अवघ्या जगाचे घर आहे म्हणून अवघ्या जगाचे भले व्हावे ही वैश्विक जाणीव आदिवासींच्या मूल्यव्यवस्थेचा भाग आहे. सर्वांचं भलं व्हावं ही उदात्त भावना आदिवासींच्या कृती-उक्तीतून व्यक्त होत असते. तुकाराम धांडे यांच्या प्रार्थना या कवितेतून आदिवासींचा व्यापक असा वैश्विक मूल्यविचार व्यक्त झाला आहे. ज्ञानेश्वरांच्या पसायदानाची आठवण करून देणारी अशी उदात्त मानवी मूल्ये व्यक्त करणारी ह्या संग्रहातील सुंदर कविता होय.

माय बापा निसर्ग देवा
आता आमची प्रार्थना एक
इथल्या मुरमाड खडकाळ जमिनीला
ओलावा पकडून ठेवण्याची शक्ती दे
इथल्या मोडक्या तोडक्या पडक्या उतूळ
इहिरींना जिवंत तीर्थक्षेत्राचं वरदान दे
इथल्या झाडांची सगळी पानं गळून जातील
जिकडं तिकडं पाचोळाचं दिसल
वरती सगळ्या फांद्याच्या काड्या कुड्या व्हतील
तरी पुन्हा त्या झाडांवर
नवी कोवळी दाट पालवी फुटू दे (प्रार्थना, पृ. ८६)

किंवा

मुरगाचं बुरंबाट येईपर्यंत
इथल्या उन्हाळ्याच्या झळा सहन करण्यासाठी
एखादी गार वाऱ्याची झुळूक येत राहू दे
अन् आमचं जगणं जरास सोपं व्हऊ दे
कोल्हं, मुंगूस,घारी,कावळं यांनी माळा घालून
कीर्तनाला जावं असं आमचं म्हणणं नाही
पण आमच्या कोंबड्या चिताड्याही पोहळू दे
वाघालाही जगू दे अन् शेळीचंही रक्षण कर
(प्रार्थना, पृ. ८६)

अशी उदात्त भावना व्यक्त झाली आहे.

आदिम अशा आदिवासींच्या बोलीभाषेतून, प्रतिमा, प्रतीके, शब्दप्रयोगातून आदिवासी संस्कृतीचे पैलू व्यक्त होत असतात. तुकारामांच्या कवितेत आलेली प्रतिमा, प्रतीके आदिवासी जीवन जाणिवांशी साधर्म्य साधणारी आहेत. नारळागत गोटा झालेले माणसाचे डोळे, हंडे भांड्याची जत्रा, मानवजातीच्या माहेराची वाट, पुण्याची पोती, खडकासारखं दुःख, डबकात बसलेली म्हैस, खट्याळ वेल यांसारख्या प्रतिमा-प्रतीके व कपारी, बेस, पोहळून, खोबण, दांडकं, लूत, तराट, देस धरम, इवाइन, धांदूक, इऱ्हीकं, संईधार, फडकी, शिव्हांच्या, यंगून, तस्मा, याड, यवा, वाघुर, इलाका, जिवणी, आबुट, चिंदाड, बुरंगाट यांसारख्या शब्दांतून आदिवासींचे सांस्कृतिक भावविश्व स्पष्ट झाले आहे. विनायकदादा पाटील यांनी प्रस्तावनेत म्हटल्याप्रमाणे तुकारामाची कविता अस्सल आहे. सह्याद्रीच्या कुशीत जन्म गेल्याने निसर्गाचा झंकार त्यांच्या कवितेत आहे (पृ.५) म्हणून आदिवासी समाजाच्या सांस्कृतिक आकलनाच्या दृष्टीने तुकाराम धांडे यांची कविता महत्त्वाची ठरते. चिरेबंदी कातळावर आदिम अशा चित्रभाषेत कोरून ठेवलेलं अजिंठा शिल्प वळीवच्या रूपाने जगाला मिळाले आहे हे फार महत्त्वाचे आहे.

**संदर्भ-**

तुकाराम धांडे, 'वळीव', राजहंस प्रकाशन, पुणे, द्वितीय आवृत्ती, डिसेंबर २०१३ .

**प्रा. डॉ. कैलास सलादे**
चलभाष : ९९२१५२८४२१





अनुक्रमणिका










# अस्वस्थ मनाचे बंडः आदिवासी साहित्य प्रवाहाला समृद्ध करणारी कविता

डॉ. सखाराम डाखोरे

**कवी सुरेश धनवे यांच्या 'अस्वस्थ मनाचे बंड' या आदिवासी जीवनावरील काव्यसंग्रहावरील लेख**

क्रांतिसूर्य धरतीआबा बिरसा मुंडा जयंतीचे (१५ नोव्हेंबर) औचित्य साधून १५नोव्हेंबर २०२० रोजी परिस पब्लिकेशन, पुणे यांनी प्रकाशित केलेला कवी सुरेश सायत्री किसन धनवे यांचा 'अस्वस्थ मनाचे बंड' हा कवितासंग्रह प्रस्थापित व्यवस्थेचा बुरखा फाडणारा आणि आदिवासी तसेच सर्व स्तरांतील शोषित वर्गांच्या मनात बंडाची चेतना निर्माण करणारा मौलिक कवितासंग्रह आहे. जुलै १९९८मध्ये 'जखम' हा त्यांचा पहिला चारोळी संग्रह प्रसिद्ध झाला होता. तब्बल दोन दशकांनंतर प्रकाशित होणाऱ्या 'अस्वस्थ मनाचे बंड' कवितासंग्रहाच्या चिकित्सक प्रस्तावनेत सुप्रसिद्ध आदिवासी कवी/ साहित्यिक मा. माधव सरकुंडे यांनी म्हटले आहे की, कवी सुरेश धनवे यांची कविता वाचताना एक गोष्ट प्रकर्षाने जाणवते ती ही, की त्याच्या मनात सांप्रत व्यवस्थेबद्दल प्रचंड चीड आहे. या व्यवस्थेतील दुटप्पी व्यवहार आणि विचार यांच्यावर त्यांची कविता घणाघाती वार करते. त्यांची कविता वंचितांच्या वस्तीत जाऊन उभी राहते आणि तिथल्या शोषित पीडित जीवांना चेतवते. त्यांना सांगते की, आंबेडकरी विचारांचा चक्रवात आता कुणालाही थांबवता येणार नाही. परिवर्तनवादी विद्रोही विचारांनी भारलेल्या 'अस्वस्थ मनाचे बंड' मध्ये समाविष्ट असलेल्या ६१ कवितांचा बाणाच मुळी लढाऊ आहे. आदिवासी समाजाच्या व्यथा-वेदनांना, दुःख, दारिद्र्य, यातनांना साकार करतानाच कवी सुरेश धनवे यांची लेखणी जात, धर्म, पंथ आणि प्रस्थापित व्यवस्थेच्या दुटप्पीपणावर कठोर प्रहार करते. प्रारंभीच येणाऱ्या कवी आणि कविता ह्या कवितेत काव्यनिर्मितीबद्दल मत व्यक्त करताना कवी म्हणतो की,

> ''अत्याचारांची चिरफाड असते कविता
> भल्याभल्यांचा पर्दाफाड असते कविता
> अनुभवांच्या कानशीवर शब्दांना धार लावते कविता
> अन्यायावरचा वार असते कविता'' (पृ. क्र.२४ )

कवी सुरेश धनवे यांच्या लेखणीला धार आहे. परंपरागत तकलादू दैवी जगण्यावर आसूड ओढतानाच ती शोषणाविरुद्ध विद्रोह पुकारते, धर्मांच्या उर्मटपणाला थेट नाकारते आणि आत्मशोधाच्या गुहेत शिरून रानावनात, डोंगरदऱ्यांत राहणाऱ्या आदिवासी समाजाच्या आदिम वेदनेस साकार करते. प्रस्थापित धर्मव्यवस्थेचा पाखंडी चेहरा ती समाजाच्या पुढ्यात आणून ठेवते. राजकारण, समाजकारणाचे ढोंग मिरवणाऱ्यांच्या नेत्यांच्या आणि

कार्यकर्त्यांच्याही चापलुसीपणावर थेट वार करते.

**दैवी प्रतीके आणि प्रतिमांची पुनर्मांडणी:** प्रखर धर्मधुरीणांनी भारताला दैवी प्रतीके आणि प्रतिमांचा देश बनविण्याचा जणू विडाच उचलला आहे. प्रस्थापित साहित्यकारही अशा कल्पनातीत देवदेवतांना आपल्या साहित्यातून सातत्याने अजरामर करण्याचा प्रयत्न करतात; परंतु साहित्य हे धर्मवादी, दैववादी, जातीवादी किंवा कलावादी असण्यापेक्षा जीवनवादी असावे ही बाब मुद्दामहून बाजूला सारली जाते. कवी सुरेश धनवेंची कविता मात्र याला अपवाद आहे. त्यांची कविता प्रखर जीवनवादी आहे, वास्तव अभिव्यक्तीची पोटतिडीक तिच्याठायी दिसून येते. 'एकादशीचा अभंग' या कवितेत कवीला रानशिवारात राबणारी आपली माय रखुमाई वाटते, तर उन्हातान्हात जीवाचं रान करणारा बाप विठ्ठल वाटतो. कामालाच त्याने राम मानलं आहे, तर शेताला भगवंत म्हटलं आहे, याचा अर्थ कवी प्रस्थापितांच्या दैवी प्रतीकांना नाकारून वास्तव जीवन प्रतीकांची स्थापना करतो, म्हणूनच अस्वस्थ मनाचे बंडमधील कविता विद्रोही आहे. हिंदू धर्म संस्कृतीमध्ये पूजापाठ, नवस-सायास-उपवासांना मौलिक स्थान आहे, आदिवासी समाजसुद्धा मोठ्या प्रमाणात ह्या बेड्यांमध्ये अडकलेला दिसून येतो; परंतु कवी सुरेश धनवे यांच्या विचारांनी मात्र ह्या सर्व बंधनांना झुगारल्याचे दिसून येते. आयुष्यभर उपाशी दिवस काढणाऱ्यांना कुणीही एकादशीचे माहात्म्य सांगू नये, माणसांची नाती जपणाऱ्यांमध्ये कुणीही धर्म आणि जातीचे विष कालवू नये, असे नमूद करतानाच 'कैसा हरिपाठ गाऊ गा मी' ह्या कवितेत कवी म्हणतो की,

''कोण्याच देवांनी / झाकली ना पाठं
कैसा हरिपाठं / गाऊ गा मी''(पृ. क्र.५९ )

विद्रोहाची पाथ घेऊन कात टाकलेली ही कविता अखिल मानवाला परंपरावादी पुरातन व्यूहातून बाहेर काढण्याचे कार्य करते, नव्या जीवनमूल्यांची कास धरण्याचा चोखंदळ मार्ग निवडण्याचे धाडस करताना दिसते. हिंदू धर्मपरंपरेतील वटसावित्रीची पूजा अव्हेरून आधुनिक वैचारिकतेची पेरणी करताना, सत्यवानाच्या सावित्रीपेक्षा ज्योतिबांच्या सावित्रीच्या मूल्यात्मक विचारांची कास धरताना वटपौर्णिमा आणि मी ह्या कवितेत कवी नमूद करतो की,

''एक दिवस वडाभोवती फिरून
प्राणवायू घेण्यापेक्षा मी रुजवतोय
तिच्या मनात आत्मभान / जागृतीचे सावित्री बीज
जे आजन्म पुरवतील तिला आत्मसन्मानाचा
प्राणवायू ''(पृ. क्र. ७३ )

सनातनी व्यवस्थेच्या अन्यायी वृत्तीवर आपल्या कर्तृत्व आणि दातृत्वाने कठोर शैक्षणिक प्रहार करणाऱ्या सावित्रीबाई फुलेंच्या विचारांची पेरणी कवी आपल्या अर्धांगिनीच्या मनावर करतो आहे, तिच्या मनातील अंधश्रद्धांची जळमटं तो बाहेर काढतो आहे आणि तिच्या मनाच्या नाजूक रानामध्ये पिंपळ उगवण्याची वाट पाहतो आहे, कवीचे हे रोपण नक्कीच क्रांतिकारक, नवसंजीवक आणि बुद्धमयी आहे.

**आदिवासींच्या मनात क्रांतिबीजांची पेरणी:** आदिवासी समाजात जन्मलेल्या कवी सुरेश धनवे यांच्या कवितांमधून अभिव्यक्त झालेल्या आदिम जाणिवा आर्य-अनार्य संघर्षापासून आजपर्यंतच्या आदिवासी जगण्याला शब्दबद्ध करतात. भारतभूमीचा मूळ मालक असलेल्या आदिवासींसमोर आज अनेक प्रश्नांची मोहळं घोंघावताना दिसतात. 'एक भारत...' ह्या कवितेमध्ये कवी नमूद करतो की, अनेक शिबिरांमधून अनेकांच्या मनात जात, धर्म, पंथ, वंशभेदाची बीजे पेरली जाताहेत; अनेक बुवाबाबांच्या मठांमध्ये, बौद्धिकांमध्ये शास्त्रांऐवजी शस्त्राच्या भाषा शिकविल्या जात आहेत, अशा प्रवृत्तीच्या लोकांना कवी बांडगुळं म्हणतो. आदिवासी समाज मात्र ह्या सर्व भेदापासून दूर असल्याचे नमूद करताना कवी म्हणतो की,

जिथे अजूनही जात, धर्म, पंथादी
तकलादू वर्चस्ववादी हिंसा पोहचली नाही;
तिथे आहे फक्त आणि फक्त
निर्मळ मनाची कष्टाळू आदिमावस्था! (पृ. क्र.२९ )

आपल्या कवितेतून कवीने आदिवासींच्या जगण्यातील वेगळेपणावर आणि समृद्धतेवर जरी भाष्य केले असले तरी, आजच्या जात, धर्म आक्रमणाच्या काळात आदिवासी समाजाला स्वतःचे अस्तित्व कठीण होऊन बसले आहे, हे नाकारता येत नाही. सावकार, जमीनदार, ठेकेदार, जहागीरदार, वतनदार, सरकारी अधिकारी तसेच पंडित-पुरोहितांच्या अन्यायी सापळ्यांत सापडलेल्या आदिवासींची अवस्था शब्दबद्ध करताना माय व्याजात गेली ह्या कवितेत कवी म्हणतो की,

पगार पत्रकाच्या तावडीतून

मायबापाला कर्जमुक्तीच्या काशीला नेणाऱ्या
कित्येक बाळांचे श्रावण होरपळताहेत व्याजांच्या ज्वालांनी.
सुखाच्या डोह वाटेवर कित्येक अक्षरांध
जन्मदाते होताहेत स्मृतिशेष
इथल्या वाड्या-पाड्याचा हरेक रस्ता जातोय
गहाण पडलेल्या दरवाजातून. (पृ. क्र.३० )

जंगल जिव्हारातील आदिवासी, शेतकरी, शेत मजूर, उसतोड कामगार व्यवस्थेच्या चक्रात सारखा गरगरतो आहे, हे वास्तव पाहून कवी आदिवासींच्या पुरातन समृद्ध जगण्याच्या वाटा पुन्हा शोधू पाहतो आहे, प्रत्येकाच्या मनात क्रांतिबीजांची पेरणी करतो आहे. आर्यांपासून इंग्रजांपर्यंत सर्वच आक्रमणकर्त्यांनी आदिवासींच्या जल, जंगल, जमिनी लाटल्या, संस्कृतीचे विकृतीकरण केले, समृद्ध जगण्याला सुरुंग लावला, तेव्हा बिरसाइतांनी आता सावध झाले पाहिजे असा सूचक इशारा देताना 'आदिमांनो सावधान!' ह्या कवितेत कवी म्हणतो की,

''जल, जंगल, जमिनीचा पाट अन्
आदिम अस्तित्वाचा घाट
राखावाच लागेल पिढ्यांसाठी!
तेव्हा बिरसाइतांनो,
सवैधानिक पाषाणावर परजवून ठेवा लेखनिक तिरकमठे
सांगता येत नाही बाबा
केव्हा कसा लागतील लंगोट उलगुलानसाठी!''
(पृ. क्र.७० )

आदिवासींच्या जीवनाला समृद्ध करणारा एक मौलिक राजमार्ग म्हणजे भारतीय संविधान. या संविधानाच्या जोरावर लेखनिक तिरकमठ्यांना धार लावण्याचा विद्रोही स्वर कवी उच्चारताना दिसतो. धरतीआबा बिरसा मुंडांचे सामाजिक योगदान, डॉ. बाबासाहेब आंबेडकरांची संविधानिक क्रांती आदिवासींना प्रेरित करणारी असल्याचे कवी नमूद करतो. भूतकाळात जरी व्यवस्थेने आम्हाला अंधारगुहेत ढकलले असले तरी वर्तमान तसेच भविष्यकाळात आम्ही ही गुलामीची ओझी वाहणार नाही असे ठामपणे नमूद करताना 'कुणी लादली ही अवदसा' ह्या कवितेत कवी म्हणतो की,

आम्ही आदिम, मूळ निवासी
जगतोय म्हणे पूर्वजन्मी पापाने लादलेल्या

विद्रोहाची पाथ घेऊन कात टाकलेली ही कविता अखिल मानवाला परंपरावादी पुरातन व्यूहातून बाहेर काढण्याचे कार्य करते, नव्या जीवनमूल्यांची कास धरण्याचा चोखंदळ मार्ग निवडण्याचे धाडस करताना दिसते. हिंदू धर्मपरंपरेतील वटसावित्रीची पूजा अव्हेरून आधुनिक वैचारिकतेची पेरणी करताना, सत्यवानाच्या सावित्रीपेक्षा ज्योतिबांच्या सावित्रीच्या मूल्यात्मक विचारांची कास धरताना वटपौर्णिमा आणि मी ह्या कवितेत कवी नमूद करतो की, ''एक दिवस वडाभोवती फिरून

प्राणवायू घेण्यापेक्षा मी रुजवतोय
तिच्या मनात आत्मभान/
जागृतीचे सावित्री बीज
जे आजन्म पुरवतील तिला
आत्मसन्मानाचा
प्राणवायू ''(पृ. क्र. ७३ )

करंटपणात
अनादिअनादकाळापासून.
लटक्या परंपरांचे कळस वाहणार नाहीत
नवजात डोकी भविष्यात (पृ. क्र. १११ )

भारतीय भूमीचा मूळ निवासी असलेल्या आदिवासी समाजाला छळण्यासाठी ह्या व्यवस्थेतील चलाखांनी नेहमीच विविध डाव खेळले; इथल्या पाण्याची, फळांची चव त्यांनी चाखली आणि इथल्याच मातीशी बेईमान झाले. अशा परकीयांना शब्द आसुडांनी फटकारण्याचे कार्य कवी करतो. आदिवासींची नवी पिढी जागृत होते आहे. त्यांच्यात नवचैतन्य निर्माण होते आहे हा आशावाद कवी अभिव्यक्त करतो. व्यवस्थेच्या विरोधात बंड करणारी कवीची भूमिका नक्कीच क्रांतिकारी आणि मोलाची आहे.

**जात्यंध, धर्मांध प्रवृत्तींवर कठोर प्रहारः** कवी सुरेश धनवे यांच्या अस्वस्थ मनाचे बंड ह्या कवितासंग्रहातील अधिकांश कविता ह्या भारतीय समाजव्यवस्थेतील जातिसंस्था आणि धर्मसंस्थांच्या भेदनीतीवर भाष्य करताना दिसतात. ब्राह्मण-क्षत्रिय-वैश्य आणि शूद्र ह्या

जाती व्यवस्थेने भारतभूमीचे अतोनात नुकसान केल्याची भावना त्यांच्या अनेक कवितांमधून अभिव्यक्त झाली आहे. हिंसेचा क्रूर मंत्र, धर्मांकित राजसत्ता, शोकांकित स्वातंत्र्य, दंगल, पुतळे, गाव धर्म वेडे, भग्न वाड्यांचे नग्न अवशेष, धर्माधिष्ठित नगारे, इतिहासी चिरफाड, सत्तेत बदलत्या पगड्या, एवढं कराच गणपती बाप्पा, प्रश्नच प्रश्न, मुखवटा नसलेलं गाव, उदासीन न्यायपालिका, मी करतो दैवाचा चुराडा, धर्मासाठी पैदा करा पोरं, मृत्यूला नसतो मृत्यू, उत्खनन, सत्ता जेव्हा धर्म कुरवाळते अशा साधारणपणे एक तृतीयांश कविता ह्या जात, धर्म ह्या संकल्पनांवर प्रखर भाष्य करणाऱ्या आहेत. प्रत्येक कवितेतील कवीची भूमिका ही जातभंजनाची, धर्मभजनाचीच आहे, जातिधर्माला खतपाणी घालणाऱ्या संस्थांना, मूल्यांना, जाणिवांना कवी मुळातून उखडून फेकू पाहतो आहे. कार्ल मार्क्स या जर्मन विचारवताने 'धर्म ही अफूची गोळी आहे' असे म्हटले होते. ते भारताच्या संदर्भात हुबेहुब लागू पडते. आपल्या धर्मांकित राजसत्ता ह्या कवितेत कवी म्हणतो की,

''ही धर्म निरपेक्ष लोकशाही कमंडलूतल्या तीर्थात
गटांगळ्या खाताना दिसते मला!
दिसते मला धर्माचे चौंडके वाजविणाऱ्या
प्रासादिक हातात सर्व धर्म समभावाची गच्ची''
(पृ. क्र.३३)

कोणत्याही देशात धर्मसत्ता आणि राजसत्ता एक बनून आपल्या राज्याचा गाडा हाकत असेल, तर धर्मांध लोकांच्या झुंडी समाजस्वास्थ्य बिघडवताना दिसतात. स्वतःला परिवर्तनवादी म्हणवून घेणारे अनेकदा धर्मांधांपुढे मान तुकवताना दिसतात, अशा वेळी वैचारिकतेला अर्थ उरत नाही. धर्म व राजसत्ता निरंकुश बनल्यावर कोणत्याही देशाचा विकास होणे शक्य नाही आणि तेच भारतीय लोकशाहीच्या बाबतीत घडत असल्याचे शब्दचित्र कवीने रेखाटले आहे. भावनेच्या भरात जात्यांध व धर्मांधांच्या जथ्यांना नवविचारवाद्यांनी आवरण्याची अपेक्षा कवी व्यक्त करताना दिसतो. कवी सुरेश धनवे यांनी 'पुतळे' ह्या कवितेमध्ये चौकाचौकातील पुतळ्यांच्या दयनीय अवस्थेवर परखड भाष्य केले आहे. जयंत्या, पुण्यतिथ्या आल्यावरच सर्वांना पुतळे आठवतात. जात, जमातीनुसारही पुतळ्यांची विभागणी झालेली असल्यामुळे भेदभावाला आपोआपच खतपाणी मिळत असल्याचे नमूद करताना कवी म्हणतो की,

''हरेकाच्या खांद्यावर वंशवादाचा, जात, जमात,
धर्मवादाचा झेंडा देऊन करतो आपण
सर्वमान्य महामानवाचा पराभव सन्माननीय समारंभात!
काल एक पुतळा वैतागून मला म्हणाला,
आता आम्हीच उठाव करणार आहोत अन्
अमरत्वाला मारण्यासाठी पुन्हा एकदा मरणार आहोत.'' (पृ. क्र. ४६)

महामानवांच्या सर्व पुतळ्यांना उठाव करण्याची वेळ यावी, हीच समाजाच्या अवनतीची लक्षणे असल्याचे दिसून येते. मनुस्मृतीने भारतीय समाजव्यवस्थेला जातीय उतरंडीत पक्के बांधण्याचे मोठे पातक केले आहे. जी जाति व्यवस्था, धर्मव्यवस्था समाजाच्या गळ्याभोवती भगव्या, हिरव्या, निळ्या, पिवळ्या, पांढऱ्या, लाल अशा विविधरंगी झेंड्यांचे पाश आवळते आहे, जी सर्वधर्म समभाव ह्या लोकशाही धारणेलाच छेद देते आहे, त्या व्यवस्थेवरील रोष कवीने अत्यंत प्रखर शब्दांत व्यक्त केला आहे. 'धर्माधिष्ठित नगारे' ही कविता भारतातील बुवाबाबांचे आश्रम, मठ, त्यांच्या धर्म बैठका, पाप पुण्याच्या-स्वर्ग नरकाच्या संकल्पना आणि धर्ममार्तंडांचे अनैतिक व्यवहार यावर सडकून टीका करताना दिसते. कवी म्हणतो की,

'बुडत आहे धर्मनिरपेक्षतेची गाथा
आश्रमाश्रमातील भक्तिरसाच्या डोहात
सत्संगी गाभाऱ्यात गर्जत आहेत
धर्माधिष्ठित राष्ट्रवादाचे नगारे' (पृ. क्र.७६)

भारतीय सनातन धर्मीय ढोंगी साधुसंतांचे, बुवाबाबांचे, धर्मगुरूंचे काळे धंदे अनेकदा जनतेच्यासमोर आले, तरीसुद्धा इथला अंधश्रद्धाळू, धर्मश्रद्धाळू समाज जागा झाला नाही, धर्माच्या नावाखाली जनतेला लुटणाऱ्या बाबांना इथली राजसत्ताच आसरा देत असेल, तर त्या देशाचे भवितव्य अंधकारमयच आहे. हा वास्तव स्फोट कवी सुरेश धनवे यांची कविता करते. संत तुकारामांची गाथा बुडविणारे, छत्रपती शिवरायांच्या राज्याभिषेकास विरोध करणारे, धरतीआबा बिरसा मुंडा यांना आपल्या धर्म जाळ्यात ओढणारे, महात्मा फुलेंच्या शिक्षण



अनुक्रमणिका

कार्याच्या आड येणारे, सावित्रीबाई फुलेंच्या अंगावर शेणाचे गोळे फेकणारे, डॉ. बाबासाहेब आंबेडकरांच्या समाज कार्याला विरोध करणारे भारतातील धर्मांध लोक धर्माधिष्ठित राष्ट्रवादाची विषारी बीजे ह्या भूमीत रुजवू पाहताहेत ही धोक्याची सूचना देताना दिसतो. 'धर्मासाठी पैदा करा पोरं!' ह्या कवितेत धर्मांधांवर टीकास्त्र सोडताना, त्यांच्या मानवद्वेष्ट्या वृत्तींवर कठोर प्रहार करताना कवी म्हणतो की,

"जैनांची अहिंसा शिकवावी त्यांना
बुद्धाची करुणा शिकवावी त्यांना
खिळे ठोकणाऱ्यांनी खिल्याचाच केलेल्या येशुंची
क्षमाशीलता शिकवावी त्यांना
शिकवावा त्याना गुरुजींचा जगाला प्रेम अर्पणारा धर्म." (पृ. क्र.११४)

भारतीय समाजामध्ये धर्माच्या अनुषंगाने विचार करणाऱ्या धर्मांधांना कवीने मानवतावादी धर्माची कास धरण्याचे सूचनच केले आहे. एकूणच कवी सुरेश धनवे यांची कविता जात, धर्म ह्या संकल्पनांच्या अनिर्बंध वापरावर कठोर भाष्य करताना दिसते.

**महामानवांच्या परिवर्तनवादी विचारांची कास:** भारतीय समाजव्यवस्थेला दुःख, दैन्य, दारिद्र्य, यातना, अस्पृश्यता, अज्ञान आणि अधश्रद्धेच्या विळख्यातून बाहेर काढणाऱ्या धरतीआबा बिरसा मुंडा, महात्मा फुले, सावित्रीबाई फुले, डॉ. बाबासाहेब आंबेडकर अशा अनेक थोर समाजसुधारकांच्या विचारांना कवी सुरेश धनवे यांची कविता अभिव्यक्त करते. थोर आदिवासी राक्षसराज सम्राट राजा रावणाला वैदिक, हिंदू संस्कृतीने नेहमीच दुष्ट किंवा अन्याय अत्याचारी म्हणून प्रोमोट केले; परंतु राजा रावणासारखा दयाशील, दानशूर, संगीतज्ञ, शिवभक्त, नवसंस्कृती संस्थापक राजा एकमेवाद्वितीयच म्हणावा लागेल. स्वतः रामानेसुद्धा रावणाचे माहात्म्य मान्य केले होते; परंतु हनुमान, बिभिषणांसारख्या आदिवासी आप्तस्वकीयांच्या फितुरींमुळेच रावणाच्या साम्राज्याला धक्का बसला अन्यथा त्याच्यासारखी समृद्ध संस्कृती कोणीही निर्माण करू शकला नाही, त्या रावणाच्या उच्च प्रतिमेला अभिव्यक्त करताना 'पूज्यनीय रावण' ह्या कवितेत कवी म्हणतो की,

जाळू कुणी न शकला, जाळून रावणाला
मीही खुशाल फिरतो घेऊन रावणाला
केला भले विकारी, इतिहास काल त्यांचा
सत्यात मांडतो मी, उजळून रावणाला (पृ. क्र.६८)

आदिवासींना पूजनीय असलेल्या राजा रावणाचे धर्मांधांकडून दरवर्षी दहन केले जाते. ह्या विकृतीचे समर्थन कोणत्याही मानवतावादी विचारसरणीत न बसणारे आहे. आदिवासी राज्याची घोषणा करणाऱ्या धरतीआबा बिरसा मुंडा यांच्या विचारांच्या प्रेरणेने आदिवासी समाज आज एकत्र आला आहे, त्याला त्याच्यावरील अन्याय अत्याचाराची जाणीव झाली आहे. इंग्रज, सावकार, जमीनदार, ठेकेदार, वतनदार, पुरोहित, पंडित, आध्यात्मिक गुरू, सरकारी अधिकारी यांच्या विरोधात उलगुलान पुकारणाऱ्या धरतीआबाबद्दल 'बिरसा' ह्या कवितेत कवी म्हणतो की,

"बिरसा तुझ्या मताचा, बाजार होत आहे
वस्तीत आज परका, सरदार होत आहे"
(पृ. क्र.६३)

आज आदिवासी समाज जागृत होत आहे; परंतु बिरसाच्या नावाखाली स्वतःचे राजकीय हेतू साध्य करणारेसुद्धा कमी नाहीत, हीच वेदना कवी शब्दबद्ध करताना दिसतो. महात्मा फुले, सावित्रीबाई फुलेंच्या विचारांना सलाम करताना 'सावित्री' ह्या कवितेत कवी म्हणतो की,

"तू ठोकरलीस शेंडीतून
जन्हलेली भेदजन्य संस्कृती
सारस्वतांच्या श्रद्धेयी पाटीवर
गोंदविलीस स्त्रीमुक्तीची बाराखडी
अन् वार-करी झालीस
पुणेरी पगडीच्या छाताडावर." (पृ. क्र.९१)

सुरेश धनवे यांची कविता परकीय आर्य, वैदिक संस्कृतीच्या सांप्रत जातीय, धार्मिक उतरंडीत गुरफटलेल्या हिंदू संस्कृतीच्या मर्मस्थळांवर कठोर प्रहार करताना दिसते. सावित्रीबाईंनी ज्योतीराव फुल्यांच्या साथीने इथल्या प्रस्थापित ब्राह्मणी संस्कृतीच्या धर्मांध आणि जातिभेदी वृत्तींवर आपल्या कृती आणि लेखणीतून आसूड ओढले आहेत. १९४८ मध्ये पुण्यात भारतातील पहिली मुलींची शाळा सुरू केली. भारतीय वर्णवर्चस्वाच्या लढ्याविरुद्ध महात्मा फुले, सावित्रीबाईंनी आवाज उठविला; व्यवस्थेने गुलाम बनविलेल्या दलित शोषित, पीडित स्त्रीला तिचे हक्क मिळवून देण्याचा प्रयत्न केला आणि क्रांतीचे ऊर्जा स्रोतही निर्माण केल्याची ऐतिहासिक नोंद कवी घेताना दिसतो.



अनुक्रमणिका

डॉ. बाबासाहेब आंबेडकरांच्या अथांग व्यक्तिमत्त्वामुळे वैदिक काळापासून चालत आलेल्या अस्पृश्यतेला प्रचंड हादरा बसला आणि दलित, आदिवासी, भटक्या समाजाला बंधमुक्त जीवन अनुभवता आले, ह्या जाणिवेतूनच निर्माण झालेल्या 'प्रज्ञासूर्य' ह्या कवितेतून वास्तवानुभव साकार करताना कवी म्हणतो की,

''सूर्याच्या दिशेने निघालास अन्
अख्खा सूर्यच पचविलास प्रज्ञासूर्या तू!
अगणित मुक्या संवेदनांचा गुदमरलेला दम
बोलता केलास यावल्यात अन्
तेहतीस करोडी दैवी व्यवस्थाच टरकली म्हणे!''
(पृ.क्र.८३)

डॉ. बाबासाहेब आंबेडकरांच्या ऐतिहासिक कार्यामुळेच आजचा समाज मोकळा श्वास घेत आहे; तळागाळातल्या मृतप्राय जीवांना जीवदान मिळाले आहे; त्यांना आपल्या शोषणाची जाणीव झाली आहे; हक्काप्रति, अधिकारांप्रति प्रत्येक जण आज जागृत झाला आहे. १९५६मध्ये डॉ. बाबासाहेब आंबेडकरांनी हिंदू धर्माचा त्याग करून बौद्ध धर्म स्वीकारला आणि एका नव्या पर्वाची सुरुवात झाली. बदललेल्या ह्या जगाचे सर्व श्रेय कवी प्रज्ञासूर्य डॉ. बाबासाहेब आंबेडकरांना देतो.

**आधुनिकीकरणाच्या जबड्यात सापडलेल्या आदिवासींचे वास्तव:** जल, जंगल, जमिनींचा मूळ मालक असलेल्या आदिवासींना आधुनिक युगात विकासाच्या नावाखाली लुबाडले जात आहे; त्यांच्या संस्कृतीचे विकृतीकरण केले जात आहे; 'सेझ' सारखे प्रकल्प, 'समृद्धी'सारखे महामार्ग, नर्मदा नदीवरील आक्रमण आणि पुतळ्याचे राजकारण; विविध प्रदेशांतील धरणांच्या, कारखान्यांच्या, कोळशांच्या, खनिजांच्या नावाखाली आदिवासींचे होणारे विस्थापन अशा अनेक ज्वलंत प्रश्नांच्या अनुषंगाने कवी भूमिका घेताना आपल्या 'आदिमांनो सावधान!' ह्या कवितेत म्हणतो की,

कुठून देणार त्यांना जल, जंगल, जमीन;
जिचे नैसर्गिक वारसत्व आहे आदिम
भूमिपुत्रांच्या रक्तात
जंगलं होतील बोडखे अन् आदिवासी होतील पोरके
(पृ.क्र. ६९)

आदिवासींच्या निसर्गमय जगण्याला सुरुंग लावणाऱ्या ह्या व्यवस्थेला कवी अनेक प्रश्न विचारताना दिसतो. ह्या मूक-बधीर झोपड्या, अंध, विकलांग वासाटे, उपाशी ढोले अशा सर्वांची नोंद कवी घेताना दिसतो. 'कुणी लादली ही अवदसा' ह्या कवितेत आदिवासींचे आजचे वास्तव शब्दबद्ध करताना कवी म्हणतो की,

कुणी नागविले ह्या वस्त्यांचे चिरायू वैभव!
कोण्या एका सत्तेश्वरांनी भोगला म्हणे वनभोग चार दिस! (पृ क्र. १११)

आर्यांपासून इंग्रजांपर्यंत सर्वांनीच आदिवासींच्या निसर्गमय समृद्ध जगण्याला सुरुंग लावला आहे. आज तर आदिवासींना आदिवासी म्हणण्याचीसुद्धा इथल्या व्यवस्थेला लाज वाटते, परकेच इथले सत्ताधीश होऊन बसले आहेत ही वास्तवता कवीने अधोरेखित केली आहे; परंतु आदिवासींच्या नवजात पिढ्या आता सावध झाल्याचेही कवी प्रामुख्याने नमूद करतो.

**सामाजिक प्रश्नांवरील ज्वलंत भाष्य:** कवी सुरेश धनवे यांच्या अस्वस्थ मनाचे बंड मधील अनेक कवितांमधून राजकारण, भूक, गरिबी, बेरोजगारी, लाचारी, दुष्काळ, मोर्चे, संप, बलात्कार, धार्मिक दंगली, अज्ञान-अंधश्रद्धा, वृद्धाश्रम, खेड्यांतील-शहरांतील प्रश्न, आदिवासींच्या जगण्याचे बदलते संदर्भ अशा एकूणच सामाजिक वास्तवावर ज्वलंत भाष्य आले आहे. महाभारतात द्रोणाचार्यांनी अर्जुनाच्या साक्षीने एकलव्याला न शिकविलेल्या विद्येसाठी गुरुदक्षिणा म्हणून हाताचा अंगठा मागितला आणि भेदनीतीची सुरुवात झाली. ही द्रोणाचारी परंपरा आजच्या युगातही सुरू असल्याचे नमूद करताना 'द्रोणा' ह्या कवितेत कवी म्हणतो की,

''तुझ्या बौद्धिक वारसांनीही गिरविला आहे
तोच कित्ता
बुडविली गाथा षंढपणे
छत्रपतींचा राज्याभिषेक अडविणाऱ्या
कोत्या बुद्धिला कुणी सांगावे की;
शौर्याला नसतो धर्म अन् ज्ञानाला नसते जात.''
(पृ.क्र.४२)

आदिवासींच्या हजारो पिढ्या राजा एकलव्यावरील अन्यायाला कदापि विसरणार नाहीत, ही भूमिका कवी शब्दबद्ध करतो. दंगल कवितेमध्ये येणारा हिंदू-मुस्लिमांमधील दंगलींचा संदर्भ, मोर्चा कवितेत येणारे संप,

मोर्चामधील राजकारण, कुणीच कुणाचं नसतं कवितेतील दारिद्र्याचे भीषण वर्णन, शहराळलेले खेडूत कर्मचारी मधील नोकरदार वर्गाचे गावशिवारावरील कमी झालेले प्रेम, अंधविश्वासमधील दगडांच्या देवावर माणसांच्या वाढत जाणाऱ्या श्रद्धा, स्वैराचारी स्वातंत्र्यमधील समाजातील विविध प्रश्नांवरील वास्तव भाष्य, सत्तेत बदलत्या पगड्या कवितेतील सत्ताकारण आणि राजकारणातील कूटनीती अशा अनेक वास्तव विषयांना कवी सुरेश धनवे यांची कविता कवेत घेते, प्रस्थापितांच्या दुष्टनीतीवर कठोर प्रहार करते. आपल्या जगण्याचे बदलते संदर्भ अधोरेखित करताना 'पुस्तकाच्या गल्लीतून...' ह्या कवितेत कवी म्हणतो की,

> नसतीच झाली लेखणीची ओळख तर;
> ह्या संवेदना राहिल्या असत्या बोथट.
> नसत्या गेल्या चेतत ह्या मुर्दाड जाणिवा.
> वर्षानुवर्षांच्या ठणकेला फुटले नसते
> सृजनतेचे कोंब.
> ओळत गेलो नसतो हे पोळत गेलेले दळभद्री आयुष्य. (पृ. क्र. १०४)

स्वातंत्र्योत्तर कालखंडात राज्यघटनेच्या कलमांमध्ये शिक्षणाचा अधिकार मिळाला नसता, डॉ. बाबासाहेब आंबेडकरांनी आदिवासी, दलित, अस्पृश्यांसाठी आपल्या आयुष्याचे रान केले नसते, तर कदाचित ह्या व्यवस्थेच्या कुटील डावांना आपण ओळखू शकलो नसतो, ही वास्तव जाणीव कवीने साकार केली आहे.

**अस्वस्थ मनाचे बंडचे भाषिक विशेष:** सबंध कवितासंग्रहाची अभिव्यक्ती विद्रोही, वास्तववादी, प्रस्थापित व्यवस्थेला नकार देतानाच आशावादी असल्याचे दिसून येते. आध आदिवासी समाजाच्या बोलीभाषेतील असंख्य शब्दांमुळे कवितेला अस्सलपण प्राप्त झाले आहे. उदा. बटिक, झऱ्यागत, घुगऱ्या, किडेमाकोडे, उसंत, मिरग्या किड्यासारखे, सोठमूळं, आदिमावस्था, गहाण पडलेले दरवाजे, ओसरीचे पापुद्रे, हगवण, पुरस्काराच्या सहिष्णू भेंडोळ्या, झगा, तन्कट, दुशा, वांझ चुली, कर्जाची वंढाटी, भगोणं, पसरोक, दरेक बुबुळ, मेंगदाड पौरुषत्व, रक्तबंबाळ नाटी, वाव्हटळ, कडाळपणाचं अवसान, लिंगपिसाळे, प्रतीकात्मक हाडूक, तागड, खंडीभर औत, गैभान्यावानाचं, आंडेल गोन्हे, दावण, मूळांग, रिचवणे, जेवारीचा काळ, कास्तकारी, गढी, आघाडा हराळी, कंडाळ धुमारे, आखुर, मव्ह म्हतारं, नेस्णं, सालोसाल, नटूऱ्याचा धांन्डान्धांडा, खुरपून काढणे, मेंगा, जागल, ढिल्ल्या टांगा, विकलांग वासाटे, कंगाल कणग्या, कासावीस विनग्या, सुतकी अंगण, गाभ्र अशा अनेक आंध आदिवासी बोलीतील शब्दांचा सहजोद्गार अनेक कवितांमधून आला आहे. कवी सुरेश धनवे यांच्या कवितेत येणारे जागतिक संदर्भही लक्षवेधक आहेत. उदा. अण्णा, गॅलिलिओ, कोपर्निकस तुम्ही नसता तर, बसलो असतो उगाळत कपोलकल्पित शेषनागाचे आयाळ, जगावर राज्य करू इच्छिणारा सिकंदर खुल्या हाताने गेला, मृत्यूही घाबरे ज्याला तो हिटलर स्वतःहून मेला, इंग्रजी सरहॅटचा परतवला युनियन जॅक, मला प्रभावित करतो रॉजर बेकनचा बुद्धीप्रामाण्यवाद अशा अनेक जागतिक संदर्भांनी कवितेला व्यापक आयाम प्राप्त होताना दिसतो.

**समारोप/निष्कर्ष:** एकूणच कवी सुरेश सावत्री किसन धनवे यांचा अस्वस्थ मनाचे बंड हा कवितासंग्रह प्रस्थापितांच्या सत्तांध, धर्मांध आणि पैसांध वृत्तीवर कठोर व धाडसी प्रहार करणारा मौलिक कवितासंग्रह आहे. हिंदू धर्मातील देव, धर्म, जात, पाप-पुण्य, स्वर्ग-नरक, पुनर्जन्म, पूजाविधी आणि एकूणच धार्मिक बैठकींवर कवी प्रखर भाष्य करताना दिसतो. ऐतिहासिक, नैसर्गिक, पौराणिक, क्रांतिकारी, आंबेडकरी, परिवर्तनवादी अशा सर्वच प्रेरणा घेऊन आदिवासी कविता समृद्ध बनलेली दिसून येते. कवी सुरेश धनवे यांची कवितासुद्धा ह्या सर्व प्रेरणांनी परिपूर्ण बनली आहे. कवीची भाषा उपहासात्मक, उपरोधी असल्यामुळे प्रस्थापितांच्या अनेक प्रतिमा, प्रतीकांना कवीने लक्ष्य बनविले आहे आणि आदिम जाणिवांच्या प्रतिमा, प्रतीकांना स्थापित केले आहे, असे दिसून येते. अस्वस्थ मनाचे बंड हा कवितासंग्रह आदिवासी साहित्यप्रवाहातील दर्जेदार व नववैचारिकता जोपासणारा महत्त्वाचा कवितासंग्रह आहे, यात शंका नाही, कवीच्या पुढील लेखनासाठी मनःपूर्वक शुभेच्छा!

**डॉ. सखाराम डाखोरे**
अण्णासाहेब वर्तक मानव्य महाविद्यालय, वसई रोड (प.),
जि. पालघर-४०१२०२. चलभाष ९०५०११६६४५
ssdakhore@gmail.com





अनुक्रमणिका



महेश खरात यांच्या 'ओळ तुझ्या माझ्या स्वातंत्र्याची' या काव्यसंग्रहाची सौंदर्यस्थळे उलगडून दाखवणारा लेख.

# ओळ तुझ्या माझ्या स्वातंत्र्याचीः यल्गार बोलणारी कविता...

दत्ता थोरे



कवितासंग्रह- ओळ तुझ्या माझ्या स्वातंत्र्याची
लेखक - महेश खरात
प्रकाशन - लोकवाङ्मय गृह, मुंबई
प्रथमावृत्ती- ९ नोव्हेंबर २०२०
पृष्ठे - १०४ किंमत - १२०/-

सोलापूर जिल्ह्यातील पिलीव (ता. माळशिरस) येथील भूमिपुत्र असलेल्या प्राचार्य डॉ. महेश खरात यांचा 'ओळ तुझ्या माझ्या स्वातंत्र्याची..' हा काव्यसंग्रह नुकताच प्रकाशित झाला. मूलत: मराठी साहित्य विश्वात नावाजलेले समीक्षक म्हणून परिचित असलेल्या खरातांच्या काव्यसंग्रहाचे मराठी साहित्य विश्वातील पहिलेच पाऊल दणकेबाज ठरले. याचे कारण म्हणजे त्यांची कविता नेमकी वेदनेची कळ दाबून विषमतेविरुद्ध यल्गार बोलणारी आहे; माळशिरस तालुक्यातील अस्सल पुणेरी-सोलापुरी मिश्रणाच्या बोली भाषेचा बाज घेऊन वाचकांच्या काळजाचा ठाव घेणारी आहे; संगणक युगातील अनेक प्रतिमा आणि प्रतीकांना सोबत घेऊन आधुनिकतेशी नातं सांगणारी आहेच, शिवाय नाती आणि मातीतल्या अस्सल सांस्कृतिक खाणाखुणा जपत मराठी साहित्याचा ज्ञानोबा-तुकोबापासूनचा ऐश्वर्यसंपन्न जुना पदर उलगडणारीही आहे. लोकवाङ्मय गृहाने प्रकाशित केलेल्या व डॉ. नागनाथ कोत्तापल्ले यांची वेधक प्रस्तावना तसेच कॉ. भालचंद्र कांगो यांनी मलपृष्ठावर केलेले रसग्रहण यामुळे हा काव्यसंग्रह वेगळ्याच उंचीवर पोहोचला आहे.

ओळ तुझ्या माझ्या स्वातंत्र्याची.. तील कविता वाचताना अगदी वाचकांच्या काळजाला भिडतात. याचे



अनुक्रमणिका





कारण म्हणजे खरोखर यातील कविता आपल्या स्वातंत्र्याच्या आहेत.

शब्दांच्या नादानं बहकलो,
अन् काही पावले चालून गेलो
तर
पायात शंभर हत्तीचं बळ आलं

ही त्यांच्या कवितेची ओळ म्हणजे नव्याने शिक्षणाची गंगा घरात गेलेल्या आणि नव्यानेच लिहू लागणाऱ्या तमाम बहुजनांच्या हातांमध्ये आलेली ताकद दाखवून देते. हे पिढ्यान्‌पिढ्याचं अज्ञानाच्या शृंखलेचं दुखणं त्यांनी किती मोजक्या शब्दांत मांडलं आहे. ही वेदना शब्दांत मांडून न थांबणाऱ्या खरातांनी आपल्या कवितासंग्रहात या बेड्या तोडणाऱ्या महात्मा फुले यांचे आणि मानवतावाद सांगणाऱ्या गौतम बुद्धांचं चित्र उतराईचं प्रतीक म्हणून वापरलं आहे. हे चित्रच त्यांची वैचारिक बांधिलकी सांगते. स्वत:च्या या पिढ्यान्‌पिढ्यांवरील अन्यायाचा जाब विचारताना,

तुझा देव माझा देव
एकच आहे म्हणतात
तुला मंदिरात अन् मला मंदिराबाहेर उभं केलं जातं
इथं असच का होतं?

अशा शब्दांतून त्यांची कविता मोकळी होते. हा एकट्या महेश खरातांचा प्रश्न नाही तर बाराशे वर्षे जुन्या वारकरी संप्रदायाचा इतिहास असलेल्या पंढरीतील चोखामेळांच्या समाधी स्थळावरून येणारी युगांची सल आहे. फक्त चोखामेळा आम्ही पायरीचे दास म्हणून ते स्वीकारतात, तर आधुनिक युगातील खरात ओळ तुझ्या माझ्या स्वातंत्र्याची.. मधून याचा रोकडा सवाल करीत जाब विचारतात. ज्ञानोबापासून तुकोबापर्यंत अठरा पगड जातीच्या पाया ते कळस या मालिकेतील वारकरी संतांनी बाराशे वर्षे केलेल्या निरुपणी मशागतीला आलेलं हे विद्रोही फूल आहे, ज्याचा सुगंध मराठी कवितेला मोहून टाकतो आहे. खरात इथे थांबत नाहीत. आपला तुकोबारायांचा वारसा सांगताना ते लिहितात,

तुक्या तुझ्या दिंडीसंगे चाले पंढरीची वाट
वाटेमध्ये लागतोय दिव्यांचा अवघड घाट
माझा कणा आहे ताठ तुझा अभग आहे पाठ
माझी ठेवण झालीया नीट तुझ्या अभंगाचा कोट
तुक्या तुझ्या अभंगानं इंद्रायणीला वेड केलं
वेड्या झाल्या माणसाला अभंगानं शहाणं केलं

या आधुनिक युगातही संत तुकारामांचा अभंग आपल्यासाठी टाय कोट आहे हे सांगताना आपल्या संतांचं ते महत्त्व आधुनिक युगातही विशद करतात. हा दिव्यांचा अवघड घाट म्हणजे विषमतेची कठीण वाट आहे. तुकोबांचा अभंग म्हणजे घाट छेदणारी उजेडांची वाट आहे. तुझ्या पाठ असलेल्या अभंगामुळे माझा कणा ताठ असल्याचं हितगुज ते तुकोबारायांशी कवितेतून करतात.

माय हा मराठी साहित्यिकांसाठी कधी न संपणारा विषय. यात आशय भरताना खरात लिहितात,

जेव्हा ताटावरुन उठताना
बाप समाधानाची ढेकर देतो,
तेव्हा माईच्या काळजातील
मायेची माया लोकर होते,
जवा काटक्या झाल्या मायच्या
हातानं उलतानां भाकर साखर झाली
तवाचं टोपल्यातल्या शिळ्या
भाकरीतून तृप्तीची ढेकर आली

ही तर आपल्याच म्हाताऱ्या आई-बापाच्या वृद्धापकाळातील प्रेमाची कहाणी नव्हे काय? अथवा 'जवा माय बोलायची तवा हृदय खोलायची, काळ्या मण्यांच्या पोताची ती गुपित खोलायची' हे खरातांचे शब्द तिचे विश्व आणि आयुष्य गळ्यातल्या काळ्या मण्यांभोवतीच कसे फिरले याची गोष्ट सांगून जातात. 'नेत्राचा दिवा केला, हाताचा पाळणा, कळण्याची आमटी आणि मिलूची भाकरी खाऊन बाळां जोजवलं तुला।।' हे कवीचे शब्द एका पिढ्यातील आईने जोजवलेल्या संघर्षाची चित्तरकथा उलगडवतात.

माय, तुझ्या आयुष्याच्या मंचावर
कधी नाचले नाहीत चंचल मनाचे मोरपंखी मोर
प्रतिदिन अखंडित मोहाच्या असंख्य माशा घोंगावत
राहिल्या अवतीभवती
तू ओंगळू दिली नाहीस लालसेची लाळ

हे त्यांचे आईबद्दलचे वर्णन निर्व्याज आईपणाचे मोठेपण नकळतपणे सांगून जातात. 'माय, दु:खाचे असंख्य डोंगर डोईवर घेवून, तू चालत राहिलीस काट्याकुट्यांचा रस्ता, कडक उन्हानं भाजलेल्या पायात कोरल्या गेल्या कुरपाच्या

खरातांची कविता पूर्वप्रभावित नाही. ती स्वयंभू आहे. स्वतःच्या अनुभव आणि सामाजिक चिंतनावर खंबीरपणे उभारली आहे; पण त्यांच्या कवितेतील स्वातंत्र्याची अभिलाषा प्रचंड विद्रोही आहे. बंडखोर आहे. 'मी लोळलो नाही राजेरजवाड्यांच्या पायाशी, की मळलो नाही सनातन्यांच्या मेळ्याशी, म्हणून माझ्या मनामध्ये समतेचे अविरत अभिसरण सुरू आहे' हे ती ठामपणे सांगते. 'मी ठेवतो ओठांवर बुद्धाचे हास्य अन् चेहऱ्यावर महावीराचे तेज, माणूस होण्यासाठीचे हेच खरे पेज' ही त्यांची भावना जाती-धर्माच्या भेदांमध्ये हरविलेल्या माणूसपणाच्या शोधात निघालेल्या कवीचे मनोगत आहे.

लेण्या, सोनारानं नाक टोचावं तसं तळव्याला टोचले सराट्याचे टोकदार काटे' हे ग्रामीण आईनं भोगलेलं कष्टाचं जिणं ते मांडतात तेव्हा गावागावातल्या आयांची कहाणी समोर येते. पायात मोडणारा काटा म्हणजे सोनाराने नाक टोचणे आहे, इतकं दुःख आईच्या अंगवळणी पडल्याचे प्रतीकातून ते सांगतात तेव्हा काळजात चर्रर होतं म्हणूनच खरातांची कविता काळजाचा ठाव घेणारी वाटते. कुणालाही आपली आई माधुरी दीक्षितसारखी सुंदर असावी असे वाटत नाही, तर आपली आई कितीही काळी असली तरी माधुरी दीक्षितहून सुंदर का वाटते. याचे कारण या निर्व्याज आईपणाची साक्ष देणाऱ्या ओळीत दिसते.

खरातांची कविता पूर्वप्रभावित नाही. ती स्वयंभू आहे. स्वतःच्या अनुभव आणि सामाजिक चिंतनावर खंबीरपणे उभारली आहे; पण त्यांच्या कवितेतील स्वातंत्र्याची अभिलाषा प्रचंड विद्रोही आहे. बंडखोर आहे. 'मी लोळलो नाही राजेरजवाड्यांच्या पायाशी, की मळलो नाही सनातन्यांच्या मेळ्याशी, म्हणून माझ्या मनामध्ये समतेचे अविरत अभिसरण सुरू आहे' हे ती ठामपणे सांगते. 'मी ठेवतो ओठांवर बुद्धाचे हास्य अन् चेहऱ्यावर महावीराचे तेज, माणूस होण्यासाठीचे हेच खरे पेज' ही त्यांची भावना जाती-धर्माच्या भेदांमध्ये हरविलेल्या माणूसपणाच्या शोधात निघालेल्या कवीचे मनोगत आहे. ते फक्त वास्तव सांगून थांबत नाहीत. माझ्या वाणीच्या उल्का उल्कापातासारख्या मंचामंचावरून बरसत असताना तू दाभणाने तोंड शिवून घेतोस, अन् लावून घेतो चिकटपट्टी तोंडाला चिकट फू।। मग वैखरीच्या शब्दप्रभूलाच प्रश्न पडतो की खरा मुका कोण? असा जहाल प्रश्न विचारून पांढरपेशी होऊन कोणत्याही प्रश्नावर मुक्या राहणाऱ्या तोंडबंद व दारबंदीत जगणाऱ्या मध्यमवर्गीय समाजाला ते ढुसण्या देणारा प्रश्न विचारतात. तुमच्या माझ्या मुकेपणाला आव्हान देतात. नुस्ते आव्हान देऊन ते थांबत नाहीत, तर तुझे पंख छाटले आणि ठेकेदाराने उखळात कुटले, तेव्हापासून तुझी उडी कुंपणापर्यंतच पडते आहे आणि तुझी क्षमता कुंडीतच सडते आहे याची जाणीवसुद्धा ते करून देतात, तेव्हा मूग गिळून गप्प राहणाऱ्या समाजाचा आपण घटक असल्याची जाणीव झाल्याशिवाय राहात नाही. बारुदाची वात मात्र मेंदूत नेऊन सोड, आज नाही उद्या तर शिलगावली जाईल वात असा मुक्तछंदी आशावादही ते व्यक्त करतात. इनमिन चाळीस कवितांचा हा संग्रह; पण चाळीस हजार हत्तींचे बळ पेरणारा आहे.

तुम्ही नाचविणारे होतात,
आम्ही नाचणारे होतो,
तुम्ही डोलविणारे होतात
आणि आम्ही डोलणारे होतो
किती दिवस हाच खेळ खेळायचा?
जरा पार्टी बदलून बघा

सहन होतंय का? हा त्यांचा प्रश्न! आधुनिक काळे इंग्रज असलेल्या तमाम राजकारण्यांच्या डोक्याला त्याने झिणझिण्या नाही आणल्या तर नवलच.

**दत्ता थोरे**
चलभाष : ९९२२९३०२०८

◈ ◈



सुधीर देवरे यांच्या 'मी गोष्टीत मावत नाही' या कादंबरीचे परीक्षण करणारा लेख.

# समाजभानाची प्रायोगिक जीवनकथा
## (मी गोष्टीत मावत नाही)

डॉ. सविता पटेल




कादंबरी: मी गोष्टीत मावत नाही
लेखक : डॉ. सुधीर राजाराम देवरे
प्रकाशक : पद्मगंधा प्रकाशन, पुणे
प्रथम आवृत्ती: २५ फेब्रुवारी २०१९
पृष्ठसंख्या: १३७ मूल्य : १७०/-

डॉ. सुधीर देवरे लिखित 'मी गोष्टीत मावत नाही' ही कादंबरी वाचायला हातात घेताच प्रथम मुखपृष्ठाने मला खिळवून ठेवले. कादंबरीच्या आशयाचे प्रतिबिंब मुखपृष्ठ दाखवत होते. कोणत्याही गोष्टीत न मावणारा मी, हे शीर्षक लक्षवेधी चित्रातून दिसत होते. मोठा साप व त्याला असंख्य पाय; पण सापाला पाय कसे? मग पायांच्या जागी विविध प्रकारची माणसं दिसू लागलीत. सापावर स्वार होऊन वा सापाला आंगळलेली. कोणी एका हातावर लटकलेले, कोणी दोन्ही हात लटकवून झोके घेत असलेली, कोणी जाणारा तोल सांभाळणारी तर कोणी वाकलेली, झुकलेली, अर्धवट झोपलेली, टेकून बसलेली, हात वर करणारी अशी विविध प्रकारची माणसे. लांबीने साप; परंतु लटकलेली माणसं का होईना पायांचे काय? ही लांबलचक 'गोम' असल्यासारखेही वाटले. साप की गोम ? उत्सुकता वाढत गेली. गोमच्या तोंडात एक तीक्ष्ण बाण आडवा धरलेला आणि त्याच्या खाली एक व्यक्ती व ध्यानस्थ, दोन्ही हात नमस्कार स्थितीत डोक्याच्या वर जोडलेले. आडव्या बाणाची दिशा कादंबरीची पानं उघडण्याकडे...

एक व्यक्ती ध्यानस्थ बसून परिसरातील निरीक्षण, अवलोकन करते. विविध भलेबुरे अनुभव ही माणसेच देत असतात.सूक्ष्म बारकाईने निरीक्षण करताना लेखक एकाग्र



अनुक्रमणिका






व ध्यानस्थ होत बाणरूपी लेखणीतून निशाण साधत आहेत. बाण हे लेखणीचे प्रतीक असून अनेक प्रकारची माणसे लेखकाने दिशादर्शक केली आहेत.

सापाची लांबी व गोमचे पाय अन् चेहरा मात्र हुबेहूब माणसाचा, हे दोन कानांवरून लक्षात येते. डोंबाऱ्याने जसा आपल्या दोन्ही हातात बांबू घेऊन तारेवरची कसरत करत स्वतःचा तोल सावरावा. सारा खेळ बांबूवरच तोललेला. बाणरूपी लेखणीतून लेखकाने माणसांचा विविधांगाने अभ्यास करत योग्य तेथे समाजसुधारणेसाठी, तळागाळातील माणसांसाठी, दुर्बल घटकांसाठी वास्तवरूपी 'तीर' सोडलाय. हा 'तीर' केवळ कोणा एका व्यक्तीसाठी नसून समाजातील प्रत्येक 'मी' जे गोष्टीत मावत नाहीत, त्याची नौका या तीरावरून त्या तीरावर स्थिरस्थावर लावण्याची तळमळ म्हणजे या कादंबरीतला आशय.

सरदार जाधव यांच्या मुखपृष्ठाने एवढा वेळ खिळवून ठेवले, तर पुढे कादंबरीच्या आशयाच्या उत्सुकतेचे काय? कादंबरीचे पान उघडताच लक्षात आले, की ही केवळ कादंबरी नाही तर निवेदनात्मक व प्रायोगिक स्वरूपातील काही तत्त्व व सत्त्व असल्याचे लक्षात येत गेले. सुरुवातच 'सरगाठ' बांधण्यापासून झाली. (सरगाठन हा अहिराणी शब्द. असे काही महत्त्वपूर्ण अहिराणी शब्द या कादंबरीत जाणिवपूर्वक उपयोजित होत राहतात.) सरगाठीसारखे या कादंबरीचे साधेसोपे वैशिष्ट्य आहे. कादंबरीचा आजपर्यंतचा अर्थ नव्याण्णव टक्के व्यक्तींना हाच माहीत असतो, की निसर्गवर्णन, व्यक्तीवर्णन, स्वभाववर्णन, आशय-विषय-शैली अथपासून-इतिपर्यंत एकाच कथानक सूत्रात बांधलेली एक दीर्घ कथा म्हणजेच कादंबरी; परंतु 'मी गोष्टीत मावत नाही' ही कोणा एकाची जीवन कथा आहे असे नाही. सगळे मिळून एक समष्टीची कथा या कादंबरीत उलगडत राहते. निवेदनातून सादर करताना लेखकाने त्याचे तुकडे-तुकडे करत अखिल समाज वास्तव रेखाटले आहे म्हणून ही कादंबरी कथा-कादंबरी आहे. मराठी साहित्य जगतात असे लिखाण दिसून येत नाही.

लेखकाने प्रास्ताविकात म्हटल्याप्रमाणे 'मी' चे अस्तित्व हे पृथ्वीतलावरील प्रत्येक घटकाचा समावेश करते. मी केवळ लेखक नाही किंवा इतर कोणी लेखक, कवी, समोरची व्यक्तीही नाही, तर 'मी' म्हणजे 'मी' व 'मी' म्हणजे आपण सर्व हा एक परीघ आहे म्हणूनच लेखकाने भले मोठे मनोगत व्यक्त न करता 'मी' च्या रूपातून 'मी गोष्टीत मावत नाही' हे शीर्षक देऊन वाचकाची उत्कंठा शिगेला पोचवली. हा 'मी' म्हणजे आपसूकच वाचकास लेखक वाटेल; पण 'मी' चा सर्व व्यापक विचार करून लेखकाने स्वत कडे काहीच न ठेवता आपल्या लेखणीच्या व विचारांच्या औदार्याने समाजास बहाल केले, हीच या कादंबरीची खासियत.

अनेक महिन्यांपासून 'मी गोष्टीत मावत नाही' ही कादंबरी वाचायची उत्सुकता होती. कादंबरी उपलब्ध केली, प्रसंगी माझ्या बॅगमध्ये ठेवली, कामाच्या ठिकाणी फावल्या वेळात वाचावी म्हणून; परंतु आज उद्या करत राहून जात होते. कादंबरी वाचायला सुरुवात केली आणि मी माझे सर्व पाश विसरून गेले. कादंबरीतले सर्व काही माझ्या आजूबाजूला घडतेय असे जाणवायला लागले. पूर्ण वाचूनच उठले. वाचताना पेन्सिलीने लिहून ठेवायला या पुस्तकानेच भाग पाडले. पुस्तकावरची प्रतिक्रिया कच्च्या कागदावरून पक्क्या कागदावर उतरवण्यास मात्र प्रचंड ताकद लागणार होती. पुस्तकच खूप मोठ्या ताकदीचे आहे. त्यावर मी लिहू शकेन का? इत्यादी.

'मी गोष्टीत मावत नाही' चे मुख्य वैशिष्ट्य म्हणजे येथे आत्मपरता नाही. भोवतालची परिस्थिती, मनःस्थितीचा व्यक्तींच्या जीवनावर सकारात्मक, नकारात्मक होणारा परिणाम. अनेक माणसं वाचण्याची कला कादंबरी लेखकाला साधली आहे. मी स्वत:वरच टीका करत राहतो. स्वत:ची निंदा करत राहतो. या कादंबरीचे असंख्य टप्पे लेखकाच्या अनुभवाचे की काय? हा शेवटपर्यंत प्रश्न. या तुकड्या-तुकड्यांतूनच लेखकाच्या मनातील सूत्र सहज गुंफले आहे, मनातले कागदावर अवतरून समाजासमोर अनेक प्रश्न उपस्थित केले गेलेत.

कादंबरीतील मुख्य पात्र सुधर्म देवकिरण हा लेखक होण्यासाठी धडपडतो. त्याच्या नावावर एक तरी पुस्तक हवे, असे तिरकस निवेदन येते. यात अनेक माणसांची गोष्ट आहे आणि त्याहीपेक्षा अस्थैर्य, घुसमट, लैंगिकता, नाते संबंध, भीती, ताण या साऱ्यांचा परिणाम माणसावर कसा होतो, याचीही 'ही' गोष्ट आहे. विविध माणुसकीच्या भिंती उभारण्याचे कार्य कादंबरीतून घडताना दिसते. या

गोष्टींत केवळ मेंदू, दोन पाय, दोन हातांचा माणूसच नाही तर उंदीर, घुशी, साप आदी पशु-कीटकांचाही समावेश आहे. उंदरावर मानवी आरोप आहेत. माणूस उंदीर-घुशीसारखे बीळ दिसेल तिथे स्वतःचे स्थान निर्माण करतो. केवळ 'स्व' अस्तित्वासाठीच म्हणून या कादंबरीत 'मी' असला तरी चराचर सृष्टीची ही व्यापक गोष्ट आहे.

या लिखाणाला कादंबरी म्हणायची की नाही इथपासून प्रश्न पडतो. वाचून झाल्यावर ही प्रचंड मेहनत घेऊन चिंतनात्मक लिखाणाने सिद्ध केलेली व समाजभान देणारी प्रायोगिक कादंबरी वाटली. लेखकाने आपल्या खास शैलीत उपहास गर्भ टिप्पण्या मार्मिकपणे टोचल्या आहेत. कादंबरी वाचताना कादंबरीतील लेखकाचा जन्म ते वर्तमान स्थिती-गतीचा जणू चढ-उताराचा आलेख असल्यासारखे वाटते. यातील मुख्य पात्र सुधर्म देवकिरण हे काल्पनिक नसून लेखक स्वतः आहेत की काय अशी आत्मपरता त्यातून सतत जाणवत राहिली. एका लेखक पात्राचे आत्मकथन असलेली कादंबरी असेही या पुस्तकाला म्हणता येईल. मनाचे विरेचन कसे होते हे या कादंबरीत उपयोजित होते.

लेखक डॉ. सुधीर देवरे दिव्यांग असून त्यांचे 'पंख गळून गेले तरी...' (पूर्वार्ध) व 'सहज उडत राहिलो' (उत्तरार्ध) ही दोन्ही आत्मचरित्रे मी अभ्यासली आहेत. त्यावरून लेखकाच्या जीवन मानाची, स्वभावधर्माची मला बऱ्यापैकी कल्पना असल्याने या कादंबरीतदेखील लेखक स्वतः आहेत असेच वाटत राहिले. घराच्या स्वप्नापासून अनेक सावल्या पुस्तकात दिसत राहिल्या. मी अमूक राहिलो असतो तर..., मी तमूक राहिलो असतो तर..., ताठ मानेने जगता आले असते..., यांसारख्या काल्पनिक भराऱ्या वाचताना अंगाला शहारे आलेत.

दुष्ट माणूस, चांगला माणूस, दलाल, देव, व्यापार यांसारख्या वर्णनातून 'माणूस म्हणून जवळ येऊन स्वाभिमानाने जगू,पाय नसले तरी सापासारखे सरपटत पण उंच मान करून चालू', हा संदेश वारंवार लेखक या कादंबरीतून देत राहतात. आजचे अनेक लेखक-कवी अपवाद वगळता लाचारी करतात. ते लेखकाने करू नये, हा संदेशही बऱ्याच वाक्यांतून इथे अधोरेखित होताना दिसतो. सुधर्म देवकिरण या पात्राची ही रोजनिशी आहे का? ती पुढेही अशीच प्रकाशित होत राहील का, माहीत नाही. 'लेखन जगायचे सुख बनले!' हे वाक्य हाडाचा व तळमळीचा लेखक कसा असावा हे प्रतिबिंबित करते.

या कादंबरीतील देव आधी की माणूस? हा प्रश्न वाचकांस खिळवून ठेवतो. राजकारण, समाजकारण, विज्ञान, धर्म, वैश्विक धर्म, देव, सत्ता, निखळ माणूस अशा विविध विषयांना हात घालत जणू काही एक जीवनानुभूतीचा 'ताम्रपट' रंगवलाय. एखादी गद्य बखर असल्यासारखे १९८२ ते २००३ पर्यंतचा काळ भूत, वर्तमान आणि भविष्य असे एकामागून एक टप्पे गाठत सरगाठ बांधून येत्या पिढीस लेखनरूपी बाण- दिशा दर्शवण्याचे महत्कार्य कादंबरीने केले आहे म्हणून ही सरगाठ सहज सोडली जाते व बांधलीही जाते. नायक सुधर्म देवकरण विविध भूमिका वटवतो. तो हौसेपोटी लिखाण करत नाही, तो जगणंच शब्दांत मांडत राहतो. मी गोष्टीत मावत नाही ही केवळ कादंबरी नसून जीवन जगण्याच्या मंत्राचे रसायन आहे, म्हणूनच डॉ.सुधीर देवरे या कादंबरीच्या शेवटी सरगाठ मारत म्हणतात, 'मानवी आयुष्यात पूर्ण असे काहीच नाही. जे मिळते ते अपूर्ण स्वरूपात असते. मात्र जे आहे- जे मिळते त्यात समाधान मानावे.' या अवतरणातून लेखकाच्या मनाचा मोठेपणा गोष्टीत मावू देत नाही. लेखक गोष्टीत शिरूनही गोष्टी बाहेरच उरतात. मराठीत अतिशय महत्त्वाचे योगदान देणाऱ्या या कादंबरीचे हेच खास रहस्यमय वैशिष्ट्य होय.

**डॉ. सविता पटेल**
कन्हैया नगर, रामकुटी, ४७ नवजीवन
हॉस्पिटल जवळ, जिजामाता कॉलेज समोर
बायपास रोड, नंदुरबार- ४२५४१२
चलभाष- ८७८८९३१२०७
drsavitapatel00@gmail.com





अनुक्रमणिका








जागतिकीकरणाच्या प्रक्रियेत वाताहत झालेल्या कृषिकेंद्रित ग्रामवास्तवाची बदलती रूपे रेखाटणाऱ्या कैलास दौंड यांच्या 'आगंतुकाची स्वगते' या काव्यसंग्रहावरील लेख

# जागतिकीकरणातील शेतीधारित जगण्याची प्रत्ययकारी कविताः आगंतुकाची स्वगते

प्रा. डॉ. सुभाष निवृत्ती शेकडे



कवितासंग्रहः आगंतुकाची स्वगते
कवी : डॉ. कैलास दौंड
प्रकाशक : चपराक प्रकाशन, पुणे
प्रथमावृत्ती : १२ जानेवारी २०२१
पृष्ठे : ९६ मूल्य : ११०/-

जागतिकीकरणाचा स्वीकार करून पाव शतकाचा काळ सरून गेला आहे. 'खाऊजा' धोरणाला धास्तावलेला समाज आज अपरिहार्यपणे त्याचे इष्ट-अनिष्ट परिणाम भोगत आहे. या धोरणाचा एकूणच मानवी जीवनावर दूरगामी परिणाम झालेला असला तरी प्रामुख्याने कृषिकेंद्रित ग्रामजीवनावर झालेला परिणाम तेथील जगणे बकाल नि अशाश्वत करणारा आहे. जागतिकीकरणाची आणि माणूसपणाची भलावण एकाचवेळी करणे अशक्य आहे. आताशा मराठी साहित्यातही जागतिकीकरणाचे आणि त्याच्या परिणामांचे थोडेबहुत चित्रण होऊ लागलेले आहे. असे चित्रण करणाऱ्या समकालीन मराठीतील मोजक्या कवींमध्ये कैलास दौंड यांचा समावेश होतो. समकालीन विषयाला भिडणाऱ्या वास्तवदर्शी 'पाणधुई', 'कापूसकाळ' आणि 'तुडवण' या महत्त्वाच्या कादंबऱ्या लिहून कादंबरीकार म्हणून प्रसिद्धी मिळवलेले कैलास दौंड हे मुख्यत्वे कवी आहेत. त्यांचे 'उसाच्या कविता', 'वसाण', 'भोग सरू दे उन्हाचा', 'अंधाराचा गाव माझा' हे चार कवितासंग्रह प्रसिद्ध असून 'आगंतुकाची स्वगते' हा ओळीने प्रकाशित झालेला पाचवा कवितासंग्रह आहे. 'उसाच्या कविता' २००१ मध्ये प्रकाशित झाला, तर 'आगंतुकाची स्वगते' २०२१ मध्ये प्रकाशित झाला आहे. या वीस वर्षांत कैलास दौंड



अनुक्रमणिका

यांची कविता उत्तरोत्तर अधिक विकसित आणि जाणिवांनी समृद्ध होत गेल्याचे त्यांच्या सर्वच कवितासंग्रहांतून स्पष्टपणे अधोरेखित होते.

'आगंतुकाची स्वगते' वाचताना या कविता-संग्रहातील कविता जागतिकीकरणाच्या शेतशिवारावर नि कृषिकेंद्रित माणसावर झालेल्या परिणामांची दाहकता नेमकेपणाने व्यक्त करणारी आजच्या मराठी कवितेतील महत्त्वपूर्ण कविता आहे हे स्पष्टपणे जाणवत राहते. गाव खेड्याशी जोडून घेत तिथले जगणे मुळातून समजून घेतल्याखेरीज आणि त्याच्याशी तादात्म्य पावल्याखेरीज हे अशक्य आहे. त्यामुळेच आजच्या विपुल कविता निर्मितीच्या काळातही स्वतःचे स्थान अबाधित ठेवणारी ही कविता आहे हे नक्कीच.

'आगंतुकाची स्वगते' मधील कवितांची कवीने तीन भागांत मांडणी केलेली आहे. 'सल आणि ओल' हा आरंभीचा विभाग असून तो पृष्ठ ११ ते ४२ दरम्यान असून त्यात एकूण २८ कविता आहेत. गाव, खेड्यातील शेतकरी जीवनावर झालेल्या जागतिकीकरणाच्या व्यापक परिणामाच्या कविता या विभागात आहेत. या कवितांमधील उत्स्फूर्ततादेखील कमालीची असल्याचे दिसते. भाषिक पातळीवरही या कवितांचा जोशपूर्ण पोत परिणामकारकता वाढवणारा आहे.

आज घडीला कृषिक्षेत्राची अवस्था कमालीच्या बेभरवशाची झालेली आहे. शेतकऱ्याकडे असलेली शेती दर पिढीत कमीकमी होत गेली. शेतमालाला मिळणारा अल्पभाव, अधिक उत्पादन झाल्यावरही होणारी आयात, आर्थिक उदारीकरण आणि खुल्या बाजारव्यवस्थेचा स्वीकार केल्यानंतरदेखील अधूनमधून होणारी शेतीमालाच्या निर्यातीवरील बंदी आणि बेभरवशाचा निसर्ग यामुळे शेतकऱ्यांच्या हालात भरच पडते. साहजिकच त्याला सरकारी मदतीवर अवलंबून राहावे लागते. अशा काळात शेतीवरील भार हलका करावयाचा म्हणजे नेमके काय करावयाचे? हा प्रश्न अस्वस्थ करणारा असाच आहे. 'आगंतुकाची स्वगते' मधील पहिल्याच कवितेत कवी पुढील ओळी लिहून जातात :

'शेती करायची असेल तर
ते बिंबवत असलेल्या गोष्टी नीट समजून घे
आणि

दैनंदिन जीवनात पैसा हाच घटक महत्त्वाचा
झाल्याने तो अधिकाधिक कमावण्याकडे
माणसांचा कल वाढला. अनेकांनी
त्यासाठी गैरमार्गांचाही अवलंब केला.
भ्रष्टाचार हा तोच प्रकार जो पूर्वी एकूणच
आचारासंबंधी असेल; पण गेल्या काही
वर्षांपासून केवळ आर्थिक गैरव्यवहारालाच
भ्रष्टाचार समजले जाऊ लागले आहे आणि
त्याची झळ थेट गावपातळीवरही बसू
लागलेली आहे. सामान्य माणूस त्यामुळे
नाडला जाऊ लागला आहे. जिथे तिथे रांगा
लावणे आणि विशिष्ट लोकांना
विनाअडथळा मध्येच जाऊ देणे हे
नित्याचेच झाले आहे. कवी लिहितो –

'छावणीत गुरांच्याही
मलिदा चाखतो कोणी
रांगेत उभे तिष्ठता
डोळ्यात वाहते पाणी'

दाखव जगाला की
सुचवण्यापेक्षा वाचवणं किती महत्त्वाचं असतं ते!'
(वाचवणं महत्त्वाचं/११)

एकूणच सुचवणाऱ्यांच्या सुचवण्यामागचा हेतू सजगपणे समजून घेण्याची आणि त्यामागे सुचवणाऱ्यांचा काही सुप्त हेतू तर नाही ना? हे पडताळून पाहण्याची गरज कवी अधोरेखित करतो. आज खेड्यातील माणसे शेती तोट्यात गेली, की हतबल होऊन बसतात. वर्तमानातील व्यवधाने आणि भविष्यातील चिंता त्याला खायला उठतात. अशात कुठून तरी अशुभाचे सावट असलेली किंवा किंचित आशा असणारी अफवा कानोकानी पसरते आणि हतबलता सचेतन होते. कवीने हे चित्र नेमके शब्दांत पकडले आहे ते असे –

'कुणीतरी उठवते अफवा
एखाद्या घरातला दिवा फडफडल्याची
तर कधी
शेतीचं अनुदान बँकेत जमा झाल्याची.'
(गाव बिव /३४)

शेतीत पिकणाऱ्या पिकांपेक्षा अनुदानाची वाट पाहत बसावी लागणे हे चित्र नक्कीच आशादायी नाही.

जागतिकीकरणाच्या आक्रमणाची मोठी झळ बसली ती माणसातील नात्यांना. आर्थिक हितसंबंधाने नाती जवळची की दूरची ते ठरवले जाऊ लागले, त्यामुळे नात्यातील बंध सैलसर झालेले दिसतात. शहरे आणि गावखेड्यातील माणूसही याला अपवाद असणे शक्य नव्हते. कायद्याने मुलींनाही वडिलांच्या संपत्तीतील हिस्सा देऊ केला आहे; परंतु बहिणीने तिचा हिस्सा मागू नये अशीच बहुतांश भावांची आणि आई-वडिलांची देखील इच्छा असते. बहिणींना कृतक प्रेमाने बोलवून 'हक्कसोड पत्रा'वर सह्या घेतल्या जातात आणि त्यानंतर हा सख्खा नातेसंबंधदेखील दोघांच्याही मनातून दुरावत जातो. कवीला असलेली बदलत्या नातेसंबंधाची नेमकी जाण आणि सूक्ष्म समाजनिरीक्षण यातून आलेल्या कवितांच्या ओळी या दृष्टीने लक्ष वेधून घेत अंतर्मुख करणाऱ्या आहेत.

'कागदावरती मागितल्या सह्या
नात्याच्या डोहात बुडविल्या वह्या '
(खातेफोड/१२).

एकदा आपला हक्क सोडला, की मग प्रसंगोप्रसंगी तुटलेपणाची सल मनात घर करून राहते. ती सल भोवतालच्या माणसांना समजणे शक्यही नसते.

'उधाणल्या उरूसात
मन का उदास
सल हंबराची काय
कळते कुणास?' ( सल /१७)

जणू माणसातल्या माणसाची मातीच डोळ्यात जाते. स्वार्थाने माणूस कमालीचा स्वकेंद्रीत झाला आहे. माणसातील नात्यांची ओल बऱ्यापैकी दुर्मिळ झाली आहे. हे सांगताना कवी अस्वस्थ होत लिहितो –

'पाणी मातीस शोधते
रुजतांना खोल
अख्खा नदीला मिळेना
माणसाची ओल.'( ओल/२०).

एकूणच नात्यांनी उबदार मतलबांचा वेश धारण केल्याचे निरीक्षणही कवी कैलास दौंड नोंदवतात. या मानवी नात्यांना जोडूनच त्यांनी नदी आणि ओल या प्रतिमा चपखलपणे योजलेल्या आहेत. एकेकाळी नदीला देवता मानून तिच्या पाण्याला प्रसाद मानत शेती कसणारा माणूस अधिक क्रूर होत राक्षसी हव्यासाने नदीलादेखील दुःखी करत आहे. ही मांडणी नात्यांच्या संबंधाने अधिकच परिणामकारक होताना दिसते. उदा:

'नानीचे वाहणे /मौनातले रडू
दर घास कडू/ जीवा घोर'(नानीच्या काठावर /२५)
व
'कोरड्या नदीत, वाऱ्याचेच पाणी
दगडाची गाणी, खरी खोटी' ( दगडाची गाणी /३९)
आणि
'सरतात दिस मास तसे वर्षही अधांतरी
हुंदके देऊनी आतल्या आत रडते गोदावरी.'
(भग्न चिरेबंद/ १९).

जे कुटुंबात आणि नातेसंबंधात बदल घडतात त्याचेच प्रतिबिंब समाजजीवनातही उमटले आहे. गाव खेड्यातील सौहार्द संपत आहे. गावातील गट तट, खोट्या प्रतिष्ठा ही त्यामागची कारणे आहेत, त्यामुळे कधीकधी गावातील द्वैतदेखील उफाळून आलेले पाहावयास मिळते. एक वेळ दूर देशातला माणूस गावात सुखाने राहू शकेल; परंतु गावातल्या दोन बेटातील माणसे सुखाने राहतील याची खात्री नाही. गाव खेड्यातील आर्थिक परिस्थितीदेखील नाजूक झालेल्या आहेत. त्यामुळे जुन्या काळातील पाटीलकी आणि तत्सम वतनदारीचा वृथा अभिमान बाळगण्यात काहीच मतलब नसून आज उपजीविकेसाठी कोणतीही कामे कुणालाही करावी लागत आहेत हे देखील कवीने कवितेत नोंदवलेले आहे. एकेकाळचे माणसाचे अकृत्रिम रंग झडून गेले आहेत, आणि माणसे वेळोवेळी रंग बदलत देखल्या देवा दंडवत घालत आहेत . 'रंग झडुनिया गेले', 'अंदाज येत नाही', 'पालटतील हे पाणंद खुरीतील दिवस' या कविता या दृष्टीने महत्त्वाच्या आहेत.

दैनंदिन जीवनात पैसा हाच घटक महत्त्वाचा झाल्याने तो अधिकाधिक कमावण्याकडे माणसांचा कल वाढला. अनेकांनी त्यासाठी गैरमार्गांचाही अवलंब केला. भ्रष्टाचार हा तोच प्रकार जो पूर्वी एकूणच आचारासंबंधी असेल; पण गेल्या काही वर्षांपासून केवळ आर्थिक गैरव्यवहारालाच भ्रष्टाचार समजले जाऊ लागले आहे आणि त्याची झळ थेट गावपातळीवरही बसू लागलेली आहे. सामान्य माणूस त्यामुळे नाडला जाऊ लागला आहे. जिथे तिथे रांगा



अनुक्रमणिका

लावणे आणि विशिष्ट लोकांना विनाअडथळा मध्येच जाऊ देणे हे नित्याचेच झाले आहे. कवी लिहितो –

'छावणीत गुरांच्याही
मलिदा चाखतो कोणी
रांगेत उभे तिष्ठता
डोळ्यात वाहते पाणी' (जाग जरासा आता/१६).

किंवा

'चारा गुरांचा चोरांशी फंदफितुरी करताना
आपलेच हात कुणाच्या टाचेखाली गेले'
( खेड्यातल्या मंगलाचे /२९ ).

नजरेस येणाऱ्या प्रत्येक गोष्टीवर आपली मालकी असावी असे वाटणारा आणि येनकेन प्रकारांनी मालकी प्रस्थापित करणारा एक दांडगा वर्गही आपल्या जवळपासच असतो. त्यांची हाव ही कधीही पूर्ण होणारी नसते. त्यातून 'एक दिवस मातीचा वास हरवून जाईल' अशी भीतीही कवी व्यक्त करतो.

अडचणींच्या वेळी सामान्यांच्या आवाजाकडे लक्ष वेधले जायला हवे; पण तसे घडतेच असे नाही. त्यांचा आवाज पाखरांच्या आवाजासारखा हवेतच विरून जातो. इथे फक्त सफेद कपडेवाल्यांचा आवाज ऐकला जातो. कवीने यासाठी शेतीच्या नुकसानीची पाहणी करायला आलेल्या पथकाचे आणि भोरड्या पक्षांचे उदाहरण नोंदवले आहे. ते औचित्यपूर्ण आहे :

'काय माहित?
त्यांना चारापाण्याचा मांडावयाचा होता प्रश्न की
दिसला होता साप ते?
पथकही चाललंय निघून हळुवार
पांढऱ्या कपड्यावाल्यांच्या शेतात.' (पथक/३२).

ज्या यंत्रणांनी जी कामे करावयास हवी ती कामे त्या करतातच; परंतु जिथे काम व्हायला पाहिजे तिथे ते होते का? की त्यातही आम आणि खास असा भेदभाव होतो? आणि होत असेल तर ते समाजाच्या दृष्टीने समर्थनीय ठरणार नाही. पथक अगतिक भोरड्यासारख्यांचे म्हणणे न ऐकताच पांढऱ्या कपड्यावाल्यांच्या शेतात हळुवारपणे जाते आहे हे कवी कैलास दौंड यांचे निरीक्षण वेगळ्याच पैलूंवर प्रकाश टाकणारे ठरते.

जागतिकीकरण, उदारीकरण, खासगीकरण आणि बाजारीकरणाचा ग्रामवास्तवावर झालेला परिणाम भूमिपुत्रांची कुचंबणा करणारा आणि कंपन्यांना लाभ मिळवून देणारा ठरला आहे. अर्थातच कंपन्यांमध्येही स्पर्धा आहेच. कंपन्या, त्यांची नफेखोरी, सार्वजनिक यंत्रणेवर त्यांनी निर्माण केलेला दबाव याचा परिणाम म्हणून गावाशिवारांतील भौतिक साधने कंपन्या गिळंकृत करू पाहत आहेत. कवींच्या शब्दात हे कसे व्यक्त झाले ते पहा:

'कंपन्यांचं पीक पाणी असंच दरसाल साधलंय
हायवेच्या कडेलाच त्यांनी मचाण बांधलय.
आता सरकारसकट सारं त्यांचं होईल
वारा पाऊसही ते ठरवतील तिकडेच खुशाल वाहील.
शेतकऱ्याचा झोपा रिता रिताच राहील
काटेरी तोरणाखालून बैल निघून जाईल.
(तोरणाखालून /२२).

कालचे भाकरीचे निर्माते आज चाकरीच्या शोधात आहेत. बाजारीकरणाच्या व्यापकतेत नैसर्गिक वस्तूही कंपन्यांच्या नावाने विकल्या जाऊ लागल्या आहेत. ज्यांनी कधी गाईला स्पर्शही केला नसेल असे लोक दुधाचा धंदा करू लागलेले दिसतात. ही नव्या धोरणांची जादू आहे. कवीने लिहिलेय :

'रिॲलिटी शोमध्ये घुमतील थोर विराण्या
गुराचे शो पीस उरतील, दूध देतील कंपन्या.
( आशा /३३).

जुन्या जाणत्या लोकांना कोण जळतोय आणि त्याचा उजेड कोणाला मिळतोय तेच समजेनासे झाले आहे. हे काहीही असले तरी जागतिकीकरण रोखता येईल का? याचे उत्तर 'नाही' असेच आहे. असा विचार करताना कवी दौंड लिहितात :

'वादळून रानमाती
उडे डोळ्यात फुफाटा
कितीवेळ कळपांना
बंद ठेवावा झोपाटा' ( झोपाटा /८२).

आजूबाजूची सगळीच रानमाती वादळून गेली आहे. तिचा फुफाटा डोळ्यात उडत आहे. या वादळात काही कळप आत यायला आतुर असल्याने परंपरागत 'झोपाटा' (GATE) फार काळ बंद ठेवता येणार नाही हे कवी जाणून आहे.

माणसांच्या वाट्याला आलेले आपल्याच घरातील उपरेपण हे घरात जंगलाचे भास व्हायला पुरेसे ठरते.

नवऱ्याच्या पाठीमागे आयुष्य रेटणाऱ्या एका आजीचे मनोगत 'आस बाळगणारी म्हातारी' कवितेत खूपच प्रत्ययकारी झाले आहे. प्रत्येकाला ही कविता आपल्याच जवळ कुठेतरी घडते आहे असे वाटेल.

'आपलं माणूस असतं तेव्हा
मुळापानासकट झाडं आपलं असतं
तेच जेव्हा निघून जातं
सारं जग अनोळखी जंगल भासतं.
भोवतीची सारी आपलीच पण मेळ जुळत नाही
म्हाताऱ्याशिवाय हातचा घास गिळत नाही.'
(आस बाळगणारी म्हातारी /३१)

या कवितेसोबतच 'जाग जरासा आता', 'निंदताना ओल थोडी', 'असे उजाडले रान', 'आशावाद' या कवितांतून उत्कट आशावाददेखील व्यक्त होतो. एकूणच 'सल आणि ओल ' या भागातील कविता जागतिकरणाच्या परिणामांना भिडत मार्गक्रमण करणारी 'संभ्रमांच्या वाटांना' सहजच तुडवत जाणारी आहे.

'नदीकाठ' हा 'आगंतुकाची स्वगते' या कवितासंग्रहातील कवितांचा दुसरा छोटा विभाग. यात सतरा कवितांचा समावेश आहे. आजच्या गतिमान काळातही चिरंतन मूल्यांतून आणि विचारांतून मिळणारी ऊर्जा अधोरेखित करणाऱ्या कविता इथे पाहावयास मिळतात. आपल्या शब्दातून माणसांसहित शिवाराला बळ मिळावे ही कवींची अत्यंत प्रामाणिक इच्छादेखील इथे व्यक्त झालेली आहे.

'माझ्या शब्दात मिसळो
परिमळ मृत्तिकेचा
त्याच्या चाहुलीने जागो
जीव कोवळ्या कोंभाचा.' ( माझ्या शब्दास /४५)

'दिवे लागता दिवाळीचे', 'माय मराठी बोलता' या कवितांतून व्यक्त होणारी भावनाही अशीच आहे. महाराष्ट्राला लाभलेला वैचारिक वारसा खूप मोठा आहे. त्या विचाराने काही पिढ्या घडलेल्या आहेत. या शाश्वत विचारांची पेरणी नव्या पिढीला दिशा आणि बळ देणारी ठरणार आहे. 'कर्मवीरा', 'महामानवा', 'गाडगेबाबा' या कविता मुळातूनच वाचल्या पाहिजेत. तोच आधार घेऊन कवी विश्वातील माणसांना प्रेम धाग्याने बांधण्याचे आणि उजेड होत अंधाराला छेदण्याचे स्वप्न पाहतो. तो

गेल्या काही वर्षांपासून आंदोलने आणि मोर्चे
यांच्या माध्यमांतून समाज जागृत झाल्याचे
दिसते. तरीही ही प्रगती की गतानुगतिकता ?
हा प्रश्न समोर येतोच. त्यातील वास्तव काय
आहे हे दडून राहिलेले नाही. शिक्षणाने
भेदभावविरहित समाज निर्माण होणे अपेक्षित
होते. प्रत्यक्षात मात्र जात जाणिवा तीव्र होताना
दिसतात. पुढील ओळी त्या दृष्टीने लक्षवेधी
आहेत. पुढील ओळी पहा:-

'माणसं माणसात शोधत नाहीत माणूस
ते माणसात शोधत आहेत जात
शतकापूर्वी अर्धमेल्या झालेल्या घोड्याला
पाणी पाजून मोजत आहेत त्याचे दात
हे मोर्चे सर्वच दिशातून येत आहेत
गटातटांच्या, कटांच्या घोषणा देत आहेत
जग फिरून झाल्याचा आव आणत
पुन्हा पुन्हा गुहेत शिरत आहेत.'

सामाजिक दुःखांना व्यक्तिगत आणि व्यक्तिगत दुःखाला सामूहिक पातळीवर नेण्याची किमया सहजपणे साधत असल्याचे अनुभवावयास मिळते. उदा :

'आज माझीच वेदना
झाली गावाहूनी मोठी
तिच्यामध्ये मिसळली
दुःखितांची बीजे कोटी' ( आज/५३).

व्यक्तिगत पातळीवरील भावना व्यक्त करणाऱ्या 'आज' , 'मोकळे होतसे गाणे', 'तुझ्या आठवांच्या', 'शोधतो मी', 'रंगाने रंगाला पुसले', 'सुख इथे सुख तिथे', 'मला गूढ वाटे', 'मंदावले दिवे', 'कोणत्या मातीत' अशा काही कविता या विभागात वाचायला मिळतात. उन्हातान्हात हिंडताना सहजच नदीकाठावर पोहोचावे आणि तिथे काहीशी हिरवळ अनुभवी असा कवितांचा विलोभनीय हा विभाग आहे.

'दिस-मास' हा 'आगंतुकाची स्वगते' मधील कवितांचा तिसरा आणि अखेरचा विभाग. तब्बल पस्तीस पृष्ठांचा आणि आशयसंपन्न भावस्पर्शी प्रत्ययकारी अठ्ठावीस कवितांचा. या कवितांमध्ये जागतिकीकरणाला












सामोरे गेलेल्या ग्रामजीवनाची घुसमट व्यक्त होते. माणसाच्या वाट्याला आलेल्या 'तुटलेपणात' गत ग्रामानुभवाच्या अस्वस्थ करणाऱ्या आठवणींचे ओझे त्याला अधिक व्याकूळ करते. खासगीकरणाच्या नावाखाली चाललेले उजाडीकरण चिता वाढवणारे आहे.

'आताशा उरले नाहीत पूर्वीच्या
ओल्या स्मृतीसारखे हिरवे डोंगर
स्वार्थाच्या हव्याशी रणगाड्यांनी
कालच नांगर टाकलेत डोंगरावर'( डोंगरावर/८६)

हे बदल एवढे वेगवान आणि अंगावर येणारे आहेत, की काही दिवसांनंतर गावी परतणाऱ्या माणसाला हा तोच गाव आहे का? असा प्रश्न पडावा अशी परिस्थिती आहे. जुन्या गावच्या आठवणी आजच्या गावाशी कुठेच जुळत नाहीत. पाहा :-

'मन तर एव्हाना फिरून आलेय रानोमाळ
अन् माझ्या मागे लागला आहे
बेचैनीचा आग्या जाळ!
बेसरमीची काठी घेऊन मारत सुटल्या आठवणी
ओरडताहेत त्या
'चल निघ...! हा गाव तुझा नाही '
( हा गाव तुझा नाही / ६१)

या बाजारात स्वतःची स्वतःला ओळख पटवता येणे मुश्किल, तिथे गावाशी कशी ओळख पटणार आणि ते बदललेले असल्याने जुन्याचा स्वीकार तरी कसा करणार? यातून निर्माण होणारा दुभंग मानसिक पातळीवरील असला तरी तो लवकरच आर्थिक, सामाजिक पातळीवर पोहोचणारा असतो याचे भान कवीला खचितच आहे. अशा वेळी शाश्वत शिकवण आणि मानवी जीवनमूल्ये मदतीला येतील असे कवीला वाटते, त्यामुळेच फाटलेल्या भोवतालाला कवी आजीच्या सुई-दोऱ्याने शिवू पाहतो. बाजारीकरणाच्या काळात आजीचा भावनाप्रधान व माणुसकीचा सुईदोरा कितपत कामी येतो कुणास ठाऊक? पण कवीच्या कानात अजून आजीचा आवाज घुमतो आहे. त्याची मूल्यनिष्ठा कायम आहे. माणसे निरपराध पक्ष्याच्या जगण्याला स्वार्थापोटी नख लावतात; पण पक्षी कधीही माणसांच्या जगण्याला नख लावत नाहीत म्हणून पक्षीदेखील कवीला 'माणसापेक्षा थोर' वाटतात ते मूल्यनिष्टेमुळेच.

गेल्या काही वर्षांपासून आंदोलने आणि मोर्चे यांच्या माध्यमांतून समाज जागृत झाल्याचे दिसते. तरीही ही प्रगती की गतानुगतिकता ? हा प्रश्न समोर येतोच. त्यातील वास्तव काय आहे हे दडून राहिलेले नाही. शिक्षणाने भेदभावविरहित समाज निर्माण होणे अपेक्षित होते. प्रत्यक्षात मात्र जात जाणिवा तीव्र होताना दिसतात. पुढील ओळी त्या दृष्टीने लक्षवेधी आहेत. पुढील ओळी पहा:-

'माणसं माणसात शोधत नाहीत माणूस
ते माणसात शोधत आहेत जात
शतकापूर्वी अर्धमेल्या झालेल्या घोड्याला
पाणी पाजून मोजत आहेत त्याचे दात
हे मोर्चे सर्वच दिशातून येत आहेत
गटातटांच्या, कटांच्या घोषणा देत आहेत
जग फिरून झाल्याचा आव आणत
पुन्हा पुन्हा गुहेत शिरत आहेत.'
(हे मोर्चे नाहीत /६८).

कित्येक पिढ्या गमावल्यावर बुद्ध, फुले आणि आंबेडकर यांच्या विचारांनी जागा झालेला समाज वैचारिक भूमिकेने पुढे जाऊ इच्छित आहे. अशा वेळी वैयक्तिक स्वार्थ आडवा येऊ शकतो.

'सूर्यफुलेही निघालीत मतलबी/ जिकडून मिळेल पाणी तिकडे/ खुशाल माना फिरवत आहेत (मतलबी/७६).'

असे निरीक्षण कवी नोंदवतो ते वास्तवाला धरूनच. शेतीधारित गावातील ग्रामवास्तव कमालीचे विरोधाभासी आहे. इथला माणूस स्वतः शेती कसत असला तरी प्रत्यक्षात रेशनिंगचे गहू खात आहे. कोवळ्या रोपट्याला वाळवीचा शाप लागावा असा जळिताचा कोप इथल्या जिवांना छळत आहे. अशा वेळी रस्त्याकडेची वठत चाललेली बाभूळ चारदोन हिरवी पानं 'जपून असली तरी :

'कुणावर ठेवावा भरवसा
बुजगावण्यावर की पाखरांवर?
कुणाकडून बाळगावी खात्री
जे खाणारच नाहीत कणसांना!'( भरवसा/८४).

हा प्रश्न पडल्याशिवाय राहत नाही. मग कष्ट करणे आणि जीवन कंठणे एवढेच हाती उरते. खरेतर ती इथल्या माणसांची अंतस्थ प्रेरणाच आहे. तरीही भूमिपुत्र कमालीची अस्वस्थता भोगतो आहे. स्वभावोक्ती

अलंकाराचे सुंदर उदाहरण म्हणून 'युगाच्या अस्वस्थतेला' ही कविता समोर येते, तर एक शेतकरी शेतीचे काम बुडू नये म्हणून त्याला आजारपणात दवाखान्यात थांबण्याची गरज असतानाही तिथून गुपचूप निघून शेतात दाखल होतो. (दवाखान्यातून/७५) कवीने त्याच्या निर्मितीच्या क्षणांनादेखील एखाद दुसऱ्या कवितेतून आविष्कृत केलेले दिसते. उदा :

'आपल्याच दुःखाशी
आपलीच सलगी
आपलेच चामडे
आपलीच हलगी' (आपलीच /९४).

'आगंतुकाची स्वगते' मधील कवितेतून जागतिकीकरणाच्या संदर्भात माणसांचा आणि माणूसपणाचा शोध सतत सुरूच राहतो हे विशेष आहे. हे सगळे स्वाभाविकपणेच. साहित्य हे काळाचे अपत्य असते असे जे म्हटले जाते त्याचा प्रत्यय कैलास दौंड यांच्या कवितेतून येतो. आजच्या वास्तवाला भिडणाऱ्या या संग्रहातील अखेरच्या कवितेतील पुढील ओळी पहा:

'गर्दीत पायाजवळ जरी पडलं, हवं असलेलं आकाश
कुणालाच त्याचा पत्ता लागणार नाही,
वाढत चाललेय द्रुत लयीत कोलाहलाचे तांडव
गर्दीत कुठंच कस कुणी माणूस दिसत नाही.
(वाढत चाललाय कोलाहल /९५)'

कवी कैलास दौंड यांची 'आगंतुकाची स्वगते' मधील कविता प्रभावी आणि प्रत्ययकारी आहे. तिला स्वतःची पक्की ओळख आहे. शिवाय महत्त्वाचे म्हणजे ती कपूगिरीपासून मुक्त आहे. डॉ. नागनाथ कोत्तापल्ले यांनी म्हटल्याप्रमाणे मूल्यनिष्ठा हे तिचे बळ आहे. शब्दकळेच्या दृष्टीनेही ती लक्षणीय आहे. मुक्तछंद आणि छद या दोहोंच्या सामर्थ्याचा मेळ असणारी, आजच्या काळाला भिडणारी आणि वाचकांच्या मनाचा ठाव घेणारी ही कविता आहे. समकालीन मराठी कवितेतली ही महत्त्वाची कविता आहे.

**प्रा. डॉ. सुभाष निवृत्ती शेकडे**
मराठी विभाग प्रमुख, बाबुजी आव्हाड महाविद्यालय,
जि. अहमदनगर, पाथर्डी-४१४१०२
चलभाष : ९४२३१६४७६३







# व्यापक जीवनानुभूतींचे तळ ढवळणारे अधांतरीचे प्रश्न

डॉ. अरुण ठोके

अर्चना डावखर यांच्या अधांतरीचे प्रश्न या काव्यसंग्रहाची सौंदर्यस्थळे विशद करणारा समीक्षा लेख.

'अधांतरीचे प्रश्न' हा अर्चना डावखर यांचा काव्यसंग्रह आहे. अक्षरवाङ्मय प्रकाशन संस्थेने मे २०१९ मध्ये तो प्रकाशित केलेला आहे. सरदार जाधव यांनी रेखाटलेले समर्पक मुखपृष्ठ, डॉ. एकनाथ पगार यांची प्रस्तावना व डॉ. शिरीष लांडगे यांची 'पाठराखण' या काव्यसंग्रहातील कवितांचे वेगळेपण निर्देशित करते. बाईपणाचे कूळ उगवून वाढविणाऱ्या आज्या व आईला हा संग्रह अर्पण करण्यात आलेला आहे. अक्षरवैदर्भी, अक्षरपेरणी, अक्षरगणगोत, स्त्रीभान, पृथा, मैफल व चपराक आदी नियतकालिकांतून या कवितांना यापूर्वी प्रसिद्धी मिळालेली आहे. सुमारे ६९ कवितांच्या संग्रहाची बांधणी उत्तम करण्यात आलेली आहे. प्रारंभीच्या अकरा कविता लयबद्ध असून बहुतांश अष्टाक्षरी छंदात आहेत. त्यातून वैयक्तिक दुःखानुभूती समवेत स्त्रीशोषणाच्या सार्वत्रिक तऱ्हांचे चित्रण करण्यात आलेले आहे. अर्चना डावखर यांना मुक्तछंदातील कवितांतून अधिक नेटका सूर गवसल्याचे जाणवते. जात व लिंगभावाचे नेटके आकलन झाल्याने या कविता चिंतनाच्या पातळीवर पोहोचतात. स्त्री-पुरुष, पती, पत्नी, समाज, नातेसंबंध, विधवा, वेश्या व्यवसायातील मुली, प्रेम, परंपरेविरुद्धची बंडखोरी (पतीचा विरह), शारीरिक, मानसिक छळ आदी अनेक विषयांना या कवितांतून स्पर्श करण्यात आलेला आहे. या सर्व कवितांतील चिंतनाच्या केंद्रस्थानी बाई येते. मुलीला आलेले बाईपण, त्याचा झालेला गौरव, विधवा झाल्यावर झालेला अनादर व त्यामुळे वाट्याला आलेल्या दुःखातील तुटलेपण आणि पुन्हा नवी उभारी अशा अधांतरी स्त्री-जीवनाच्या अनेक छटा असलेले प्रश्न वाचकांसमोर ही कविता उभे करते. या प्रश्नांचा सामना करताना कवितेतील मी ने घेतलेला आत्मशोध, त्यासाठी मानवेतर वस्तूंशी केलेले तादात्मिकरण अनोखे आहे. या काव्यसंग्रहातील कवितांच्या विशेषांची नोंद आता घेऊ.

**विसंगती:**

पुरुषप्रधान व्यवस्थेने स्त्रीसाठी सांगितलेल्या सामाजिक रूढी-परंपरांचे अनुकरण बाई करीत असते. व्यवस्थेतील विसंगतींवर ठपका या कवितेत नेटके बोट ठेवलेले आहे. विवाहित स्त्री पतीच्या नावाने कुंकू लावते, अपत्याला जन्म देऊन पुरुषाचे(पतीचे) कूळ मोठे करणे, गर्भारपणातील सर्व वेदना सोसून प्रपंचाला हातभार लावणे हे सर्व ती करीत राहाते. स्त्री खूप साऱ्या जोखमींच्या जबाबदाऱ्या पार पाडते मात्र पुरुषच स्त्रीवर हक्क गाजवतात. पतीचा त्रास सहन करूनही स्वतःच्या मर्जीने तिला माहेरी जाता येत नाही. त्यासाठी परवानगीही नाकारली जाते. पतीने जाच करून, दुःख देऊनही त्याच्याविषयी पत्नीने कळवळा ठेवायचा. त्याच्याकडून












स्नेहाची, प्रेमाची वागणूक मिळो न मिळो अशा जाचासहित त्याच्या संगतीतील जीवन भागधेय मानावे. असे मानणाऱ्या स्त्रीलाच तो सोडून गेला, तर तिची झालेली कोंडी नव्या दुःखाला जन्म देते. आजू-बाजूच्या स्त्रिया पीडितेलाच अभागी मानतात. अशा वेळी तिच्यासमोर निर्माण झालेले प्रश्न सोडविणे तिला जिकिरीचे होते. किंवहुना स्त्री शिक्षण घेऊन नोकरी करून स्वावलंबी जीवन जगत असली तरी रूढीने ठरवून दिलेले बाईपण तिने जपलेच पाहिजे, असा आग्रह समाज धरत असतो. हा बाईपणाचा ठपकाच स्त्रीच्या व्यक्तित्वाच्या विकासाला, जीवनातील आनंदानुभूतींना मारक ठरतो. पुरुषप्रधान व्यवस्था या विसंगतीला खतपाणी घालते. याचे मार्मिक चित्रण प्रस्तुत कवितेतून करण्यात आलेले आहे.

**स्त्रीविशिष्ट जीवनानुभवांचे दर्शन:** अर्चना डावखर यांच्या कवितेतील आशय स्त्री जीवनाच्या अनेक बारीक-सारीक कंगोऱ्यांनी व्यापलेला आहे. विशेषतः एकाकी पडलेल्या विवाहित स्त्रीच्या मनात असलेली भीती, रूढींचा दाब, भोवतालच्या लोकांचे तऱ्हेवाईक वागणे व पतीकडून मिळालेली वाईट वागणूक, त्यात तिचे कोलमडणे व पुन्हा स्वयंस्फूर्तीने सावरणे अशा अनेक महत्त्वपूर्ण घटितांना काव्यार्थ बहाल करण्यात आलेला आहे.

अर्चना डावखर यांच्या कवितेत स्त्री विशिष्ट अनुभवांच्या तरल अनुभूती प्रत्ययाला येतात. स्त्रीच्या मनातील भावना-विचारांचा तळ ढवळून अर्थाची वलये पकडण्याचा प्रयत्न म्हणून, उसवला देह तू पण, या संहितेचे वाचन करता येते. उदाहरणार्थ,

सुटलेले शरीर नवऱ्याला
दिसू नये म्हणून बायकांना
मिणमिणता प्रकाश हवासा असतो का?
का ती तिचे स्त्रीत्व सदैव जपत असते.
आपलेपणाच्या नात्याने तिच्यात येते
कोठून इतकी सहनशीलता?
ती तर पुरुषच जागी करतो
तिला ते उमजलेले असते
कदाचित म्हणून ती उलगडत जाते

सुटलेले शरीर या शब्दप्रयोगातून विवाहित स्त्रीच्या विशिष्ट वयोगटातील प्रश्नांकडे लक्ष वेधण्यात येते. पुरुषप्रधान व्यवस्थेने प्रस्थापित केलेल्या शरीर सौंदर्य कल्पनांच्या प्रभावातून निर्माण झालेल्या स्त्री-मानसिकतेला मिणमिणता प्रकाश का हवासा वाटतो याचे उत्तर त्यातून मिळते. स्त्रीच्या स्त्रीत्व सदैव जपण्याच्या वृत्तीतून तिच्यावर कष्टाच्या कामांचा, जबाबदाऱ्यांचाही भार पडतो. तिचे शरीर सुटण्यामागे अनेक कारणे असू शकतात. इतरांची देखभाल करताना तिचे स्वतःकडेच दुर्लक्ष होऊन जाते.

विवाहानंतर स्वतःकडे लक्ष न देता कुटुंबातील सर्व सदस्यांची देखभाल करणे, स्वयंपाक, भांडी, धुणी घरदार आवरणे यातच तिचे दिवस, महिने आणि कित्येक वर्षेही निघून जातात. घरातील सर्वांच्या आवडी-निवडी जोपासणे, सणवार, आदरातिथ्य करणे, भाजीपाला किराणा ते काही बाकी लागणाऱ्या वस्तूंच्या खरेदीसाठी त्यात लक्ष घालणे या सर्व कर्तव्यांत गुंतून गेलेली स्त्री गृहिणीधर्म जोपासत राहते. त्याचबरोबर पतीच्या तृष्णापूर्तीसाठी स्वतःला समर्पित करून देते. स्वत.साठी काही विशेष न करता सारी कर्तव्ये इतरांप्रति असलेल्या आपलेपणाच्या नात्याने पार पाडते. यासाठी असलेली सोशिकता स्त्रीकडे कुठून येते? या प्रश्नाचे उत्तर प्रस्तुत संहितेतून मिळते. स्त्रीच्या सहनशीलतेला पुरुषच जागी करतो. स्त्रीची सोशिक वृत्तीच तिला गौरव व मोठेपण प्राप्त करून देते, मानसन्मान मिळण्यास कारणीभूत ठरते. मात्र यासाठी स्त्रीने मोजलेली किंमत अमूल्य असते.

पती-पत्नीतील नात्याचा निराळा पैलू या कवितेत येतो. त्याने तिच्यावर प्रेम करून तिच्या समवेत विवाह केला; परंतु पतीच्या प्रेमातील उणिवांविषयी, त्याच्या संवेदनहीनतेविषयी व बदफैलीपणाची तिला जाणीव होऊनही ती त्याला थेट प्रश्न विचारत नाही कारण त्यामुळे निर्माण होणारा कौटुंबिक कलह, दुःख तिला नकोसे वाटते. पत्नीला समजून घेण्यासाठीची प्रगल्भता पतीमध्ये नाही. त्याच्या अर्धवटपणामुळे तिच्या वाट्याला आलेल्या दुःखद अनुभवांचा प्रत्यय 'अधांतर' या कवितेतून येते. नोकरी करणाऱ्या सहकाऱ्याने तिला खुशाली विचारण्यासाठी फोन करणे तिच्या पतीला खटकते. एवढ्यावरून तिच्यावर संशय घेऊन तिला अद्वातद्वा बोलतो. घराचा उकिरडा वाटावा इतपत घरातील










सामानाची फेक झोक करतो. त्याने वापरलेले कठोर शब्द तिच्या हृदयात बाणांसारखे रुततात. या पश्चात्तापात ती होरपळते. पतीने तिला रांड म्हणणे तिला जिव्हारी लागते.

मात्र तो जिवंत असताना त्याने असा त्रास देऊनही नवरारूपी नात्याचे आपल्याभोवती सुरक्षिततेचे कवच होते; म्हणून सुरक्षित वाटायचे. पती नसलेल्या स्त्रीला समाजातील पुरुष संधिसाधू गिधाडासारखे वाटतात, ते कातडी ओरबाडायला टपून असतात असा अनुभव येतो. अशा प्रसंगी रडण्याऐवजी जीवनाची लढाई पुढे नेण्यासाठी ती प्रत्येक पाऊल तोलून-मापून टाकते.

समकाळातही समाजाकडून स्त्रीचे स्वतंत्र अस्तित्व मोकळेपणाने स्वीकारले जात नाही. नवरा नसलेली स्त्री ज्या पद्धतीने सामाजिक अनुभवांचा सामना करते त्यावरून पुरुषी दृष्टिकोन समजतो. समाजात प्रचलित चुकीच्या लैंगिक धारणांचा वाढता प्रभाव, स्त्रीला एक उपभोग्य व कुणाच्या तरी मालकीची वस्तू समजण्याच्या मानसिकतेचा प्रत्यय येतो. यामुळेच तिला जीवन अधांतरी वाटू लागते. या अधांतरी वाटण्याच्या अवस्थेतूनच ती भोवतालाकडे पाहते.

वैधव्याचा अनुभव हा रोजच्या मरणासारखा असतो अशा प्रकारचे आशयसूत्र 'शिवलेली बाई' या कवितेत प्रत्ययाला येते. उदाहरणार्थ ती म्हणते,

नवरा मेलेल्या बाईला
ना झाडाखाली पडलेली फुलं दिसतात
ना त्यांचा गंध येतो
दिसतात फक्त प्रश्न भाकरीचे, शाळेचे,
जगण्याचे, एकटेपणाचे
दिवसभर काम करून यावे
अन्
दोन घास गिळून दोन्ही कुशीत
चिमण्यांना घेऊन निजावं
मग कुठली स्वप्न, कुठल्या आठवणी.

तिला वाटणारे एकटेपण व भौतिक प्रश्न सोडविण्यासाठीचा संघर्ष हा नवा अनुभव असतो. किंबहुना नवरा मेल्याची जाणीव सतत करून दिली जात असल्याने हे एकाकीपण अधिक टोकदारपणे बोचू लागते. समाजात तिला विधवा झाल्याची आठवण पुन्हा-पुन्हा करून देण्यात येते. त्याच्या अचानक जाण्याने ती तुटून जाते. छोट्या छोट्या घटना, गोष्टींतून मिळणारा आनंद, संवेदनाभूतींचा प्रत्यय कमी होत जाणे व व्यावहारिक प्रश्नांनी तिला वेढणे सुरू होते. दिवसभर काबाडकष्ट करून थकल्या जीवाला झोप लागते. प्रपंचासाठी लागणाऱ्या खर्चाची तरतूद कशी करायची ही भ्रांत असल्याने कोणत्याही मुग्धी आठवणी येत नाहीत, की तशी स्वप्नेही पडत नाहीत. शरीर व मन शिवून ठेवलेली बाई अंथरुणावर झोपलेली असते. मनाला व शरीराला शिवून ठेवणे ही नवी प्रतिमा येथे योजण्यात आलेली आहे. शिवणे ही खास स्त्रीशी संबंधित बाब आहे. सुई-दोरा घेऊन घरातील माणसांसाठी उबदार वाकळ(गोधडी) शिवणे असो की, वापरत्या कपड्यांना टाके घालणे असो, या बाबी शिवणे म्हणजे जोडण्याशी संबंधित आहेत. गोधडी तर टाकाऊ कपड्यांपासून बनवली जाते. कित्येक वर्षे ती टिकते. शिवण्याच्या क्रियेत जुळणीला विलक्षण महत्त्व असते. शिवणाऱ्या व्यक्तीच्या हातोटीवर ही जुळणी व शिलाईचे सौंदर्य व टिकाऊपणा अवलंबून असतो. कवितेत मात्र शरीर व मनाला शिवून ठेवण्याची कल्पना येते. यातून असे

**अर्चना डावखर यांच्या कवितेतील आशय स्त्री जीवनाच्या अनेक बारीक-सारीक कंगोऱ्यांनी व्यापलेला आहे. विशेषतः एकाकी पडलेल्या विवाहित स्त्रीच्या मनात असलेली भीती, रूढींचा दाब, भोवतालच्या लोकांचे तऱ्हेवाईक वागणे व पतीकडून मिळालेली वाईट वागणूक, त्यात तिचे कोलमडणे व पुन्हा स्वयंस्फूर्तीने सावरणे अशा अनेक महत्त्वपूर्ण घटितांना काव्यार्थ बहाल करण्यात आलेला आहे.**

**अर्चना डावखर यांच्या कवितेत स्त्री विशिष्ट अनुभवांच्या तरल अनुभूती प्रत्ययाला येतात. स्त्रीच्या मनातील भावना-विचारांचा तळ ढवळून अर्थाची वलये पकडण्याचा प्रयत्न म्हणून, उसवला देह तू पण, या संहितेचे वाचन करता येते.**

सूचित करण्यात येते की, विधवा स्त्री आपल्या शरीर-मनावर, विकारांवर ताबा मिळवते. यासाठी तिला पुरुषांप्रमाणे पहाडात जाऊन विकारांवर विजय मिळवण्यासाठी साधना, तपश्चर्या करावी लागत नाही. स्त्री म्हणून जगलेल्या अनुभवातून, शिवण्याच्या कृतीतून ती आपल्या शरीर-मनालाही सहज संयमाच्या धाग्याने शिवून अंथरुणावर झोपून जाते. हा एक व्यापक अर्थ स्त्री व पुरुषातील भेददर्शक प्रत्यय म्हणून येतो, तर दुसरा अर्थ शरीर शिवून ठेवण्याची क्रिया मानवी प्रेताची आठवण करून देणारी आहे. कवितेत प्रेत नाही, जिवंत बाई आहे; परंतु शरीर शिवून ठेवलेली. तिच्या शरीराला कोणी शिवलेय? भोवतालच्या समाजाकडून सातत्याने तिचा नवरा मेला असल्याची जाणीव तिला करून देण्यात येते. पतीच्या नसण्याच्या भावनेचा जबरदस्त परिणाम हेतुपूर्वकरीत्या तिच्यावर करण्यात आल्याने तिला तिचे शरीर शिवून ठेवल्याचा प्रत्यय येतो. जसे एखादे प्रेत निपचित पडलेले असावे तशी ती निपचित अंथरुणावर निजलेली असते. प्रस्तुत कवितेतील वैधव्याचा अनुभव रोजच्या मरणासारखा असतो, या आशयसूत्राची सार्थकता यातून पुरेपूर प्रत्ययाला येते.

'निरोप' या कवितेत पतीच्या मृत्यूनंतर द्यावयाच्या शेवटच्या निरोपाच्या घटिताला शब्दांकित करण्यात आले आहे. एखाद्या स्त्रीचा पती वारल्यावर तिच्या शरीर-मनावरून तिचे नियंत्रण सुटते. झालेल्या मानसिक आघाताने ती शून्यात निघून जाते. हा फक्त पती वारलेल्या स्त्रीलाच येणारा स्त्रीविशिष्ट अनुभव या कवितेत अतिशय तरलपणे मांडण्यात आलेला आहे. एका स्त्रीला धीर देऊन तिला समजून घेणे या प्रसंगी अतिशय महत्त्वाचे ठरते; परंतु अपवादात्मक स्थितीतच एखाद्या विधवेच्या वाट्याला असे समजून घेणारे कुटुंब येते. कवितेतील स्त्रीला मात्र अंत्यसंस्काराच्या गर्दीत कुणीही सावरणारे नव्हते. ती तापाने फणफणत असते. अशा वेळी पडलेले स्वप्न ती कथन करते.

तू विचारत होता काय झाले?
उठून बघते तर पसरलेला होता काळोख
पांढऱ्या शुभ्र घोड्यावरून तुझं येणं
अन् मला त्यावर बसवून वाऱ्यासारखं
वेगाने पांथस्थ होणं.
का माहेरपणाची,
पाठराखण करायची होते तुला?
आता इथं तुझं कुणीच नाही
म्हणून,
का शेवटचा निरोप घ्यायला
आला होतास?

जिवंतपणी पतीकडून न मिळालेल्या सहानुभूतीच्या, प्रेमाच्या व समजूतदारपणाच्या वर्तनाची इच्छापूर्ती या स्वप्नातून पूर्ण करण्यात येते. अर्चना डावखर यांच्या काव्याभिव्यक्तीचे खास वैशिष्ट्य म्हणजे त्यांच्या कवितेतील संवादी शैली होय. प्रस्तुत संहितेत कवितेतील 'मी' तिच्या पतीशी संवादी आहे. त्याचप्रमाणे वाचकांशी, विविध वस्तूंशीही ती सहज संवाद साधते. यावरून संवेदनक्षम कविमनाच्या हळवेपणाचा प्रत्यय येतो. अशाच प्रकारे 'प्रश्न' या कवितेत पतीच्या निधनानंतर त्याच्याशी संवाद केलेला आहे. जिवंतपणी नवरा धड वागला नाही ही सल आणि त्याच्या निधनानंतर आजूबाजूच्या बायकांनी आपल्याला समजून घेतले नाही, एकीकडे घर चालविण्यासाठीचा संघर्ष व दुसरीकडून कुत्सित वृत्तीचा सामना करावा लागणे हा दुहेरी संघर्ष आपण बाई असल्यामुळेच आपल्या वाट्याला आला ही अनुभूती अधिक तीव्रपणे व्यक्त करण्यात येते. साधेपणाने जीवन जगण्याची शैली अंगीकारल्याचे संदर्भ कवितेत येतात. मुलींकडे बघून स्वत.ला संपविण्याची ऊर्मी बाजूला सारून आपण घराची मेढ झाल्याचे सांगण्यात येते. समाजात वावरताना तिला आलेला अनुभव ती या शब्दांत सांगते,

एकटीला चालतांना बघितले की,
करतात नवऱ्याच्या बायका तोंडाची चुंभळ
आणि घेतात तोंडसुख
मग, पायदळी तुडवीत जाते कितीतरी प्रश्न
बाईपणाचे.
कुठल्याही बाईचं जगणं वाटतं तितकं
सोपं नसलं तरी

कवितेत वैधव्यातून आलेल्या सामाजिक अनुभवांची उत्कट अनुभूती मांडताना हलके फुलके संदर्भ येतात, तर कधी छोट्या-छोट्या घटितांच्या मांडणीतून समाजमनाचे दर्शन घडते. यातून सामाजिक मानसिकतेच्या वेगवेगळ्या स्तरांचा प्रत्यय येतो. आधुनिक, उत्तर आधुनिक अवस्था



अनुक्रमणिका

मानल्या जात असलेल्या समाजातही स्त्रियाच स्त्रीच्या एकटेपणाकडे सहानुभूतीने पाहत नाहीत. किंबहुना आधार देण्याऐवजी टोचणी लावतात. काही माणसे मात्र सहानुभूती दाखवितात तेव्हा ही सहानुभूती उन्हात चालताना ती सावलीसारखी ठरते. ती क्षणमात्रच असते.

'अनपेक्षित ठेचा' या कवितेत मृत झालेल्या पतीशी संवाद करण्यात आलेला आहे. त्याचे आजूबाजू असण्याचे भास तिला होत राहतात; परंतु तो नाहीये, या जाणिवेतून घनदाट अरण्यात सगळीकडे अंधारच पसरल्याची अनुभूती असुरक्षितता व दु:खाचा प्रत्यय देते. वादळात कोलमडून पडलेल्या झाडाप्रमाणे आपली अवस्था झाली असल्याचे ती सांगते.

उन्मळलेल्या झाडाबरोबर जसे स्व चे तादात्मिकरण करून घेण्यात आलेले आहे. तसेच घराच्या मुक्त भिंतींशीही स्वचे तादात्मिकरण करून घेतलेले आहे. घराच्या मुक्या भिंतींनी आपल्याशी बोलावे हे कल्पित घटित 'भिंती बोलत नाहीत' या कवितेत येते. घर हे स्त्रीसाठी सुरक्षिततेचे प्रतीक म्हणून येते. या कवितेतील मी ला घराच्या भिंती आपलेपण दर्शविणाऱ्या वाटतात. त्याकडे बघून सुरक्षित वाटते. घरातील भिंतीविषयीचे हे वर्णन पहा,

घराला भिंती आहेत
भिंतीवर मोठमोठ्या तसबिरी आहेत
टिपॉयवर फ्लॉवरपॉटही आहे
फुलांनी भरलेला,
अन् त्याचा गंध पसरलाय घरभर
भिंतीवर टोल देणारे मोठे
घड्याळही आहे.
पण घराच्या भिंती बोलतच नाहीत

दृश्यात्मकता हा शैलीविशेष येथे प्रत्ययाला येतो. घराचे दृश्य, घरातील भिंती, भिंतीवरील मोठ्या तसबिरी, टिपॉय, त्यावरील फ्लॉवरपॉट, फ्लॉवरपॉटमधील फुले, त्यांचे भरलेपण, घरभर पसरलेला गंध, पुन्हा भिंतीवरील मोठे टोल देणारे घड्याळ आणि शेवटी भिंती बोलतच नसल्याची तक्रार असे संदर्भ या दृश्यातून येतात. वैधव्याने आलेली उदासीनता संवेदनशीलता कमी करणारी तर ठरणार नाही ना? अशी भीतीही सूचकतेने व्यक्त होते. शेवटी कधीतरी आपले मन पुन्हा पूर्ववत आनंदी होईल का? स्वतःच्या भिंतीच्या काळजात कधी मायेचे धुमारे फुटतील का? की त्या मितभाषी राहून मुकेपण पांघरतील? असे एक ना अनेक प्रश्न तिला सतावतात. प्रस्तुत प्रश्नांतून तिच्या संभ्रमित मनोवस्थेचे दर्शन घडते. अशा संभ्रमित मनोवस्थेतून आपल्या हातून बरेच काही सुटून गेल्याची जाणीव 'निसटलेले धागे' या कवितेत व्यक्त होते. तिच्या वाट्याला आलेल्या दु:खद जीवनानुभूतींचा आवेग उदासीनतेला जन्म देतो. त्यातून स्वतःच्या अस्तित्वाचा अन्वयार्थ लावण्याचा ती प्रयत्न करते. आपल्या अस्तित्वाला इतरांच्या नातेसंबंधांचे दुवे जोडलेले आहेत. सारे स्वार्थाने बरबटलेले होते हे वैधव्य आल्यावर लक्षात येते. हवीहवीशी वाटणारी नाती गुंडाळलेली लोकर उलगडावी तशी उलगडत गेली हे घटित आयुष्य उसवणारे ठरले. एक स्त्रीसाठी तिचे आयुष्य उसवणे म्हणजे तिच्या अस्तित्वाला बळ देणारा, अखंडित ठेवणारा आधारच फाटून गेला. यातून पती निधनाकडे लक्ष वेधण्यात येते. पती जिवंत असताना मऊ लोकरीसारखी उबदार वाटणारी नाती त्याच्या निधनानंतर दुरावतात. तिला सहानुभूती, सांत्वन वा मानसिक, भावनिक आधार देण्याऐवजी तिच्यापासून दूर जातात. हे एकाकीपण तिला वैफल्याकडे घेऊन जाते. या जगात आपले कुणीच नाही. या जीवनाला काही अर्थ नाही, यापेक्षा मृत्यू बरा; मनात अशा प्रकारच्या भावनांची भाऊगर्दी होते. यातूनच मृत्यूचे आकर्षण वाटते; परंतु कृती करणे शक्य नाही हे पाहिल्यावर तशाच प्रकारची आनंदानुभूती आईच्या गर्भाशयात परत जाण्याने प्राप्त होईल असा विचार डॉ. सिग्मंड फ्रॉइडच्या मनोविश्लेषणविषयक विवेचनात मांडण्यात आलेला आहे. आईच्या गर्भाशयात परत जाणे हे कदापि शक्य नसते. म्हणून अशी व्यक्ती मृत्यू प्रेरणेकडे वळते. त्यातून तिला अतीव सुख प्राप्ती होते असे फ्रॉइड म्हणतो. प्रस्तुत कवितेतही ज्या गर्भाशयातून आपण जन्म घेतला त्याच गर्भाशयात पुन्हा शांत झोपायला मिळेल का? असा भाबडा वाटणारा प्रश्न उपस्थित करण्यात येतो. भोवतालच्या वैतागाने तिचे मन अशांत झालेले असल्याने अशा अशांत व उदास मनोवृत्तीतून आलेला हा प्रश्न अधांतराचाच प्रश्न ठरतो. शेवटी आयुष्य तरी आपले आहे का? की त्यातही व्याधींचाच बाजार आहे? असा प्रखर आत्मटिकेचा उद्‌गार काढण्यात येतो.

स्त्रीची ओळख असलेली विशिष्ट शारीरिक ठेवणच तिच्या शोषणाला कारणीभूत ठरते. या निष्कर्षातून ओझे वाटणारे शरीराचे काही भागच काढून टाकावेत. अशा प्रकारची टोकाची भूमिका 'बाईपणाच्या खुणा' या कवितेतून घेण्यात आलेली आहे. शरीरात अवयव असल्यामुळे ती बाई असल्याचे इतरांना कळते. एरवी पती नसलेल्या बाईला पोटातल्या मिशा काढून / जगावं लागतंय तिला पुरुषावाणी असा वास्तव विचार मांडण्यात येतो. येथे पोटातल्या मिशा काढून जगणे ही नवी प्रतिमा घडविण्यात आलेली आहे. एरवी मिशा पुरुषांना येतात. त्या ओठांवर उगवतात. मिशी ठेवणे हे पौरुषत्वाचे लक्षण. मिशीला पीळ भरणे म्हणजे एक प्रकारचे शक्ती प्रदर्शन करणे. कवितेत बाईला आलेल्या मिशा पोटात उगवतात ज्या कुणालाही दिसत नाहीत. पोटात उगवणाऱ्या बाईलाच कळतात. म्हणजे येथे मिशा ही सामर्थ्याची खूण ठरते. बाईला आपल्या सामर्थ्याची, शक्तीची जाणीव झालेली असते मात्र पुरुषाप्रमाणे ती तिच्या सामर्थ्याचे, शक्तीचे प्रदर्शन करू शकत नाही. ती कोणत्याही संकटाचा सामना बिनदिक्कतपणे करू शकते. मात्र विशिष्ट सामाजिक-सांस्कृतिक पर्यावरणामुळे तिला या मिशा पोटातच काढून टाकाव्या लागतात. म्हणजे स्वसामर्थ्याचा विसर पाडून घ्यावा लागतो. पुरुषाप्रमाणे स्वशक्तीची जाणीव होऊनही बाईप्रमाणे कमजोर असल्याचे जगाला भासवत जगावे लागते यामुळे तिला बाईपणाच्या खुणाच काढून टाकाव्याशा वाटतात. कशासाठी? तर पुरुषांप्रमाणे विनधास्त जीवन जगण्यासाठी; परंतु असे होत नाही हेच वास्तव आहे. स्त्रीला स्त्रीत्व हे निसर्गाने बहाल केलेले आहे. हे मानवनिर्मित नाही. भोवतालच्या गढूळलेल्या सामाजिक पर्यावरणामुळे तिला ते त्याज्य वाटू लागते. हे स्त्री-पुरुष नात्यातील असमतोलाचे सर्वांत टोकदार भान डावखर यांच्या कवितेतून व्यक्त झालेले आहे.

एकटीनेच राहणाऱ्या विधवा स्त्रीच्या जीवनाला नियंत्रित करण्याचा प्रयत्न करणाऱ्या सामाजिक घटकांच्या किडलेल्या मनोवृत्तीचे चित्रण 'खिडकीतील फांदी' या कवितेत करण्यात आलेले आहे. लेकुरवाळी असलेल्या स्त्रीला तिच्या घराच्या खिडकीत दिसणाऱ्या पानाफुलांनी बहरलेली जास्वंदीची फांदीही लेकुरवाळीच वाटते. त्या दोघींना एकमेकींची सुख-दुःखे समजतात, असे वर्णन करण्यात आलेले आहे. या मुक्या जास्वंदीला विधवेचे दुःख समजते. मात्र आजूबाजूला राहणारी माणसे काय करतात ते पहा,

> ती बाहेर कधी पडते अन् कधी घरी येते.
> खिडकी कधी उघडते अन् कधी बंद होते.
> हॉलचे सरकणाऱ्या पडद्यापासून ते बेडरूमच्या
> लाईटपर्यंत असतात
> त्यांच्या नजरा तिच्या प्रत्येक हालचालीवर

आपल्याच घरात वावरताना आपल्यावर कुणीतरी सातत्याने नजर ठेवून असल्याचे विधवा स्त्रीच्या लक्षात आल्यावर तिला भावनिकदृष्ट्या या गोष्टींचा त्रास होत असणार. ती सद्वर्तनी असूनही तिच्याकडे अशा प्रकारे संशयाच्या नजरेने पाहणे तिला यातनादायी वाटत असणार. जर ती लेखक/ कवी असेल, तर तिची मुलाखत घेण्यासाठी कुणी वार्ताहर किंवा वृत्त वाहिनीचा पत्रकार तिच्या घरी आला असेल तरीही तिला नको त्या संशयाने प्रश्नांकित करून पाहणाऱ्या नजरा झेलणे मनस्ताप देणारे ठरते. अशा वेळी आजूबाजूच्या किडक्या मनोवृत्तीच्या माणसांपेक्षा खिडकीतील पानाफुलांनी बहरलेली जास्वंदीची फांदीच तिला जगण्या वागण्याच्या सच्च्या नोंदी पुराव्यानिशी देईल असा विश्वास व्यक्त करण्यात येतो. विधवा स्त्रीला जगणे नकोसे करून सोडणारी माणसेच आजूबाजूच्या समाजात बहुसंख्येने असतात. घराच्या निर्जीव भिंती, जास्वंदीचे झाड, घरात असलेल्या अनेक निर्जीव वस्तू या तिला माणसांपेक्षा प्रेमळ वाटतात. त्यांच्याकडून हिंसा होत नाही म्हणून अशा वस्तूंशी तादात्मिकरण करून घेऊन त्यांना आपल्या दुःखाचे सांगती करणेच विधवा स्त्रीला मदतगार ठरते. अशा स्त्रीविशिष्ट जीवन अनुभवांच्या काव्यात्म अनुभूतीचे वेगळेपण डावखर यांच्या कवितांतून ठसठशीतपणे प्रत्ययाला येते.

**स्त्रीत्वाचा गौरव:**

अर्चना डावखर यांच्या कवितांतून स्त्रीत्वाचा गौरव करण्यात आलेला आहे. गुंफलेल्या माळेतून या कवितेत एका विधवा स्त्रीने आपली वैधव्याची कात टाकून नव्याने अंगीकारलेल्या आधुनिक जीवन मार्गाचे सूचक चित्रण करण्यात आलेले आहे. जीवनात खूप साऱ्या ठोकरी खाल्यानंतर वाट्याला आलेल्या दुःखद अनुभवांतून ती सावरायला शिकली आहे. साऱ्या विश्वाला गोलाकार



अनुक्रमणिका

नजरेने ती बघायला शिकली आहे. म्हणजे स्वतःला वेगळे करून समाजाला हवे तसे जगण्याऐवजी आपल्या सदसद्विवेकबुद्धीला अनुसरून विचार, वर्तन, व्यवहार, करायला हवा हे तिला उमगलेय. ती आपल्या शिक्षण व विचारक्षमतेला अनुरूप वागणे, बोलणे, राहणीमान यात बदल करून स्वतःलाच बदलून घ्यायचे ठरवते. यासाठी तिच्या अंतर्मनातून आलेला आवाज तिने ऐकल्याने स्त्रीत्व हे ओझे न वाटता ते आनंदाने जगण्याची कला आहे, ही गोष्ट तिला अवगत होते. यासाठी ती कंबरेपर्यंत वाढलेले लांब केस कापून छानसा बॉयकट करून घेते. विवाहित स्त्रीने साडी नेसण्याची अपेक्षा केली जाते. त्या अपेक्षेनुसार वागण्याऐवजी तिला आवडणारा सलवार, कुडता, जीन्स, टॉप असा आधुनिक पेहराव ती सहजपणे करते. विशेषतः नटण्या-सवरण्यात वेळ घालवण्यापेक्षा ती पुस्तके वाचणे व आपले विचार मांडणे, वैद्रिक वाद-विवादांत भाग घेऊन वैचारिक विरोध करणाऱ्यांना प्रश्न विचारणे यांसारख्या मौलिक कृतींत भाग घेऊन आपल्या व्यक्तित्वाचा स्वतंत्र ठसा उमटवते. दखल नाकारणाऱ्या समाजालाच तिची दखल घ्यायला भाग पाडते. किंबहुना जेव्हा स्त्री प्रश्नांबाबत विचारवंत तिच्या समवेत चर्चा करतात तेव्हा तिच्या कर्तृत्वाला समाजमान्यता मिळते. एकेकाळी संशयाने पाहणारे लोकच तिच्याविषयी गौरवास्पद उद्गार काढू लागतात. हे सर्व करत असताना स्वतःच्या मुलींनाही उत्तम शिक्षण व संस्कार देऊन घडविल्याने तिच्याप्रति समाजात आदरभाव निर्माण होतो. अशा वेळी समाजात तिची ओळख अमुकची बायको म्हणून न होता तिच्या मुलींची आई म्हणून झालेली असते. हा प्रवास एका स्त्रीला कमजोर करण्याचा प्रयत्न करणाऱ्या समाजाला स्त्रीशक्तीची जाणीव होताच स्त्रीत्वाचा गौरव करायला भाग पाडणारा असल्याचा मौलिक आशय डावखर यांच्या कवितेचे वेगळेपण दर्शविणारा आहे.

'जगणं उलगडतांना' या कवितेतही अशाच सकारात्मक वृत्तीच्या लढाऊ व झुंजार स्त्रीचे चित्रण करण्यात आलेले आहे. दुःखाने होरपळल्यावर, नात्या-गोत्यातील माणसांनी चटके दिल्यावर ते सोसून अंगावर उडालेली निंदानालस्तीची धूळ झटकून निखळ आपले बाईपण उजळून काढणारी, फाटलेपण शिवून भरभक्कम करणारी, कवितेतील कणखर स्त्री विशेष भावते. दुःख व बाईविषयीच्या सामाजिक धारणा चुकीच्या ठरवून समाजाशी विनदिक्कतपणे लढत देण्याची इच्छाशक्तीच स्त्रीला वेगळे बनवते. असे असले तरी वास्तवाचे भान असल्याने बाईचे जगणे वाटते तितके सोपे नसते, हा विचार स्त्रीपुढील आव्हानांची जाणीव करून देतो. थोडक्यात अर्चना डावखर यांच्या कवितेत स्त्रीत्वाचा गौरव करण्यात आलेला असला तरी तिच्या समोर असलेल्या आव्हानांचे डोळस भानही व्यक्त झालेले आहे.

**समारोप:**

चिंतनशीलता, सामाजिक भान, वैचारिकता, पुरुषत्वाचे आकलन, शैली विशिष्टता, स्त्रीवादी चित्रण आदी विशेषांच्या अंगानेही या संग्रहातील कवितांचे विस्ताराने विश्लेषण करता येईल. या कविता आशय व अभिव्यक्तीदृष्ट्या संपन्न आहेत. अनोखी प्रतिमासृष्टी, संवादी शैली, चित्रणातील सूक्ष्मता यांसारख्या वैशिष्ट्यांमुळे या कवितेतील आवाज खास अर्चना डावखर यांचा असल्याचा प्रत्यय येतो. स्त्रीवादी सूर आळवताना कवितेच्या रूपबंधाविषयीची सजग जाणीव ठेवली, तर अधिक आश्वासक कविता यापुढेही त्यांच्या हातून लिहून होईल असा विश्वास वाटतो.

**संदर्भ:**

१) डावखर अर्चना, अधांतरीचे प्रश्न, अक्षरवाङ्मय प्रकाशन, पुणे, पृ. ३०
२)डावखर अर्चना,उ. नि. पृ.३५
३) तत्रैव पृ.८३
४)तत्रैव पृ.४७
५) तत्रैव पृ. ४०
६) तत्रैव पृ. ६३

**डॉ. अरुण ठोके**
चलभाष : ९६७५१६४७९९
arunthoke26@gmail.com








# मुलूखमाती

बाळासाहेब कांबळे

**लेखकाला भटकंती करताना भेटलेल्या भटक्या माणसांच्या अनाम कहाण्या सांगणाऱ्या 'मुलूखमाती' या पुस्तकाचा परिचय.**

मराठी साहित्यात व्यक्ती आणि वल्ली, माणदेशी माणसं, सीताराम एकनाथ अशा अनेक पुस्तकांमधून वेगवेगळ्या प्रदेशातील वेगवेगळ्या माणसांचे व्यक्तिचित्रण अभ्यासले गेले आहे. आजच्या घडीला महाराष्ट्राच्या मातीत विविध जाती-धर्मातील भिन्न भिन्न परिस्थितीत जगत असणाऱ्या आणि आपल्या गुणात्मकतेने जगणं समृद्ध करणाऱ्या माणसांच्या कहाण्या संपत मोरे यांनी 'मुलूखमाती'मधून साकारल्या आहेत. मुलूखमातीच्या निमित्ताने महाराष्ट्रातील विविध भागांत फिरताना भेटलेल्या साध्यासुध्या गरीब परंतु झुंजार माणसांची ही जिजीविषा आहे. कोल्हापूर जिल्ह्यातील एका खेड्यात केशकर्तनालय चालवून जगण्याची लढाई लढणाऱ्या शांताबाई यादव यांच्यापासून या पुस्तकाचा प्रवास सुरू होतो. पतीच्या निधनानंतर पुरुषप्रधान असणाऱ्या व्यवसायात नव्या उमेदीने उतरून आयुष्यभर केशकर्तनालय चालवून आगळी-वेगळी वाट चोखाळणाऱ्या शांताबाईंचा लढा पुरुष सत्तेच्या छायेखाली वावरणाऱ्या तमाम महिलांच्या मनात कर्तृत्वाचे बीज पेरणारा आहे. क्रांतिसिंह नाना पाटील यांच्या कन्या हौसाताई यांच्या इंग्रज सरकार विरोधातल्या रोमहर्षक प्रवासाची कहाणी 'क्रांतीविरांगना' हौसाक्कामधून वाचताना मांडवी नदीच्या खाडीतील त्यांची उडी, लहान बाळाला घरी ठेवून स्वातंत्र्यासाठी त्यांचा झालेला अनवाणी प्रवास वाचून त्यांच्या लढाऊ बाण्याची आणि समर्पणाची गाथा उमगते. उस्मानाबाद जिल्ह्यातील तडवळे कसबे या गावात डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांनी प्रवास केलेली बैलगाडी आहे. तिथल्या बापू माळी यांनी ही गाडी आजही जपून ठेवली आहे. १९४२ ला वतनदार अस्पृश्य परिषद तडवळे येथे झाली होती त्यानिमित्त डॉ. बाबासाहेब येथे आले होते. ऐतिहासिक घटनेची साक्षीदार असलेली गाडी म्हणजेच बाबासाहेबांची बैलगाडी यानिमित्ताने भेटते.

पुरोगामी महाराष्ट्रात आजही चालीरीती, परंपरा यांचा पगडा लोकांच्या मनावर आहे; परंतु लहानपणीच वडील वारलेले असताना विधवा आईला मिळालेली वागणूक यामुळे मनावर ओरखडे उठलेल्या वांगी येथील परशुराम माळी यांनी व्यवस्थेच्या पुढे जाऊन आपल्या मुलाचं लग्न सत्यशोधक पद्धतीने तेही ज्योतिरावांच्या अखडचे वाचन करून लावलं. एवढ्यावरच ते थांबले नाहीत, तर विधवा महिलांच्या हातून त्यांनी आपल्या मुलाच्या लग्नाची हळद दळणे करून घेतले. या लग्नाला येणाऱ्या प्रत्येकास शेतकऱ्याचा आसूड व नाना पाटील यांचे चरित्र ही पुस्तके भेट दिली. लग्नात पुस्तकांचा आहेर देणारे आणि पुस्तकांचा आहेर घेणारे आजच्या पिढीतील परशुराम







माळी आणि यांचे कुटुंब एकमेव असेल.

क्रांतिकारक लोकांना जेवण देणाऱ्या वाठार येथील सोनाबाई आणि त्यांची दुर्गा खानावळ १९३४ला स्थापन झाली. अनेक क्रांतिकारकांना त्यांनी अन्न दिले. शाळेची पायरीही न चढलेल्या आणि आपल्या प्रतिभेने लोककवी शाहीर असलेल्या सरूबाई वाघमारे. या मूळच्या मराठवाड्यातील. त्यांची लोककविता जर्मनी, थायलंड, अमेरिका, ब्राझील अशा ठिकाणी जाऊन सादर करण्याची संधी त्यांना मिळाली आहे. महाराष्ट्राच्या विधानसभेत अकरा वेळा विजयी होऊन गेलेले आणि दुष्काळी भागाचे भगीरथ ठरलेले सांगोल्याचे आमदार गणपतराव देशमुख यांचे कर्तृत्व आणि साधेपणा या निमित्ताने समोर येतो. नेहमीच दुष्काळ आणि नापिकीने जगणं बेहाल करणाऱ्या माणदेशात गुणवंतांची मात्र खाण आहे. झुलवाकार उत्तम बंडू तुपे या लेखकाच्या आयुष्यात आलेली उपेक्षा या निमित्तानं समोर येते. माणदेश म्हटलं, की डोळ्यासमोर येते ती उबदार घोंगडी. सध्या मात्र हा व्यवसाय नामशेष होण्याच्या मार्गावर आहे अशी खंत घोंगडी बनवणारे माणदेशातील महिमानगडचे कारागीर प्रकाश कुचेकर व्याकूळपणे मांडतात. याच माणदेशातील मोही गावच्या मातीत वाढून उपमहाराष्ट्र केसरी ठरलेला किरण भगत या मल्लाची जिद्द नव्या पिढीला प्रेरणादायी आहे. ठसठशीत कुंकवाचा टिळा, हिरवंगार नऊवारी लुगडे ही माणदेशची खरी ओळख. अशा माणदेशी पेहरावातील केराबाई सरगर आपल्या खणखणीत आवाजाने महाराष्ट्रभर प्रसिद्ध झाल्या आहेत. रेडिओवर गाणे गात आता त्यांचा आवाज आता सातासमुद्रापार पोहोचला आहे.

पोलीस भरतीचे स्वप्न बाळगलेला आणि वडाच्या झाडाखाली बसून चपला शिवण्याचे काम करणारा देवराष्ट्राचा शाळकरी मुलगा परश्या, चित्रपटाच्या माध्यमातून अन्यायाच्या विरोधात बंड करणारा रणजीत तथा विलास बापू रकटे, गोरगरिबांना त्रास देणाऱ्या गावगुंडांचा कर्दनकाळ ठरलेले बापू बिरू वाटेगावकर, जीप चालवून संसार चालवणाऱ्या रेठऱ्याच्या नूतन मोहिते, शामगावचे गोष्टीवेल्हाळ नामदेव आप्पा अशी अनेक माणसे आणि त्यांच्या जगण्याचे पैलू या पुस्तकातून समोर येतात. माणसांबरोबर तादात्म्य पावलेला अण्णांचा कोंबडा असो, की हे सगळे जगासमोर मांडलेले वाचून लेखकावर निरपेक्ष प्रेम करणारा अशोक सोनार यांसारखा दर्दी रसिक असो, यानिमित्ताने अशी विलक्षण माणसं इथं भेटतात. ग्रामीण आणि खडतर परिस्थितीतील एकेचाळीस व्यक्तींच्या कर्तृत्वाचा पट मांडणाऱ्या लेखांचा समावेश असलेले हे पुस्तक आजच्या लेखनातील मोलाचा दस्तावेज आहे.

मुलूखमाती म्हणजे केवळ व्यक्तींच्या सुख दुःखांचा परामर्श नव्हे तर उणं-पुरं जगणं वाट्याला आलेल्या महाराष्ट्रातील ग्रामीण खेड्यातील व्यक्तींच्या सामाजिकीकरणाचा, जीवनबंधाचा, कमी अधिक शिक्षणाचा, कलेचा, माणूसपणाचा, लढण्याचा मौखिक परंपरेतील लिखित वारसा! अर्थात डॉ. रणधीर शिंदे यांच्या मलपृष्ठावरील मतानुसार लिखित परंपरेत न सामावलेला आणि दुर्लक्षिलेल्या लोकांचा समाजतिहास यातून उलगडविला आहे. लेखक संपत मोरे यांनी मुलूखमातीच्या निमित्ताने भटक्या माणसांच्या अनाम कहाण्यांचा प्रदेश साकारला आहे. दैनिक दिव्य मराठीच्या रसिक पुरवणीतील लेखमालेतून प्रसिद्ध झालेल्या माणसांच्या शोधकथा पुस्तक रूपाने येत असताना संपादक प्रशांत पवार यांच्या समर्पक प्रस्तावनेतून शोधकतेने लिहिलेल्या या लेखांचे मूल्य अधोरेखित होते आहे. आयुष्यभर मातीत राबलेल्या आणि अपार कष्टाची लय आपल्या घामेजलेल्या चेहऱ्यावर दिसणाऱ्या वृद्ध व्यक्तींच्या मुखपृष्ठावरील चित्रांमुळे हे पुस्तक अधिक बोलके वाटते.

बाळासाहेब कांबळे



विविध क्षेत्रांतील मान्यवरांच्या मुलाखतींचे पुस्तक 'सृजन-संवाद' वरील परीक्षण लेख.

# सृजन संवाद : मुलाखतींच्या मैफिलीची अवीट मेजवानी

दीपक चैतन्य




पुस्तकाचे नाव : सृजन संवाद (भाग १ व २)
लेखक : गोपाळ अवटी
प्रकाशकः भाग्यश्री प्रकाशन, कोल्हापूर
प्रथमावृत्ती : नोव्हेंबर
पृष्ठेः ३८०  किंमत : ४२५/-

सध्या पुणे आकाशवाणीचे केंद्र निर्देशक असलेल्या श्री. गोपाळ अवटी यांची 'सृजन संवाद' नावाने संपूर्ण मुलाखतींवर आधारित असलेली दोन भागातील पुस्तके प्रकाशित झाली आहेत. कुठल्याही क्षेत्रातील मुलाखत ही ऐकणं असो, बघणं असो, वाचणं असो किंवा घेण असो हा सर्वांचाच अत्यंत आवडीचा विषय आहे, त्यामुळे अशा प्रकारच्या उपक्रमाला प्रतिसादही चांगला मिळतो.

सृजन संवाद ह्या पुस्तकातील दोन्ही भागांतील मुलाखती या लेखकाच्या वेगवेगळ्या आकाशवाणी केंद्रांच्या त्या त्या वेळेच्या गरजेप्रमाणे घेतल्या गेल्या आहेत. जवळपास दोन दशकांच्या मुलाखतींचा अप्रतिम असा संग्रह लेखकाने वाचकांसमोर या पुस्तकांच्या माध्यमातून ठेवला आहे. जवळपास सातशे पानांत सामावलेले हे संकलन आहे. ज्यामध्ये सर्वच क्षेत्रांतील प्रथितयश आणि ख्यातनाम मंडळींची उपस्थिती ह्यात लागली आहे, आणि त्या कशा लोकप्रिय होतील हे गंभीरतेने बघितलं गेलं आहे. मुलाखतीचा विस्तृत कॅनव्हास बघितला, तर कोणताही विषय हा आकाशवाणीला वर्ज्य नाही हे लक्षात येतं. (अगदी सिनेनटी इंद्राणी मुखर्जी, अभिनेते निळू फुल्यांपासून ते नर्मदा बचाओ आंदोलनाच्या नेत्या मेधा पाटकरांपर्यंत आणि संगीत क्षेत्रातील भालचंद्र पेंढारकरांपासून ते अरुणा



अनुक्रमणिका



ढेरे, ज्ञानेश्वर मुळे, दाभोळकर, गोविंददेव गिरी महाराजांसारख्या जवळपास पन्नास वेगवेगळ्या क्षेत्रांतील बहुश्रुत माणसांची ही मांदियाळी आहे.) अर्थात यात लेखकाचा स्वतःचा अभ्यास आणि आवड ही परिक्षित होते, त्यामुळे संपूर्ण संकलनालाच एक असोशी आणि आपलेपणाचा गंध लगडला आहे. त्या त्या वेळेसच्या त्या लोकप्रिय मुलाखतींना पुस्तक रूपात अक्षर वाङ्मयातही प्रस्थापित करण्याचा प्रयत्न करणं हाच ह्या संकलनाचा उद्देश आहे.

एकदा हा उद्देश नक्की झाल्यावर तो यशस्वी करण्यासाठी लेखकाने बरेच प्रयोग केले आहेत. महत्त्वाचे म्हणजे तंत्रज्ञानाच्या मदतीने घेतलेल्या या मुलाखतींना शब्दबद्ध करण्याचे वेळखाऊ काम लेखकाने आपल्या सहकारी मित्राच्या मदतीने फारच धीराने केले आहे आणि त्यांचे आभारही मानले आहेत. ते गरजेचंही होतं नाही तर हे संकलन सिद्ध झालंच नसतं. आपल्या प्रस्तावनेत लवटे साहेबांनी म्हटल्याप्रमाणे कानाच्या आणि डोळ्याच्या, चार बोटांच्या अंतराचा महिमा जाणूनच संपूर्ण ट्रॅक बदलून हे काम झालं आहे.

ह्या पुस्तकातील प्रत्येक मुलाखतच एकेका पुस्तकाचा विषय होऊ शकतो एवढी ही माणसे त्यांच्या कार्याने मोठी आहेत; पण लेखकाने फारच काटेकोर अभ्यास करून त्यांना लेखाच्या मर्यादेत बसविले आहे आणि आपले ध्यासपर्व पूर्ण केले आहे. अभिनव गुप्ताने ज्या रस सिद्धांताचा वारंवार (कोणाकरिता?आणि कशा-करिता?) आग्रह वाङ्मयाकरिता केला आहे त्याचं सृजन संवाद हे अप्रतिम उदाहरण आहे. जवळपास सर्वच मुलाखतींच्या पूर्वी लेखकाने व्यक्त केलेले आपले मनोगत ( रेडिओतील निवेदकाला जे आवश्यक असते.) म्हणजे प्रत्येक मुलाखतीचे असलेले पकड स्वर आहेत. या स्वरांच्या भोवतीच ती ती मुलाखात बेतलेली आहे. अर्थात लेखक हे पंचामृत फारच भक्तिभावाने वाचकांच्या हातावर ठेवतो आणि शब्दाचा खेळ दोन्ही बाजूंनी रंगत जातो.

तसंच एकाच बैठकीत वाचून हातावेगळी केली जाणारी ही पुस्तके नक्कीच नाहीत. त्याला बऱ्याच ठहरावाची गरज आहे. घरात ठेवलेल्या वेगवेगळ्या अत्तरांच्या कुपींसारखं हे प्रकरण आहे. टेबलावर ही पुस्तके ठेवायची आणि आपल्या सामयिक चित्तवृतीप्रमाणे पुस्तकातील मुलाखत काढायची आणि मैफिलीचे मानिंद व्हायचे. दाद देण्याकरिता दुसऱ्या कोणाची गरजच पडत नाही.

दोन्ही पुस्तकांच्या प्रारंभी असलेले लेखकाचे पाच-सात पानांचं मनोगत त्यांच्या अभ्यासूवृत्तीचं आणि अल्पाक्षर (टर्सनेस) पद्धतीचं अद्भुत रसायन आहे. आणि सूत्र वाक्यातूनच (कोटेबल कोट्स) प्रगट झालं आहे. वानगीदाखल खालील वाक्ये बघण्यासारखी आहेत.

१. लेखन म्हणजे व्याकुळता आणि विवशताच.

२. आनंदाच्या बेहोशीची आणि जल्लोशाची व्याख्या रचताना हेच शब्द गवंड्याची थापी होऊन हातात खेळतात.

३. सर्वच कला मूळ रूपात जीवनातील अभावाबद्दल एक सुंदर जवळीक किंवा निष्ठा प्रगट करतात.

४. असे छोटे मोठे विचार आत्मपरीक्षणाची सवय लावून देतात. मुलाखत घेणारं मन त्यातूनच घडत असावं.

५. समष्टीला समजून घेण्याची उत्सुकता शब्द कायम ठेवतात.

६. ही प्रकाशाची तिरीप छोटी असली तरी गाभारा उजळणारी असते.

७. हृदयात हळूहळू उमलणारी शब्दबीजं पुस्तकांतून अंकुरित होतात, इत्यादी. विचारांच्या फारच सखोल पाण्यात उतरून केलेलं हे लेखकाचं चिंतन आहे. हे पुस्तक संपन्न होत असताना लेखकाच्या मनात असलेला कृतज्ञता भाव हा जाणीव-नेणिवेच्या पलीकडचा आहे. या आनंद यात्रेत लेखक आपल्या मातृसंस्थेपासून आपल्या सहकाऱ्यांपर्यंत सर्वांनाच सहभागी करून घेतो. जवळपास सर्वच मुलाखतींनंतर संदर्भाला धरून देण्यात आलेली ब्लॅक अँड व्हाइट छायाचित्रे वाचकाला नक्कीच नॉस्टॅल्जिक करू शकतात. अशा प्रकारचे अभ्यासू साहित्य वाचणाऱ्या वाचकांकरता अवटींचो ही दोन्ही पुस्तके निश्चितच अपेक्षा वाढविणारे महत्त्वाचे दस्तावेज आहेत. पुस्तकांचे मुखपृष्ठ सोपे पण आकर्षक आणि समर्पक आहे.

**दीपक चैतन्य**

चलभाषः ८५५१०४२२२४

◈◈

# महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे
# इतर शाखा कार्यवृत्त नोंद

### दामाजीनगर शाखा

१) १ नोव्हेंबर २०२०- 'कविता' हे भावकल्लोळांना शब्दबद्ध करणारे माध्यम आहे. त्याचा प्रभावी वापर म.सा.प. दामाजीनगर शाखा करत आहे. असे मत कवयित्री संगीता मासाळ यांनी शाखेने सभासदांसाठी आयोजित केलेल्या ऑनलाईन काव्य वाचन स्पर्धेच्या पारितोषिक वितरण प्रसंगी व्यक्त केले. यावेळी प्रा. पठाण शिवशरण, प्रा राजेश भोजने, प्रा. दत्ता सरगर, सुधा मांडवे यांनीही आपले मनोगत व्यक्त केले. सूत्रसंचालन भारती धनवे यांनी केले, तर गोरक्ष जाधव यांनी आभार मानले.

२) ११नोव्हेंबर २०२०- दिवाळी पहाट ही सुरेल गाण्याची मैफल ऑनलाईन घेण्यात आली. तिचे उद्घाटन अॅड. रमेश जोशी यांचे हस्ते झाले. या वेळी सौ.स्मिता जडे, सौ.शुभदा जोशी, शुभांगी चिटणीस, सौ.प्रफुल्लता स्वामी यानी भक्तिगीते व भावगीते सादर केली. तबल्यावर अजय देशपांडे यांनी साथ दिली. सूत्रसंचालन व आभारप्रदर्शन भारती धनवे यानी केले.

३) २९ नोव्हेंबर २०२०- लॉकडाउननंतर प्रथमच सुरू झालेल्या दहा माध्यमिक व उच्चमाध्यमिक शाळांना व संजीवनी हॉस्पिटलला शाखेच्या वतीने स्वयंचलित सॅनिटायझेशन मशिन भेट देण्यात आले.

४) १७ डिसेंबर २०२० - स्व. संजय सविता सार्वजनिक वाचनालयाच्या सहकार्याने ग.दि. माडगूळकरांची पुण्यतिथी साजरी करण्यात आली. यावेळी पंढरीनाथ जोशी, प्रा.दत्ता सरगर, राकेश गायकवाड अॅड. रमेश जोशी यांनी गदिमांच्या आठवणींना उजाळा दिला. अध्यक्षस्थानी प्रकाश जडे होते. सूत्रसंचालन व आभार प्रदर्शन गोरक्ष जाधव यांनी केले.

५) २०डिसेंबर २०२० -'अक्षरठेवा' या प्रकाश जडे यांच्या संग्रहातील ज्येष्ठ साहित्यिकांच्या गेल्या चाळीस वर्षातील पत्रसंग्रहाचे प्रकाशन पांडुरंग जोशी यांचे हस्ते करण्यात आले.

६) २९ डिसेंबर २०२० - सोलापूरचा सुपरसिंगर किताब पटकावणारे श्री. लहु ढगे, लोकसेवा अकादमीचा गुणवंत शिक्षक पुरस्कार प्राप्त श्री. गोरक्ष जाधव व परविन बागवान, राधेश्याम फाऊंडेशनचा पुरस्कार विजेत्या सौ. रेश्मा गुंगे यांचा शाखेच्या वतीने सत्कार करण्यात आला.

७) १० जानेवारी २०२० - साहित्यात बापाचं लेकीवरचं प्रेम फार कमी प्रमाणात व्यक्त झालं आहे. हे बापाचं अव्यक्त प्रेम प्रकाश जडे यांच्या 'वात्सल्यसूक्त'या कवितासंग्रहात प्रभावीपणे व्यक्त झाले आहे. वात्सल्यसूक्त म्हणजे बापाचं आईपण अधोरेखित करणारी कविता-असे मत ज्येष्ठ साहित्यिका प्रा. डॉ. सौ. श्रुतीश्री वडगबाळकर यांनी प्रकाश जडे याच्या कविता संग्रहाचे प्रकाशन करताना व्यक्त केले.या प्रकाशन समारंभाच्या अध्यक्षस्थानी म.सा.प.चे सोलापूर जिल्हा प्रतिनिधी पद्माकर कुलकर्णी होते. या वेळी कवयित्री सौ.वंदना कुलकर्णी, नगराध्यक्षा सौ अरुणा माळी, म.सा.प.चे जिल्हा प्रतिनिधी कल्याणराव शिंदे यानीही मनोगते व्यक्त केली. सौ स्मिता जडे व सौ.अवंती पटवर्धन यांनी 'वात्सल्यसूक्त' मधील निवडक कवितांचे सादरीकरण केले.सौ.दया वाकडे यांनी आभार मानले

८) १६ जानेवारी २०२१- साहित्याचे वाण महिलांना आत्मभान देईल-असे प्रतिपादन नगरसेविका सौ.अनिता नागणे यांनी शाखेने मकरसंक्रांती निमित्त आयोजित केलेल्या हळदीकुंकू व तिळगूळ समारंभात बोलताना केले. या वेळी साहित्याचे वाण म्हणून महिलांना पुस्तके लुटण्यात आली.

९)३० जानेवारी २०२१ - शाखेचे शिवार साहित्यसंमेलन शिवारात खास उभारलेल्या कवि लखु दुधाळ नगरीतील समाजसेवक दीनानाथ जोशी सभामंडपात झाले. या संमेलनाच्या अध्यक्षस्थानी प्रयोगशील शेतकरी शिवशंकर भांजे होते. स्वागताध्यक्षपदी अॅड. रमेश जोशी यांची निवड करण्यात आली होती. संमेलनाचे उद्घाटन नगराध्यक्षा अरुणा माळी यांचे हस्ते करण्यात आले. संमेलनस्थळी बैलगाडीतून संमेलनाध्यक्ष, उद्घाटक याचे मिरवणुकीने आगमन झाले. शेतीची अवजारे व ग्रंथाचे पूजन करून उद्घाटन करण्यात आले. अध्यक्षीय भाषणात शिवशंकर भांजे यांनी 'काळ्या रानातल्या लक्ष्मीच्या भेटीला साहित्यिकांची मांदियाळी आली'अशी भावना व्यक्त केली. पहिल्या सत्रात पंढरीनाथ जोशी यांचे अध्यक्षतेखाली झालेल्या कथाकथनात भारती धनवे, अशोक उन्हाळे, रेश्मा गुंगे, यतिराज वाकळे, सुधा माडवे, शुभदा जोशी, गोरक्ष जाधव यांनी कथाकथन केले तर- लॉकडाऊन काळात काय घडलं-काय बिघडलं---? या विषयावर दिगंबर यादव यांचे अध्यक्षतेखाली झालेल्या चर्चासत्रात डॉ. प्रीती शिर्के, दत्ता जमदाडे, प्रा. सचिन माने, दामोदर माने सहभागी झाले. सुग्रास शिवार भोजनानंतर झालेल्या रंगतदार कविसंमेलनात संगीता मासाळ, भारत मुढे, साधना घाडगे, गोरक्ष जाधव, हिना शेख, दया वाकडे, गीता पुजारी, आनंद लोकरे यानी कविता सादर केल्या. अध्यक्षस्थानी प्रा.दत्ता सरगर होते. उत्तरार्धात 'बोल मराठी-बोल! हा शुद्ध मराठी बोलण्याचा रंजक कार्यक्रम सौ.स्मिता जडे व सौ.भारती धनवे यांनी सादर केला. त्यात उपस्थित

रसिक मोठ्या सख्येने उत्स्फूर्तपणे सामील झाले. या कार्यक्रमाच्या अध्यक्षस्थानी सौ.रेखा जडे होत्या. या शिवार संमेलनाचा समारोप माजी सभापती अॅड. नंदकुमार पवार यांचे अध्यक्षतेखाली म.सा.प पुणे. सोलापूर जिल्हा प्रतिनिधी कल्याणराव शिंदे, नगरपालिकेचे मुख्याधिकारी निशिकांत प्रचंडराव, सौ. गायत्री प्रचंडराव यांचे प्रमुख उपस्थितीत झाला. संमेलनाचे प्रास्ताविक शाखाध्यक्ष प्रकाश जडे यांनी केले. कार्याध्यक्ष यतिराज वाकळे यानी आभार मानले. संतोष मिसाळ, अशपाक काझी, बालाजी शिंदे, दया वाकडे यांनी सूत्रसंचालन केले. संमेलन यशस्वीपणे पार पाडण्यासाठी लहू ढगे, दिगंबर भगरे, लक्ष्मण पवार, शुभदा जोशी यांनी परिश्रम घेतले.

१०) अहवाल काळात निधन झालेल्या साहित्यिका विचारवंत प्रा. पुष्पा भावे, गझलकार इलाही जमादार यांना शाखेच्या वतीने खास सभा घेऊन श्रद्धांजली वाहण्यात आली.

## अहमदनगर शाखा

१) २७ फेब्रुवारी २०२१: **मराठी राजभाषा दिनानिमित्त व्याख्यान:** महाराष्ट्र साहित्य परिषद अहमदनगर शाखेच्या वतीने मराठी भाषा दिन व व कवी कुसुमाग्रज जयंती प्रयत्न नर्सिंग कॉलेज येथे साजरी करण्यात आली. प्राचार्य डॉ. भास्करराव झावरे यांच्या व्याख्यानाचे आयोजन करण्यात आले होते. कार्यक्रमाच्या अध्यक्षस्थानी महाराष्ट्र साहित्य परिषद शाखेचे अध्यक्ष अनिरुद्ध देवचक्के होते.

यावेळी ज्येष्ठ कवी कुसुमाग्रज यांच्या कविताचे वाचन साहित्य परिषदेचे केंद्रीय कार्यकारिणी सदस्य व कवी चंद्रकात पालवे, प्रा. मेधाताई काळे, कार्याध्यक्ष किशोर मरकड, प्रा. रवींद्र देवढे, प्रा. चंद्रकांत जोशी, रत्ना वाघमारे यानी केले, तर कार्यकारिणी सदस्य व ज्येष्ठ कवी अरविंद ब्राह्मणे यानी संकलित केलेल्या जुन्या म्हणी सादर करून रसिकांची दाद मिळवली. प्रारंभी स्वागत उपाध्यक्ष डॉक्टर शीतल म्हस्के यांनी केले, तर प्रास्ताविक कार्याध्यक्ष किशोर मरकड यांनी केले. कार्यक्रमाचे सूत्रसंचालन खजिनदार दशरथ खोसे तर आभार प्रकल्पप्रमुख श्याम शिंदे यांनी मानले. या कार्यक्रमात 'धमाका' दिवाळी अंकास पारितोषिक मिळाल्याबद्दल संपादक नसीर शेख, केंद्रीय कार्यकारिणीवर निवड झाल्याबद्दल कवी चंद्रकांत पालवे, राष्ट्रवादी कॉंग्रेसच्या नाट्य कला सेलच्या अध्यक्षपदी निवड झाल्याबद्दल श्याम शिंदे याचे, कार्यवाह चंद्रकांत जोशी यांना पदोन्नती मिळाल्याबद्दल व महाराष्ट्र राज्य डिजिटल मीडिया संपादक सघटनेच्या राज्य कार्यकारिणी कार्याध्यक्ष किशोर मरकड यांची निवड झाल्याबद्दल त्यांचा सत्कार करण्यात आला. यावेळी मसापतर्फे घेण्यात आलेल्या राज्यस्तरीय निबंध स्पर्धेत पारितोषिक मिळवणाऱ्या स्पर्धकांचा सत्कार करण्यात आला. त्यामध्ये प्रथम क्रमांक श्रद्धा वझे, द्वितीय क्रमांक अशोक समर्षी, तृतीय क्रमांक शरद धलपे, सौ. वैशाली धर्माधिकारी, उत्तेजनार्थ रोहिणी बनकर, बलभीम शिंदे, दिलीप साळी, विशेष निबंध उषा सोलकर, जयश्री खिस्ती यांना प्रमाणपत्र व मानचिन्ह देऊन त्यांचा गौरव करण्यात आला. निबंध स्पर्धेचे परीक्षण कार्यवाह प्राध्यापक चंद्रकांत जोशी यांनी केले होते. प्रारंभी स्वागत उपाध्यक्ष डॉक्टर शीतल म्हस्के यांनी केले, तर आभार श्याम शिंदे यांनी मानले. कार्यक्रमाचे सूत्रसंचालन खजिनदार दशरथ खोसे यांनी केले. यावेळी साहित्यिक कार्यकारिणी सदस्य व सभासद उपस्थित होते.

## डोंबिवली शाखा– वृत्तांत फेसबुक कार्यक्रम

मसाप डोंबिवली शाखेने फेसबुक माध्यमातून सादर केलेले कार्यक्रम

१.) महाराष्ट्रातील विविध शहरातील निवडक कवींना आमंत्रित करून कवी संमेलन दि. २८-११-२०२०. रोजी आयोजित केले होते. यात संघमित्रा खंडारे/ अमरावती, प्राजक्ता वेदपाठक/ पुणे, पुनीत मातकर/ गडचिरोली, निर्मिती कोलते/सांगली तसेच आनंद पेंढारकर/ डोंबिवली या मान्यवर कवींचा सहभाग होता. सूत्रसंचालन श्री. महेश देशपांडे यांनी केले. या कार्यक्रमास जवळपास २३० प्रेक्षकांचा प्रतिसाद होता.

२)नृत्यगुरू संगीताचार्य वैशाली दुधे यांचा 'बहार कथक नृत्यकलेचा' हा बहारदार कार्यक्रम १०-१२-२०२० रोजी सादर करण्यात आला. या कार्यक्रमात वैशाली दुधे यांनी कथक नृत्य शैलीतील बारकावे समजावून सांगितले.टप्पा, ठुमरी, पदन्यास, बोल-रचना अशा संकल्पना समजावून सांगत वैशालीताईंनी कार्यक्रम रंगवला. या कार्यक्रमाचा जवळपास ६०० श्रोत्यांनी लाभ घेतला. परदेशातील मंडळींनीदेखील आस्वाद घेतला.

३) मसाप डोंबिवली शाखेचे अध्यक्ष आणि ज्येष्ठ साहित्यिक श्री. वामनराव देशपांडे यांचा साहित्यिक गप्पा हा कार्यक्रम दि. २७-१२-२०२० रोजी सादर करण्यात आला. वामनराव देशपांडे म्हणजे महाराष्ट्रातील मागील वर्षांच्या साहित्यिक घडामोडींचा चालताबोलता इतिहास! अनेक साहित्यिकांशी त्यांचा जवळून संबंध आला होता. त्यातील निवडक म्हणजे प्रभाकर अत्रे, दुर्गाबाई भागवत, विजय तेंडूलकर यांच्या आठवणी त्यांनी सांगितल्या. बोलण्याच्या ओघात इतर अनेक साहित्यिकांचाही उल्लेख झालाच. श्री. आनद गोसावी आणि ज्येष्ठ समीक्षक श्री. दीपक घारे यांनी त्यांच्याशी संवाद साधला. याही कार्यक्रमास प्रचंड प्रतिसाद मिळाला.

४) मराठी भाषा संवर्धन पंधरवड्याच्या निमित्ताने दिनांक १६-१-२०२१ या दिवशी ज्येष्ठ समीक्षक आणि लेखक प्राध्यापक दीपक घारे यांची मराठी साहित्य आणि विचारप्रवाह यावर मुलाखत आयोजित केली होती. त्यांच्याशी वार्तालाप केला श्री. आनंद गोसावी यांनी. श्री. घारे यांनी मराठी साहित्याचा वेध घेताना अनेक विचार प्रवाहांचा धावता आढावा घेतला. विचार न करता जर संस्कार पाळले तर समाज रूढीग्रस्त होतो. इंग्रजी अंमलाच्या मागचापुढचा कालखंड हा स्मृतिभ्रंशाचा होता असे प्रतिपादन करून त्यांनी आपल्या बोलण्यात मे.पु.रेगे, प्रभाकर पाध्ये, विश्वनाथ खैरे, आयन रँड तसेच संस्कृत साहित्यातील काही ग्रंथांचा उल्लेख करून एकंदरीतच विचार प्रवाहांचा आढावा घेतला. मुद्रणाच्या सांस्कृतिक परिणामाविषयीही त्यांनी भाष्य केले. श्री. आनंद गोसावी यांनी त्यांना बोलते केले. श्री. सुरेश देशपांडे यांनी स्वागत केले आणि आभार व्यक्त केले

५) डॉ. राणी खेडीकर यांचे रेड झोन आणि निष्पाप बालके या विषयावर व्याख्यान ३० जानेवारी २०२१. आयोजित केले होते; पण तांत्रिक अडचणीमुळे हा कार्यक्रम होऊ शकला नाही.

६) २७ फेब्रुवारी २०२१ कविश्रेष्ठ कुसुमाग्रज यांचा जन्मदिवस आणि मराठी राज्यभाषा गौरवदिन, या निमित्ताने सुप्रसिद्ध निवेदिका, लेखिका, नाटककार, अभिनेत्री, कवयित्री अशा अनेक गुणांनी मंडित असलेल्या कलाकार संपदा जोगळेकर-कुळकर्णी यांचे 'जगण्याचीच होते भाषा' या विषयावरील मुक्तचिंतन फेसबुक पृष्ठावर आयोजित केले होते.

संपदा जोगळेकर-कुळकर्णी यांनी आपल्या साहित्यिक आणि कलाजीवनाचा आढावा घेत कविता किंवा अन्य साहित्याने त्यांच्या जीवनात कसा आनंद पेरला याचे अतिशय सुंदर, ओघवत्या शैलीत वर्णन करून श्रोत्यांना खिळवून ठेवले. दिपाली काळे यांनी त्यांचा परिचय करून दिला आणि आभार व्यक्त केले

डिसेंबर २०२० मध्ये मसाप डोंबिवली शाखा आणि रोटरी क्लब ऑफ मिडटाऊन यांच्या सहकार्याने कविता, लेख आणि कथास्पर्धा आयोजित केली होती. ३४५ स्पर्धकांनी यात सहभाग घेतला. परीक्षक म्हणून डॉ. अनंत देशमुख, कथालेखिका विनिता ऐनापुरे आणि सेहा भाडारकर यांनी काम पाहिले. विजेत्या स्पर्धकांना २६ जानेवारी २०२१ या दिवशी ज्येष्ठ कवी अशोक नायगावकर यांच्या हस्ते प्रशस्तिपत्रे आणि रोख पारितोषिके देण्यात आली. हा कार्यक्रमही फेसबुकवर सादर करण्यात आला. या सर्वच कार्यक्रमांना प्रत्यक्ष आणि नंतरही प्रचंड प्रतिसाद होता. मसाप डोंबिवली शाखेने फेसबुक पृष्ठावरील कार्यक्रमांत सातत्य ठेवले आहे.

### ❂ धुळे शाखा ❂

१) दि. २७ फेब्रुवारी २०२०: रोजी झेड. बी. पाटील महाविद्यालय आणि मसाप धुळे जि. शाखा यांच्या संयुक्त विद्यमाने कवी कुसुमाग्रज यांची जयंती 'मराठी राजभाषा दिन' म्हणून साजरी करण्यात आली. या निमित्ताने आयोजित काव्यवाचनाच्या कार्यक्रमात उस्मानाबाद येथे आयोजित अ. भा. म. सा. संमेलनाच्या कवी कट्ट्यावर कविता गाजवलेले कवी पापालाल पवार, कवी चंद्रशेखर सोनार, निमंत्रित कवींमध्ये आपल्या कवितेने रसिकांची दाद मिळविलेले कवी प्रा. डॉ. सदाशिव सूर्यवंशी याशिवाय प्रा. रमेश राठोड, प्रा. डॉ. योगिता पाटील, श्री. रमेश बोरसे या सर्वांनी आपल्या विविध विषयांवरील कविता सादर करून रसिक श्रोत्यांना मंत्रमुग्ध केले. या कार्यक्रमाचे प्रास्ताविक धुळे- नंदुरबार जि. प्रतिनिधी डॉ. शशिकला पवार यांनी केले. मसाप, धुळे, शाखेच्या अध्यक्ष प्रा. उषा पाटील यांनी समारोप केला. प्रा.डॉ. सूर्यवंशी यांनी सूत्रसंचालन केले.

२) दि. १७ ऑक्टोबर २०२० ते २५ ऑक्टोबर २०२० पर्यंत मसाप, धुळे जि. शाखा आणि नंदुरबार जि. शाखा यांच्या संयुक्त विद्यमाने शारदीय व्याख्यानमाला नवरात्र उत्सवाचे झूम ॲपवर ऑनलाईन आयोजन करण्यात आले. या व्याख्यानमालेत मसाप, पुणेचे कार्याध्यक्ष प्रा. मिलिंद जोशी (विवेकानंदांची धर्मकन्या: भगिनी निवेदिता) प्रमुख कार्यवाह श्री. प्रकाश पायगुडे (साहित्य संमेलनांचा इतिहास), कोषाध्यक्ष सौ. सुनिताराजे पवार (ग्रंथालय चळवळ आणि वाचन संस्कृती), पिंपरी चिंचवड मसाप, शाखेचे अध्यक्ष व पुणे जि. प्रतिनिधी श्री. राजन लाखे (गदिमा: प्रतिभा आणि प्रतिमा) दिल्ली येथील डॉ. सच्चिदानंद जोशी (नवरात्र उत्सव आणि कोरोना परिस्थिती), धुळे येथील अहिराणी भाषेचे अभ्यासक, साहित्यिक श्री सुभाष अहिरे (अहिराणी कथाकथन) चाळीसगावचे. जळगाव जि. प्रतिनिधी प्राचार्य तानसेन जगताप (बहिणाबाईंची गाणी). नंदुरबारचे इतिहास अभ्यासक व संशोधक डॉ. सर्जेराव भामरे (खानदेशचा वैभवशाली इतिहास) नंदुरबार स्थित- प्रा. हिमतराव चव्हाण (भारतीय सांस्कृतिक कलांचा वारसा) इ. सर्व सहभागी होऊन या वक्त्यांनी वरील विविध विषयांवर आपले विचार मांडले. धुळे व नंदुरबार जिल्ह्यातील मसाप सभासदांचा व्याख्यानमालेस उत्तम प्रतिसाद मिळाला. या व्याख्यानमालेचे संयोजन धुळे- नंदुरबार जि. प्रतिनिधी डॉ. शशिकला पवार आणि सूत्रसंचालन नंदुरबार शाखेचे कार्यकारिणी सदस्य प्रा. डॉ. उमेश शिंदे यांनी केले

या नवरात्र उत्सव शारदीय व्याख्यानमालेच्या आयोजनात धुळे मसाप अध्यक्ष प्रा. उषा पाटील, कार्याध्यक्ष डॉ. चुडामण पगारे, नंदुरबार मसाप अध्यक्ष डॉ. शिवाजीराव पाटील, कार्याध्यक्ष गिरीश महाजन, इतर पदाधिकारी प्रा. संजीव गिरासे (उपाध्यक्ष), डॉ. सुरेंद्र मोरे, डॉ. वाल्मिकी आढावे, डॉ. सुनील पवार, डॉ. विद्या पाटील, डॉ. प्रविणसिंग गिरासे, श्रीराम दाऊतखाने या सर्वांचे सहकार्य लाभले. विशेष सहकार्य लाभले धुळे मसापचे विश्‍वस्त प्राचार्य डॉ. पी.एच पवार यांचे.

३) दि. २७ जानेवारी २०२१ रोजी मराठी भाषा संवर्धन पंधरवडानिमित्ताने मसाप, धुळे जि. शाखेने काव्यवाचनाचा कार्यक्रम झूम ॲपवर ऑनलाईन आयोजित केला होता. या काव्यवाचनाच्या कार्यक्रमात प्राचार्य रत्नाताई पाटील फोन पार्वतीने केला, नही मी मुगीच न्हायनू, ही अहिराणी कविता, त्रिशला साळवे यांनी सदर्भ, वांझोट पितृत्व, श्री. संदीप सोनवणे यांनी सांग बाप्पा माह्या बापान काय गुन्हा केला, शेतकरी मना बाप, श्री. एन. एच. महाजन यांनी परिवर्तन, लेक, प्रा. विनय पाटील यांनी बाबा, समाज तर प्रा. डॉ. सदाशिव सूर्यवंशी यांनी मायबाप, स्त्रीचं जगणं या कविता सादर करून रसिक श्रोत्यांची दाद मिळवली. या कार्यक्रमाचे प्रास्ताविक धुळे नंदुरबार जि. प्रतिनिधी डॉ. शशिकला पवार यांनी केले. समारोप धुळे शाखेच्या अध्यक्ष प्रा. उषा पाटील यांनी केला. सूत्रसंचालन प्रा. डॉ. सदाशिव सूर्यवंशी यांनी केले. या कार्यक्रमाच्या आयोजनास कार्याध्यक्ष डॉ. चुडामण पगारे. उपाध्यक्ष डॉ. संजीव गिरासे, कार्यवाह डॉ. सुरेंद्र मोरे, डॉ. वाल्मी आढावे, कोषाध्यक्ष डॉ. सुनील पवार, सदस्य विद्या पाटील, डॉ. प्रवीणसिंग गिरासे यांचे सहकार्य लाभले. या काव्यवाचनाच्या कार्यक्रमास रसिक श्रोत्यांचा उत्तम प्रतिसाद मिळाला.



## जांभेकरांचे बहुस्पर्शी कार्य आणि ध्येयवादी पत्रकारिता आजही अनुकरणीय : डॉ. राजा दीक्षित

**मसापमध्ये 'दर्पण'कार बाळशास्त्री जांभेकरांना अभिवादन**

पुणे: 'महाराष्ट्रातील प्रबोधनाच्या आरंभ काळात 'दिग्दर्शन' करणाऱ्यांमध्ये बाळशास्त्रींचे स्थान मोठे होते. त्यांच्या अवघ्या तेहतीस वर्षांच्या जीवन 'दर्पणा'त तत्कालीन प्रबोधनाच्या सामर्थ्य-मर्यादांचे दर्शन घडू शकते. त्यांचे बहुस्पर्शी कार्य आणि ध्येयवादी पत्रकारिता आजही अनुकरणीय आहे.' असे मत ज्येष्ठ अभ्यासक डॉ. राजा दीक्षित यांनी व्यक्त केले. महाराष्ट्र साहित्य परिषद पुणे आणि महाराष्ट्र पत्रकार कल्याण निधी फलटण (सातारा) यांच्या संयुक्त विद्यमाने मराठी वृत्तपत्रसृष्टीचे जनक 'दर्पण'कार आचार्य बाळशास्त्री जांभेकर यांच्या २०९ व्या जयंतीनिमित्त 'बाळशास्त्री जांभेकर आणि महाराष्ट्रातील प्रबोधन' या विषयावर व्याख्यानाचे आयोजन करण्यात आले होते. यावेळी रवींद्र बेडकिहाळ, प्रकाश पायगुडे आणि अमर शेंडे उपस्थित होते.

डॉ. दीक्षित म्हणाले, 'महाराष्ट्रातील आधुनिकतेचे आरंभकालीन प्रतिनिधी, प्रबोधनाचे अग्रदूत, मराठी वृत्तपत्रकारितेचे जनक आणि नेमस्त उदारमतवादी सुधारक या नात्यांनी आधुनिक महाराष्ट्राच्या इतिहासावर बाळशास्त्री जांभेकर यांनी आपली मुद्रा उमटवली. इंग्रजी राजवट आल्यावर तिला प्रतिसाद देणाऱ्या नवशिक्षितांच्या पहिल्या पिढीचे आणि नवोदित मध्यमवर्गाचे ते प्रतिनिधी होते. एल्फिन्स्टन कॉलेजमधले पहिले देशी 'असिस्टंट प्रोफेसर' असणाऱ्या 'आद्याचार्य' जांभेकरांच्या शिष्य परंपरेत डॉ. भाऊ दाजी लाड, प्रा. केरो लक्ष्मण छत्रे, रा.ब. नाना मोरोजी त्रिलोकेकर, दादाभाई नौरोजी अशा कितीतरी नामवंतांचा समावेश होता. बाळशास्त्रींची शैक्षणिक, भाषिक आणि वृत्तपत्रीय कामगिरी अतिशय उल्लेखनीय होती. त्यांचा काळ आणि सामाजिक पार्श्वभूमी लक्षात घेता त्यांच्या कार्याला स्वाभाविकपणे अभिजन मर्यादा पडली होती; पण अशा मर्यादांमधूनच महाराष्ट्रातील प्रबोधन आकाराला आले. ती एक 'ऐतिहासिक स्वाभाविकता' म्हणता येईल.

रवींद्र बेडकिहाळ म्हणाले, 'गेली ३७ वर्षे त्यांचे स्मरण कार्य महाराष्ट्र पत्रकार कल्याण निधीच्या माध्यमातून करीत आहोत. यंदाच्या जयंतीदिनाचे मोठे वैशिष्ट्य म्हणजे, संस्थेच्या मागणीनुसार या वर्षीपासून बाळशास्त्रींच्या जयंतीदिनाचा समावेश महाराष्ट्र शासनाच्या थोर व्यक्तींच्या अभिवादन यादीत झाला आहे. हा त्यांच्या कार्यकर्तृत्वाचा गौरव आहे. प्रकाश पायगुडे यांनी स्वागतपर प्रास्ताविक केले.



अनुक्रमणिका



## कानेटकरांच्या नाटकांमुळे साहित्याचे दालन समृद्ध : प्रा. मिलिंद जोशी

### महाराष्ट्र साहित्य परिषदेत जन्मशताब्दीनिमित्त अभिवादन

पुणे : मानवी जीवन व्यवहारातल्या घटनाप्रसंगातली तात्कालिकता बाजूला ठेवून उत्कटता कायम राखणारे रचना कौशल्य, उत्तम प्रयोगनिर्मिती मूल्ये आणि प्रेक्षकाभिरुचीचे भान या गुणवैशिष्ट्यांमुळे कानेटकरांची कारकीर्द नाटककार म्हणून यशस्वी ठरली. या मनस्वी नाटककाराच्या सर्जनयात्रेमुळे मराठी साहित्यातील नाटकांचे दालन समृद्ध झाले. कानेटकर हे परिणत प्रज्ञेचे चतुरस्र नाटककार होते. असे मत महाराष्ट्र साहित्य परिषदेचे कार्याध्यक्ष प्रा. मिलिंद जोशी यांनी केले. नाटककार वसंत कानेटकर यांच्या जन्मशताब्दी वर्षानिमित्त महाराष्ट्र साहित्य परिषदेत प्रा. जोशी यांच्या हस्ते कानेटकरांच्या प्रतिमेला पुष्पहार अर्पण करून अभिवादन करण्यात आले, त्या वेळी ते बोलत होते. प्रमुख कार्यवाह प्रकाश पायगुडे, कोषाध्यक्ष सुनिताराजे पवार, कार्यवाह दीपक करंदीकर, बंडा जोशी, प्रा. माधव राजगुरू, वि. दा. पिंगळे, प्रमोद आडकर, उद्धव कानडे, पुणे शहर प्रतिनिधी सतीश देसाई उपस्थित होते.

प्रा. जोशी म्हणाले, ''किर्लोस्कर- देवलांपासून उदय पावलेली आणि खाडिलकर-गडकरींच्या काळात ऐश्वर्यसंपन्न झालेली मराठी रंगभूमी मूकपट आणि बोलपट निर्मितीच्या आरंभ काळात मोडकळीस आली होती. नाटक कंपन्या बंद पडल्या होत्या. नट बेकार झाले होते. प्रेक्षक सिनेमाकडे वळले होते अशा काळात मराठी रंगभूमीला गतवैभव प्राप्त करून देण्याचे काम नाटककार आचार्य अत्रेंनी केले. १९५० नंतर रंगभूमीची ही समृद्धी टिकवून ठेवण्याची आणि त्यात मोलाची भर घालण्याची महत्त्वाची कामगिरी वि. वा. शिरवाडकर, प्रा. वसंत कानेटकर, पु. ल. देशपांडे. चिं. त्र्यं. खानोलकर, विजय तेंडुलकर या नाटककारांनी केली.

'प्रेमा तुझा रंग कसा' हे नाटक कानेटकरांच्या लेखनप्रवासातील जसा एक मानबिंदू आहे तसंच एकूण मराठी सुखात्मिका, नाट्यलेखनातील एक महत्त्वाचा टप्पा मानला जातो. 'रायगडाला जेव्हा जाग येते' या त्यांच्या ऐतिहासिक नाटकाने प्रयोगसंख्येचे उच्चांक निर्माण केले आणि वसंत कानेटकर हे व्यावसायिक नाटककार म्हणून ओळखले जाऊ लागले.''

अनुक्रमणिका

